# brown book

**THE BOOK WAS DRENCHED**

# श्रीकृष्ण-चरित्र



लेखक

कै. चिंतामण विनायक वैद्य,

एम्. ए. एल्एल्. बी.



चित्रशाळा प्रकाशन पुणें, २

# प्रस्तावना

१. श्रीरामचरित्र प्रसिद्ध झाल्यापासून तें लोकांस बरेंच पसंत पडलें असें वाटल्यावरून कित्येक मित्रांना व मला मी श्रीकृष्ण—चरित्र याच धरतीवर लिहून प्रसिद्ध करावें अशी कल्पना सुचणें साहजिक आहे. त्या कल्पनेप्रमाणें हें श्रीकृष्ण—चरित्र तयार करून वाचकांसमोर ठेवीत आहे. हा ग्रंथ श्रीरामचरित्राच्या नमुन्यावर लिहिला आहे हें सांगावयास नकोच. या ग्रंथास भारत, हरिवंश व भागवत या तीन ग्रंथांचा आधार घेतला आहे. रामायणाचा विभाग, कांडात्मक आहे; आणि भारत व हरिवंशाचा पर्वात्मक आहे. पर्व आणि कांड हे दोन्ही शब्द एकार्थाचेच वाचक असून त्यांचीं मराठींतील रूपें, पेरें व कांडें हीं ऊंसाच्या विभागालाच लागतात. अर्थात यांपैकीं कोणताही शब्द स्वीकारण्यास हरकत नव्हती. तथापि भारत व हरिवंश यांस अनुसरून हा ग्रंथ आहे; सबब पर्वात्मक विभाग येथें केला आहे. मात्र पुष्कळ पर्वें करता येत नसल्यामुळें श्रीरामचरित्राप्रमाणें याचीं सातच पर्वें केलीं आहेत; व त्यांस नांवेंहि श्रीरामचरित्राप्रमाणेंच दिलीं आहेत. मजकुरासंबंधानें प्रथम ही गोष्ट सांगणें जरूर आहे कीं, निरनिराळ्या ऋतूंचीं व प्रसंगांचीं जीं स्वभावोक्ति वगैरे अलंकारांनीं युक्त बहारीचीं वर्णनें भारत, हरिवंश, भागवत ग्रंथांत या चरित्रास लागून सांपडलीं तीं तेथें तेथें घेतलीं आहेत. तीं रामायणांतील वर्णनांखालोखालच मनोहर असून कविभेदानें निराळ्या सौंदर्याचीं आहेत, हें मर्मज्ञ वाचकाच्या लक्षांत येईल. या वर्णनांत माझी भर थोडी आहे, पण एकंदर श्रीकृष्णाचें चरित्र एका संदर्भानें एका ग्रंथांत वर्णिलें नसल्यानें तो संदर्भ जुळवून कथा सांगणें व त्याचे संविभाग दाखविणें हें कठीण काम या ग्रंथांत करणें भाग पडलें असून, त्या त्या ठिकाणीं वाक्यें व वर्णनें मीं घातलीं आहेत. अशा परिस्थितींत एकंदर ग्रंथ एकजीव होऊन सरस झाला आहे किंवा नाहीं, हें ठरविणें मर्मज्ञ व गुणग्राही वाचकांवर सोंपवितों.

२. भगवद्गीतापर्वाविषयीं थोडेंसें जास्त लिहिलें पाहिजे. या पर्वांत भगवद्गीतेचें बहुतेक समग्र भाषांतर दिलें आहे. यासाठीं या पर्वास श्रीरामचरित्रांतील कांडाच्या नावाच्या अनुरोधानें सुंदरपर्व हें नांव शोभलें असतें.

पण तें तें नांव देण्याचें धाडस मी केलें नाहीं.तथापि हें पर्व वाचकांस सुंदर वाटेल अशीच मी आशा करतों. यांत बहुतेक गीतेचें अक्षरशः सोपें भाषांतर दिलें आहे. अध्यायसंगति किंवा विषयसंगति अथवा श्लोकसंगति विशद करण्यासाठीं मीं आपल्या पदरचीं वाक्यें ठिकठिकाणीं घातलीं आहेत. तीं ‘ ’ अशा एकेरी अवतरणचिन्हांत निराळीं दाखविलीं आहेत; व जेथें समग्र श्लोक एखादा दुसरा किंवा अधिक सोडले आहेत,त्या ठिकाणीं त्यांचे आकडे कंसात दिले आहेत. या व्यवस्थेनें हे भाषांतर गीता ग्रंथ हातांत घेऊन श्लोकवार ताडून पाहण्यास वाचकांस सोईवार पडेल. गीतेचा व्यासंग करणाऱ्यानीं हें रूपांतर असें जरूर ताडून पहावें, अशी शिफारस आहे. म्हणजे त्यांस यातील रसाचा आस्वाद विशेष घेतां येईल. भिन्न मतांचा अभिमान सोडून हें रूपातर केलेलें आहे. तसेंच सर्व मताचा समन्वय करून कर्तव्यसिद्धांत दृढ करण्याचा गीतेचा मुख्य उद्देश आहे, असें माझें मत आहे; आणि त्यास अनुसरून हें रूपातर केलें आहे. तें कितपत साधले आहे हें ठरविणेंही वाचकावरच सोपवितों. क्वचित् प्रसंगीं पूर्वाचार्यांच्या मताहून भिन्न अर्थ करावा लागला आहे; ते प्रसंग मर्मज्ञ वाचकांच्या लक्षांत येतीलच.

३. श्रीरामचरित्राप्रमाणें या ग्रंथास उपोद्घात व उपसंहार जोडले आहेत. उपोद्घातात श्रीकृष्णाच्या चरित्राची महती वर्णिली असून उपसंहारात श्रीकृष्णाच्या कालाची थोडीशी माहिती व श्रीकृष्णाच्या चरित्राचें रहस्य सांगितलें आहे. श्रीकृष्णाचे चरित्र श्रीरामचरित्राप्रमाणें उदात्त नाहीं अशी कित्येकांची समजूत आहे. यासंबंधानें पुष्कळ लोक साशंक असतात; पण श्रीकृष्णाचें चरित्र भिन्न परिस्थितींत श्रीरामाच्या चरित्राप्रमाणेंच उदात्त व निष्कलंक आहे अशी माझी समजूत आहे. आणि श्रीकृष्णाच्या चरित्रास त्याच्या दिव्य उपदेशाची अर्थात् भगवद्गीतेची जोड दिली म्हणजे तर त्याची महती अवर्णनीय आहे असें मला वाटतें. आणि म्हणूनच तें लोकांसमोर मांडण्याचें मी धाडस करतों. विषयानुरूप भाषा भारदस्त ठेविली आहे, तथापि श्रीरामचरित्राप्रमाणेंच हा ग्रंथ आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस सुबोध व प्रिय होईल अशी मला आशा आहे.

शके १८३६ मासोत्तम मार्गशीर्ष, नोव्हेंबर सन १९१४.

चिंतामण विनायक वैद्य.

*

# श्रीकृष्ण-चरित्र

## उपोद्घात

श्रीकृष्णासारखा सर्वतोपरी अद्वितीय पुरुष हिंदुस्थानांतच काय, पण कोणत्याही देशांत आजवर झाला नाहीं. अलौकिक पराक्रम, अप्रतिम बुद्धिमत्ता, असामान्य स्वार्थत्याग इत्यादि सद्गुणांनीं श्रीकृष्णाची व्यक्ति सर्व ऐतिहासिक किंबहुना काल्पनिक व्यक्तींच्या शिरस्थानीं अधिष्ठित झाली आहे. नेपोलियनसारखा पराक्रम व नेपोलियनसारखी बुद्धिमत्ता इतिहासांत अन्यत्र दिसत नाहीं. पण नेपोलियनची स्वार्थपरायणता त्याच्या पराक्रमा-प्रमाणें व बुद्धिप्रमाणेंच अवाढव्य होती. या स्वार्थतत्परतेनें त्यास बुद्धि व पराक्रम यांच्या सहाय्यानें रंकाचा सार्वभौम बनविलें; पण त्याच स्वार्थतत्पर-तेनें त्यास पुन्हा सार्वभौमाचा रंक करून सोडलें. नेपोलियनचें भाग्यही त्याच्या पराक्रमासारखें अद्वितीय नव्हतें, व हा अभागी पुरुष शेवटीं कैदेंत पडून एका कानाकोपऱ्यातील बेटांत मरण पावला. या उलट श्रीकृष्णानें आपल्या दीर्घ आयुष्यांत जें जें मनावर घेतलें तें तें सिद्धीस नेलें. मोठमोठ्या युद्धांत किंवा राजकारणांत त्याच्या बुद्धिमत्तेनें विजयच संपादन केला. आणि या सर्व कामांत स्वार्थ त्यास कधीं शिवला नाहीं. सारांश, नेपोलियनचा पराक्रम, वॉशिंग्टनचा स्वार्थत्याग, ग्लाडस्टन–बिस्मार्कप्रभृति मुत्सद्यांचा नय श्रीकृष्णाच्या ठिकाणीं एकवटले होते. आणि सर्वांत अधिक गोष्ट ही कीं, श्रीकृष्ण जसा राजकारणांत अग्रणी होता तसा परमार्थांतही होता. बुद्ध, ख्रिस्त, महंमद इत्यादि धर्मसंस्थापकांत त्याची गणना करण्यास प्रत्यवाय नाहीं. महंमदानें निश्चयानें आपल्या धर्माचा प्रसार केला. ख्रिस्तानें सौजन्यानें व बुद्धानें बुद्धिवादानें. श्रीकृष्णाच्या ठिकाणीं निश्चय, सौजन्य व बुद्धिवाद या तिन्ही गोष्टी वसत होत्या. तात्पर्य, बल, सौंदर्य, बुद्धि, पराक्रम, साहस, नय, निश्चय, शांति, सौजन्य, ज्ञान, स्वार्थपराङ्मुखता इत्यादि अनेक लोकोत्तर गुण भाग्यैश्वर्यासहित श्रीकृष्णाच्या ठिकाणीं होते. श्रीकृष्णास आम्ही भारतीय आर्य परमेश्वराचा पूर्ण अवतार मानतों, याचें इंगित हेंच आहे. श्रीरामचंद्र पराक्रम व नीति यांच्या उत्कर्षानें नरशिरोमणि होते,

यांत संशय नाहीं. पण त्या अवतारांत ज्ञानाचा उपदेश भगवंतांनीं स्वमुखानें केला नाहीं. श्रीकृष्णानें आपल्या उपदेशामृतानें भारतवर्षाच्या हृत्पटलावर असा कायमचा ठसा उमटवला आहे कीं, तो पुसटून टाकणें शक्य नाहीं. श्रीकृष्णाच्या चरित्रानें व उपदेशानें भारतीय इतिहासांत जें वळण लागलें आहे, तें बदलणें संभवनीय नाहीं. ज्यांच्या कानांत भगवद्गीतेच्या वेणूचा ज्ञानरव पडला आहे, त्यांस अन्य मताचा ध्वनि मधुर लागणें शक्य नाहीं. आर्यांच्या वेदान्तज्ञानरूपी दुर्गाची भगवद्गीता ही शतघ्नी आहे. हिच्या माऱ्यापुढें या किल्ल्यावर इतर तत्त्वज्ञानांचा हल्ला चालत नाहीं इतकेंच नव्हे, तर या दिव्यास्त्राच्या सहाय्याने भारतीय आर्यांचें तत्त्वज्ञान सर्व जगास जिंकूं पहात आहे. असो. याप्रमाणें श्रीकृष्णाविषयीं आम्हां भारतीय आर्यांस जो परमावधीचा आदर वाटतो तो सकारण व योग्य आहे. आणि आश्चर्य हें कीं, आपल्या या आर्यभूमींत सर्व प्रकारच्या लोकांस श्रीकृष्ण सारखाच प्रिय व पूज्य आहे. वैदिक लोक 'हरिः ओम्' म्हणून वेदाचें पठन करितात. कर्मठ लोक कर्मांच्या आरंभीं जीं परमेश्वराचीं चोवीस नांवें घेतात, त्यांत श्रीकृष्ण हेंच शेवटचें नाव आहे. योगी लोक श्रीकृष्णासच योगेश्वर मानतात. भक्तिमार्गी लोक श्रीकृष्णाचें भजन करून भगवच्चरणीं लीन होतात. मथुरा–वृंदावनात तर श्रीकृष्णनामाचा ध्वनि घर–दार, मंदिर–घाट, पृथ्वी–आकाश भरून राहिला आहे. महाराष्ट्रांतही पंढरपूर येथें 'विठ्ठल विठ्ठल' हाच गजर सतत ऐकूं येतो. श्रीकृष्णाचें गुणवर्णन करून महाराष्ट्र काय, बंगाल काय, मद्रास काय, आणि गुजराथ काय, सर्व ठिकाणचे भाविक लोक गातात, नाचतात, ध्यानस्थ होतात. सर्व हिंदुस्थानभर आर्य स्त्रियांच्या मुखातून श्रीकृष्णाच्याच बाललीलांचीं गाणीं सदोदित ऐकूं येतात. पहाटेस उठून त्यांचेच गुणानुवाद त्या गातात, दळणें दळतात व मुलांना जागे करतात. फार काय वर्णन करावें ? भरतखंडांतील आर्यधर्मी स्त्री–पुरुष, बाल–वृद्ध, गरीब–श्रीमंत, नागर–ग्राम्य, पंडित–मूर्ख, संस्कृत–असंस्कृत, संसारी–परमार्थी, सर्वांच्या विचारांत व उच्चारांत श्रीकृष्णाचें नांव व चरित्र भरून गेलें आहे. अशा या सर्ववंद्य विभूतीच्या चरित्राची साद्यंत माहिती प्रत्येक आर्याभिमानी मनुष्यास विशेषतः हिंदु विद्यार्थ्यांस, असावी हें अधिक शब्दांनीं सांगितलें पाहिजे काय?

श्रीरामचंद्राच्या उदात्त–चरित्ररूपी रत्नास वाल्मीकीच्या दिव्य प्रति-

भेच्या काव्याचें कोंदण मिळाल्यानें जशी फारच शोभा आली आहे त्याप्रमाणेंच श्रीकृष्णाच्या चरित्रास व उपदेशास महर्षि व्यासांच्या महाभारताच्या वाणीची जोड मिळाली ही एक मोठ्या धन्यतेची गोष्ट होय. श्रीरामचंद्राचें लोकोत्तर उदात्त चरित्र व वाल्मीकीचें लोकांतील उदात्त काव्य हा जसा समानयोग झाला आहे, तसा श्रीकृष्णाचें उदार चरित्र आणि व्यासाची उदार वाणी हाही समानयोगच झाला आहे. वाल्मीकीस आद्यकवि हे नांव जसें शोभतें, त्याप्रमाणेंच व्यासांस आद्य इतिहासकार हे नाव देण्यास हरकत नाहीं. व्यासांसारखा व्यवहारचतुर ग्रंथकर्ता भारतवर्षात झालाच नाहीं असें म्हटलें असतां चालेल. आणि व्यवहारांत जसे व्यास चतुर होते तसे तत्त्वज्ञानाचे विषयांतही ते पारंगत होते. " व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम् " असें म्हणतात तें कांहीं खोटें नव्हे. व्यवहारांत काय आणि परमार्थात काय, जी जी सुंदर कल्पना किंवा कोटि आपल्यास सुचते, ती ती महाभारतात नाहीं. असें व्हावयाचें नाहीं. सारांश, श्रीकृष्ण जसा व्यवहारांत व परमार्थांत अग्रणी होता, त्याप्रमाणें व्यासही होते आणि असा समानयोग जमल्यानें श्रीकृष्णाचें चरित्र व श्रीकृष्णाचा उपदेश आपल्यासमोर फारच सुंदर रीतीनें मांडलेला दृष्टीस पडतो. भगवद्गीतेसंबंधानें तर या सौंदर्याची कमाल झाली आहे असें म्हटलें पाहिजे. भगवद्गीतेतील गहन तत्त्वज्ञानास व्यासांच्या गंभीर व प्रसन्न वाणीची जोड मिळाल्याने गीताग्रंथ सर्व जगांतील अत्यंत मान्य ग्रंथांत जाऊन बसला आहे. भगवद्गीतेचा प्रत्येक शब्द सुवर्णाच्या मोलाचा आहे असें म्हणणें म्हणजे अतिशयोक्ति नव्हे. लहान असून वजनदार, प्रज्वलित असून मौल्यवान्, अशा या गीता-शब्दांना सुवर्णाची योग्यता नाहीं असें कोण म्हणेल ? भगवद्गीतेच्या गहन तत्त्वांचा व भारदस्त भाषेचा जों जों अधिक व्यासंग करावा तों तों अधिक आनंद होतो, हें तज्ज्ञांस सांगणें नको. आज हजारों वर्षांपासून या मोहक ग्रंथाचा आम्ही भारतीय लोक रसास्वाद घेत आहों, तरी त्याची गोडी संपली नाहीं. " तदासेचनकं तृप्तेर्नास्त्यन्तो यस्य दर्शनात् । " हें जें आसेचनक दृश्य सौंदर्याचें लक्षण अमरकोशांत आहे तें श्रवणात् हा जरूर तो बदल करून भगवद्गीतेच्या श्राव्य सौंदर्यास अक्षरशः लागू पडतें. भगवद्गीतेचें श्रवण, पठण व विवरण आजपर्यंत अनेक विद्वान् लोक करीत आले आहेत, तरी तिचें माधुर्य अप्रतिहत आहे. असो. श्रीकृष्णाच्या चरित्रास व उपदेशास महाभारताचें

सिंहासन मिळाल्यानें अप्रतिम शोभा आली आहे, यांत तिळभरही अतिशयोक्ति नाहीं. पण येथें एक गोष्ट कबूल केली पाहिजे. श्रीकृष्णाचें तत्त्वज्ञान किंवा मत भारतांत चांगलें उद्घाटित झालें आहे असें म्हणतां येईल; पण श्रीकृष्णाचें चरित्र भारतांत समग्र ग्रथित झालें आहे असें म्हणतां येत नाहीं. यांत भारत ग्रंथाचा दोष नाहीं. श्रीकृष्णाचें चरित्र सांगण्याकरितां भारताचा जन्म झाला नाहीं; तर पांडवांचें चरित्र सांगणें किंवहुना भारतीयुद्धाची इत्थंभूत हकीकत देणें हें भारताचें प्रयोजन होतें. तदनुषंगानें श्रीकृष्णाचें जितकें चरित्र सांगणें शक्य होतें तितकें भारतांत आलें आहे. बाकीचें चरित्र वाचकांस ठाऊक आहे असें ग्रंथकार धरून चालला आहे असा भास होतो. साहाजिकच समग्र श्रीकृष्णचरित्र जाणण्याची वाचकांची पिपासा भारतानें तृप्त होत नाहीं. ही उणीव सौतीनें हरिवंश पुराणास महाभारताचें खिलपर्व मानून दूर केली आहे. भारतांत जे श्रीकृष्णाचें चरित्र आलें नाहीं तें हरिवंशात आहे, आणि हे दोन्ही ग्रंथ मिळून आपल्यास श्रीकृष्णाचें साद्यंत चरित्र ऐकावयास मिळतें. तात्पर्य, श्रीरामचरित्राप्रमाणें एक संदर्भानें, एक हेतूनें, एक वाणीनें सांगितलेलें श्रीकृष्णाचें अथपासून इतिपर्यंत चरित्र जरी आपल्यासमोर नाहीं* तथापि महाभारत व हरिवंश या दोन ग्रंथांच्या एकीकरणानें आपल्यास समग्र श्रीकृष्णचरित्र समजणें शक्य आहे या दोन अलौकिक ग्रंथांनीं श्रीकृष्णाचें दिव्य चरि गाइलें असल्यामुळें "मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः" या कालिदासाच्या उक्तीप्रमाणें हें दुष्कर काम अल्पमतीसही शक्य झालें आहे.

श्रीकृष्णाच्या चरित्राचा सूत्रभूत एक संदर्भ, एक हेतु कोणता होता हें या दोन्ही ग्रंथांवरून ऐकमत्यानें आपल्यास कळून येतें. ज्याप्रमाणें हाराच्या सर्व मण्यांत एक दोरा ओवलेला असतो, त्याप्रमाणें श्रीकृष्णाच्या उदात्त चरित्रांत एकच हेतु ओतप्रोत भरलेला आहे. हरिवंशांत म्हटल्याप्रमाणें

* भागवत वगैरे पुराणांसही हेंच म्हणणें लागू आहे. सर्ग, प्रतिसर्ग, वंश इत्यादि अनेक गोष्टी सांगत असतांना श्रीकृष्णाचें चरित्र त्यांत सांगितलें असतें; व तेंही समग्र नसतें. कारण, भारतासारख्या सर्वमान्य आर्ष ग्रंथाचें पूर्वास्तित्व सर्वांसच बाधतें व भारतांत आलेला विषय पुन्हां सांगण्याचें धाष्टर्य कोणतेंही पुराण करीत नाहीं.

" आसुरांचें उन्मूलन करून प्रजाजनांस वर्तनाची मर्यादा लावून देणें " हाच श्रीकृष्णचरित्राचा उच्च हेतु दिसतो. अवतारी पुरुषाचे चरित्र मननीय व वाचनीय याच कारणानें असतें. जगद्वंद्य विभूतींची चरित्रें आपल्यास पूज्य व श्रवणीय असतात याचे कारण हेंच होय. उदात्त नीतिमत्ता व अद्‌भुत पराक्रम हेंच अवतारी पुरुषाचे लक्षण आहे. श्रीरामचंद्रापासून तों शिवाजीमहाराजापर्यंत अवतारी मानलेल्या सर्व पुरुषाच्या चरित्रात हाच विशेष दृष्टीस पडतो. श्रीकृष्णाचे उदार चरित्र, अद्‌भुत पराक्रम व लोकोत्तर, नीतिमत्ता यानींच मनोहर व स्मरणीय झाले आहे. *मर्मज्ञ व्यासमहर्षीनी दर्शविल्याप्रमाणे इज्या, अध्ययन, दान व तप हीं धर्माचीं अंगे ' दंभार्थही' मनुष्याच्या ठिकाणीं असू शकतील; पण सत्य, शांति, इंद्रियदमन व विशेषतः निर्लोभता हे बाकीचे चार गुण दंभानें येऊ शकत नाहींत. ते महात्म्याच्याच अंगीं वसतात. ¶ अशा गुणानीं श्रीकृष्णाचें चरित्र मंडित आहे, व म्हणूनच तें रमणीय व उदाहरणीय झाले आहे.

श्रीकृष्णाचे चरित्र आणखी एका कारणाने विशेष रमणीय व प्रिय झालें आहे. श्रीकृष्णाचे चरित्र मानवी कक्षेंतील असून प्रत्येक मनुष्यास या संसारात त्याचें उदाहरण घेण्यासारखी उपयुक्तता त्यात दिसून येते. श्रीकृष्णाचे शत्रु प्रत्यक्ष असुर नसून नेहमीं संसारात दिसणारीं आसुरी स्वभावाचीं माणसें हींच त्याच्या शत्रुस्थानीं होतीं. श्रीरामचंद्राप्रमाणे त्यास प्रत्यक्ष राक्षसाशीं लढावयाचें नव्हतें किंवा त्याचे साहाय्यकर्तें वानर नव्हते. प्रत्येक समाजात, प्रत्येक देशात, प्रत्येक काळात दुष्ट व दुराचारी मनुष्यें निसर्गनियमाने उत्पन्न होतात. अशा मनुष्यास बुद्धि व पराक्रम याचें पाठबळ मिळतें, तेव्हा त्याचीं कारस्थानें कंस, जरासंध दुर्योधन याच्या कारस्थानाप्रमाणे अत्यंत कुटिल व भयंकर होतात. अशा बुद्धिमान् व पराक्रमी पण पापी व

* श्रीकृष्णाचे गोपींशीं वर्तन अश्लाघ्य होतें हा आक्षेप येथें वाचकाच्या पुढे उभा राहील; परंतु हा व इतर आक्षेप खरे नाहींत, याबद्दल स्वतंत्र विवेचन केले आहे.

¶ इज्याध्ययनदानानि तपः सत्यं दमः क्षमा ।
अलोभ इति मार्गोऽयं धर्मस्याष्टविधः स्मृतः ॥
तत्र पूर्वश्चतुर्वर्गो दंभार्थमपि सेव्यते ।
उत्तरस्तु चतुर्वर्गो नामहात्मसु तिष्ठति वनपर्व.

लुब्ध मनुष्यांची कारस्थानें नीतिमंतांनीं कशीं उलथून पाडावीं हा एक व्यवहारातील अत्यंत बिकट प्रश्न आहे. अशाच प्रकारचे अन्य कठिण प्रश्न प्रत्येक समाजांत होतात, त्या वेळेस नीतिमान् मनुष्यानें काय करावें हें त्यास समजत नाहीं. हाच प्रकार तत्त्वज्ञानाचाही आहे. मनुष्याच्या बुद्धीस मोह पाडणारीं पुष्कळ पाखंडें जगतांत आजवर उत्पन्न झालीं आहेत, हल्लीं उत्पन्न होत आहेत व पुढें होतील. अशा मोहक पण असत् मतांपासून सन्मार्ग कसा ओळखावा हें ठरविणें बुद्धिवंतांसही कठिण पडते. अशा प्रकारच्या व्यवहारांतील व परमार्थांतील कठिण प्रश्नांचा उलगडा श्रीकृष्णाच्या चरित्रापासून व उपदेशापासून होतो. या कारणानें श्रीकृष्णाचें चरित्र विशेष मनोवेधक व मननीय आहे. आणि ध्यानांत धरण्यासारखी गोष्ट ही कीं, असा उलगडा करितांना श्रीकृष्णानें मानवी उपायांची बहुधा योजना केली आहे. कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं समर्थ अशी ईशशक्ति जर अवतारी पुरुष उपयोगांत आणतील तर त्यांच्या चरित्रापासून आपल्यास तादृश फायदा होणार नाहीं हें उघड आहे. केवळ इच्छेनेंच रामचंद्रानें किंवा सीतेनें रावणाचा निःपात केला असता, तर त्यांचें चरित्र संसारी लोकांस कधींही उपयुक्त झालें नसतें. सारांश, अवतारी पुरुषांचीं मानवी कृत्येंच मनोहर व मननीय असतात. अशा दृष्टीनें श्रीकृष्णाचें चरित्र विशेष मानवी कोटींतलें आहे. श्रीकृष्णानें सर्व प्रकारें लहानपण पत्करिलें होतें. त्याचा जन्म श्रीरामाप्रमाणें राजाच्या पोटीं झाला नव्हता इतकेंच नव्हे, तर राजवंशांतही झाला नव्हता. श्रीकृष्ण राजा नव्हता, राजपुत्र नव्हता, राजवंशीय नव्हता, ज्येष्ठ पुत्रही नव्हता. किंबहुना त्याचें बालपण ऐश्वर्यांत गेलें नव्हतें, तर अगदीं सामान्य प्रतीच्या लोकांत गेलें. यामुळें श्रीकृष्णाच्या चरित्रास मानवीपणा अधिकच आला आहे. सारांश, श्रीकृष्णाचें चरित्र अनेक दृष्टींनीं अत्यंत मनोहर व उपयुक्त आहे. तें व्यवहाऱ्यास शहाणपण शिकविणारें, मुमुक्षूस मोक्ष देणारें, विपन्नास धैर्य देणारें, निरुत्साह्यास उत्साह उत्पन्न करणारें, संशयितास निश्चयाच्या पायरीवर नेऊन पोचविणारें, सामान्य जनास प्रेम उत्पन्न करणारें, श्रीमंतास उन्मत्तपणापासून वांचविणारें, गरिबास आधार देणारें, दुष्टास भय उत्पन्न करणारें, व सुष्टास नीतिपथ दाखविणारें आहे. अशा सर्व बाजूंनीं उपयुक्त व मनोहर असें श्रीकृष्णाचें चरित्र येणेंप्रमाणें:—

*

# बालपर्व

आर्यावर्तांत शूरसेन नांवाचा एक अत्यंत सुपीक व रमणीय देश असून त्यांतून यमुना नदी वायव्येकडून आग्नेयीकडे वहात आहे. या देशाची समृद्ध राजधानी यमुना नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर वसली होती. ही राजधानी मूळ मधु राक्षसानें वसविली असल्यानें तिला मधुपुरी किंवा मधुरा अथवा मथुरा असें म्हणत. हा देश पूर्वी अरण्यमय असल्यानें त्यास मधुवन असेंही नांव होतें. मधु राक्षसाचा पुत्र लवण ऋषींस फार त्रास देऊं लागला, तेव्हां ऋषींच्या विनंतीवरून अयोध्येचा राजा श्रीरामचंद्र यानें शत्रुघ्नास बरोबर शूर सेना देऊन त्याजवर पाठविलें. शत्रुघ्नानें लवणास ठार मारून मधुपुरींत आपले राज्य स्थापिलें. त्याच्या शूर सेनेनें मधुवनांतील जुनाट मोठमोठ्या वृक्षांनीं भरलेलें भयंकर अरण्य तोडून तेथें वसाहत केली; त्यामुळें या देशास शूरसेन हें नांव पडलें. शूरसेनांत सूर्यवंशी क्षत्रियांचें राज्य कित्येक वर्षें नांदून पुढें कालगतीनें लयास गेलें, तेव्हां यादव, अंधक, भोज इत्यादि सोमवंशी क्षत्रियांनीं येथें वसति केली. भोजकुळांत उत्पन्न झालेल्या ज्या राजानें मथुरेंत याप्रमाणें प्रथम राज्य स्थापन केलें त्याचें नांव शूरसेनच पडलें. सोमवंशी क्षत्रियांच्या अमलाखालीं तो देश व ती राजधानी पुन्हां भरभराटीस आली. अनेक प्रकारच्या व्यापारी, कारागीर व लढवय्ये लोकांनीं मथुरा नगरी भरून गेली. उंच उंच माड्या असलेल्या प्रासादांनीं ती नगरी कर्णभूषणें घातल्याप्रमाणें शोभूं लागली. तिच्या विस्तीर्ण वसतीच्या सभोंवर उंच तट असून त्याभोंवतीं कमलांनीं भरलेला खंदक नकशी काढलेल्या कमरपट्ट्याप्रमाणें शोभूं लागला. शहराभोंवतीं अनेक बागबगीचे चौफेर असल्यामुळें ती नगरी हिरवी शालू नेसली आहे काय असें भासूं लागलें. मथुरेच्या उत्तरेस यमुनेचें अर्धवर्तुलाकार पात्र असल्यानें त्या नगरीनें डोक्यांत चंद्रकोर घातली आहे कीं काय असें वाटे. मथुरेचे बाजार रत्नादि निरनिराळ्या प्रकारच्या वस्तूंनीं व संपत्तींनीं भरलेले असल्यामुळें ती जणुं काय हंसत होती. मथुरेच्या दरवाजाचें उत्तम रक्षण केलें जात असून मथुरेचे रस्ते हत्ती, घोडे व रथ यांनीं नेहमीं भरलेले असत. मथुरेचे लोक शूर

असून हवापाणी चांगलें असल्यानें रोगरहित होतें. याप्रमाणें ती नगरी शत्रूस अजिंक्य असून आनंदी व संपन्न स्त्रीपुरुषांनीं गजबजलेली असे. भोंवतालच्या देशांतही जमीन सुपीक असून पर्जन्य वेळचे वेळीं पडत असल्यानें पिकें उत्तम येत व यामुळें शूरसेनांत सर्व प्रकारचें सुख नांदत होतें.

अशा त्या रम्य, विस्तीर्ण, समृद्ध, सुसंरक्षित राजधानींत व सुखी देशांत शूरसेनाच्या कुलांत उत्पन्न झालेला उग्रसेन नावाचा राजा सुमारें ५१०० वर्षांपूर्वी नीतीनें व आनंदानें राज्य करीत असतां, त्याचा दुष्ट ज्येष्ठ पुत्र कंस यानें त्यास एकाएकीं कैद करून आपण राज्य बळकाविलें. हा कंस मोठा पराक्रमी होता, पण तो अत्यंत क्रूर असे. तो महाकोपी असून त्याचीं कृत्यें फार भयंकर असत. त्याचा वचक इतका मोठा होता कीं, त्यास लोक थरथर कांपत. त्याचा निश्चय कडक असून तो मनाचा अति निर्दय असे. राजधर्म सोडून अनीतीनें वागण्यास तो बिलकुल कचरत नसे. त्याच्या सासऱ्याच्या जोरावर त्याच्या उन्मत्तपणास अधिकच ऊत आला होता. यमुनेच्या किनाऱ्यानें मत्स्य, कुरु, पांचाल, शूरसेन, चेदि, मगध अशीं जीं त्या वेळेस सोमवंशी क्षत्रियांचीं राज्यें होतीं, त्यांत मगधांचें राष्ट्र सर्वांत बलाढ्य असून तेथील राजा जरासंध हा त्या वेळेस हिंदुस्थानच्या सार्वभौम पदवीस चढला होता. या जरासंधास अस्ति व प्राप्ति नावाच्या दोन मुली होत्या व त्या कंसास दिल्या होत्या. जरासंधाच्या बळावर अत्यंत उन्मत्त होऊन कंस अवरंगजेबाप्रमाणें बापास कैद करून वर मोगलांप्रमाणें राज्य करूं लागला. या त्याच्या उन्मत्त कृत्यांत त्याच्या ज्या कित्येक धाकट्या भावाचें त्यास सहाय्य होतें, त्यांत केशी व सुनामा हे प्रमुख होते. त्यांस कदाचित यांत फायदा झाला असेल, पण कंसाच्या इतर अनुयायांस त्यांच्या शीघ्रकोपीपणामुळें, गर्वामुळें व क्रूरपणामुळें या त्याच्या राज्यपद बळकाविण्यापासून कांहीच सुख झालें नाहीं ( हरिवंश, ह० अ० ५४ ).

शूरसेन देशांत भीम, कुकुर, अंधक, दाशार्ह, यादव, वृष्णि आणि भोज अशा सात सोमवंशी क्षत्रियांच्या जाति वसाहत करून होत्या. त्यांत यादव प्रमुख असून त्यांपैकीं वसुदेव नांवाचा एक यादव सरदार भोजराजांचा मांडलिक होता. तो नदीपलीकडील गोवर्धन नांवाच्या टेकडीजवळच्या आपल्या जहागिरीच्या गांवीं रहात असे. यादवांस राज्याचा अधिकार नाहीं अशी समजूत असल्यानें यादववंशी क्षत्रिय बहुधा गोपांचा धंदा

करून असत. शूरसेन देशाची जमीन गाई चारण्यास फारच नामी होती. तेथील जमीन जरी बहुतेक सपाट होती तरी ठिकठिकाणी लहान लहान टेकड्या असून त्यासभोंवतालची कुरणे गुरें चारण्यास फारच पसंत असत. अजूनही मथुरेभोंवतालच्या प्रदेशातील गवत गुरास इतकें मानवतें की, हल्लींही येथील गाईस सकस व गोड दूध पुष्कळ असते. गवळ्याचा धंदा करणारे वैश्य शूरसेनात पुष्कळच होत. भगवद्गीतेंत कृषि,गोरक्ष्य व वाणिज्य, अशीं जीं वैश्याचीं तीन स्वाभाविक कर्मे सांगितलीं आहेत, त्यांतील गोरक्ष्य पदाची महती हल्लींच्या वैश्याच्या स्थितीवरून आपल्या लक्षात येत नाहीं. हल्लींचे वैश्य बहुधा वाणिज्यच करतात, यामुळें कृषि व गोरक्ष्य हल्लीं शूद्राकडे गेलीं आहेत, पण प्राचीन काळीं गोरक्ष्य हा वैश्याचा स्वतंत्र व महत्त्वाचा उद्योग होता. हिंदुस्थानच्या विस्तीर्ण क्षेत्रात त्या वेळेस जरूर तितकी शेती करूनही इतकी जमीन उरली होती कीं, हल्लीं अमेरिकेतल्या-प्रमाणे हजारो गाई चरतील अशीं कुरणं येथे अनेक असत. आणि वैश्य लोक गाईंचे शेकडों कळप बाळगून त्यांच्या दूधदुभत्यानें व लोण्या-तुपाने आपला चरितार्थ चालवीत. असो. गाईंचा धंदा करणाऱ्या वैश्याचा शूरसेनात भरणा होताच, पण गोपाचा धंदा करणारे यादव क्षत्रियही येथे पुष्कळ होते. त्यात वसुदेव हा प्रमुख होता. तो रूपानें व गुणाने उदार असून सर्वांस प्रिय होता, तो तेजानें व आचरणाने कश्यपासारखा असून तो वर सांगितल्याप्रमाणें गोवर्धन पर्वताच्या जवळच्या आपल्या जहागिरींत आनंदानें रहात असे ( हरिवंश, ह० अ० ५५ ).

दुष्ट लोक सुष्टाचे अकारण शत्रु असतात.अमुक मनुष्य चांगला आहे, तेव्हा तो बहुधा माझा द्वेष करीत असेल असें वाईट मनुष्यास विनाकारण वाटते. त्यांत एखादें अनन्वित कृत्य त्याच्या हातून झाले म्हणजे ह्या त्याच्या कल्पना साहजिकच वाढतात. एका पापापासून अनेक पापी कल्पना त्याच्या मनात उभ्या राहातात, व अशा कल्पनांचा एक प्रचंड वृक्ष बनून त्याच्या पापकृत्याचीं परंपरा वाढत जाते. उग्रसेनास कैद केल्यामुळे कंसाची अशीच स्थिति झाली. उग्रसेनातर्फे माझ्याशीं कोण कोण वैर करतील याचा विचार करता वसुदेवाचे नाव सहजच त्याच्या मनापुढे उभे राहिलें. वसुदेवास उग्रसेनाचा धाकटा भाऊ देवक याची कन्या देवकी दिली होती. तेव्हा वसुदेव आपल्या सासऱ्यास बंदींतून सोडविण्याचा प्रयत्न

करील असें कंसास वाटूं लागलें. वसुदेव आणि देवकी यांचे पुत्र तर माझ्यावर उठतीलच अशा कल्पना त्याच्या मनांत घोळूं लागल्या. इतक्यांत नारदमुनि मथुरेस येऊन त्यांनीं शहराबाहेर एका बागेंत तळ दिला व तेथें कंसास बोलावून आणिलें. नारदमुनि म्हणजे काळपुरुषाचे कळलावेच होते. त्यांनीं देवसभेंत कंसासंबंधानें काय काय भाषणें झालीं तीं त्यास सांगितली. " कंस अति उन्मत्त होऊन प्रजेस छळीत आहे, त्यानें बापासही कैदेंत टाकिले आहे, त्याला जरासंधाचा आधार मिळाल्यानें तो बहुतेक अजेय झाला आहे, त्याचा निःपात करण्यास श्रीविष्णूनेंच अवतार घेतला पाहिजे. " वगैरे बोलणीं देवांच्या सभेंत होऊन वसुदेव-देवकीच्या पोटीं येण्याचें श्रीविष्णूनें ठरविलें आहे. देवकीचा आठवा पुत्र प्रत्यक्ष श्रीविष्णूचा अवतार होईल व तो तुला ठार मारील, तर मी तुला वेळेवर सावध करण्याकरितां आलों आहे. " असे नारदाचें भाषण ऐकून कंस गदगदा हंसला. " देवकीचा आठवा पुत्र मला मारील त्याच्या अगोदर जन्मल्याबरोबर मीच त्याला ठार करतों, देवकीचे सर्वच पुत्र मारून टाकतों म्हणजे आठवा कोणता आणि नववा कोणता हा संशय राहणार नाहीं. कदाचित् आठवा म्हणून देव मला फसवूं पहात असतील.देवकीचीं सर्वच पोरें मारून टाकून मीच देवास फसवितों."असें म्हणून हा ! हा ! हा ! असा कंसानें अट्टाहास केला. तो कंसाचा भयंकर विचार नारदास फार आवडला. त्यांचें कळ लावण्याचें कार्य उत्तम सिद्धीस गेलें, इतकेंच नव्हे तर कंसाचीं शंभर वर्षें शंभर वर्षांनीं भरावयाचीं तीं दहा बारा वर्षांतच अशा अनन्वित पापांनीं भरतील असें वाटून त्यांनीं कंसाची तारीफ केली. " तूं देवांहूनही वस्ताद आहेस, " अशी त्याची पाठ थोपटून नारदमुनि देवलोकीं निघून गेले. इकडे कंसानें वसुदेवदेवकीस गोवर्धनाहून बोलावून आणून मथुरेस त्यांच्याच वाड्यांत नजरकैदेंत ठेविलें. वाड्याच्या बाहेर त्यांनीं जाऊं नये अशी सक्त ताकीद देऊन वाड्यावर चौक्या बसविल्या व आपल्या तर्फेच्या हेर बाया देवकीच्या अन्तर्गृहांत ठेवून तिच्यावर सक्त पाहरा चालू केला ( हरिवंश, वि० अ०.२ ).

आधींच कंस दुष्ट, त्यांत राज्याचा पूर्ण मालक आणि त्यांत त्यास संशयाच्या पिशाचानें ग्रासलेलें, मग त्यानें आपली अमानुष प्रतिज्ञा शेवटास नेली हें सांगणें नकोच. देवकीस गर्भ राहिला म्हणजे त्यास बातमी पोंचे

व तो तेव्हांपासून वाट पाही; आणि योग्यकाळीं तीस पुत्र झाला म्हणजे तो तावडतोब तेथें येऊन बाळंतिणीच्या खोलींतून नवीन उत्पन्न झालेलें बाळ देवकीच्या हातून हिसकून घेऊन दगडावर हापटून ठार मारी. याप्रमाणें त्यानें दुष्टपणाची कमाल करून देवकीचे सहा पुत्र मारले. देवकी सातव्या वेळीं गर्भवती झाली परंतु भावी दुःखाच्या भीतीनें तिचा गर्भ गळून गेला. वसुदेवाची ज्येष्ठ स्त्री रोहिणी ही वसुदेवाबरोबर वाड्यांत होती तिला याच सुमारास गर्भ राहिला. कदाचित् तिचेंही मूल कंस संशयाच्या तारेंत मारील या भीतीने वसुदेवानें तिला आपल्या जहागिरीच्या शेजारच्या गवळीवाड्याचा पाटील नंद त्याचा जिवलग मित्र होता त्याच्या घरीं पोंचविलें. यानंतर कांहीं काळानें देवकी आठव्यान्दा गर्भार झाली. त्याची खबर कंसास पोंचली, तेव्हा तो तिच्यावर डोळ्यांत तेल घालून पाळत ठेवूं लागला. त्याने वाड्याभोंवतीं कडेकोट बंदोबस्त केला. वाड्यांतून चिटपाखरूं बाहेर जाईनासें झालें. पण तारना मारण्यापेक्षां बलवान् आहे. हजारों आपत्तींतून मनुष्यें बचावून गेल्याचीं शेंकडों उदाहरणें आहेत. देवकीच्या पोटीं या वेळेस प्रत्यक्ष श्रीविष्णूचाच अवतार जन्मास येणार होता, तो कंसाच्या हातीं कसा लागणार ? पुढील आपत्तीच्या भीतीनें म्हणा किंवा अन्य कारणानें म्हणा देवकी आठव्या महिन्यांत अकल्पित बाळंत झाली. ज्यावेळेस सर्वोस झोपेनें अगदीं घेरलेले असतें अशा ऐन मध्यरात्रींच्या वेळीं श्रावण महिन्यात वद्य अष्टमीस, पाऊस घनघोर पडत असता, श्रीकृष्णाचा जन्म झाला. श्रीवत्सादि चिन्हांनीं अंकित असलेलें ते परम दिव्य बालक पाहून वसुदेवदेवकीस अत्यंत मोह उत्पन्न झाला. देवकीने प्रेमातिशयानें बाळास पोटाशीं धरून याला वाचवाच अशी वसुदेवास गळ घातली. त्यासही मुलास वाचविण्याची उत्कट इच्छा उत्पन्न झाली. अभिजित् नक्षत्रावर विजय मुहूर्तावर जन्मलेलें तें यशस्वी बाळ त्याने लागलींच घेतलें आणि तो आपल्या वाड्याच्या बाहेर बेधडक पडला. सर्व पहारेकरी जागच्या जागीं घनघोर निद्रेत होते. पावसाच्या आवाजात दरवाजे उघडण्याचा आवाज ऐकूं आला नाहीं. वसुदेव शहराच्या रस्त्यांतून यमुनेवर पोंचला आणि बिन दिक्कत पाण्यात शिरला. यमुनेचें पाणी श्रीकृष्णाच्या पायाला लागताच उतरून कमी झालें, वाढलें नाहीं. नदी उतरून वसुदेव नंदाच्या गोकुळांत

पोंचला. तेथें नंदपत्नी यशोदा एकाएकीं अकालीं नुकतीच बाळंत झाली असून तिला मुलगी झाली होती. तिच्या ऐवजीं श्रीकृष्णास ठेवून वसुदेवानें ती मुलगी उचलून घेतली, आणि आल्या वाटेने परतून तो आपल्या वाड्यांत पोंचला. एवढ्या कृत्यास दोन तीन तास लागले असतील, पण तोंपर्यंत सर्व गोष्टी तेथें जशाच्या तशा होत्या, कोणतीही हालचाल तेथें झाली नव्हती. पहाटेच्या सुमारास मंडळी जागी होऊं लागली; तेव्हां भीतीनें वसुदेवानें कंसास आपणांस मुलगी झाल्याची बातमी कळविली. कंस ती बातमी ऐकून खडबडून उठला. नवव्या महिन्यापूर्वीच देवकी बाळंत झाली याचें त्यास आश्चर्य वाटलें, तरी तो वसुदेवाच्या वाड्यांत धांवत आला. " ही मुलगी आहे, हिला व्यर्थ मारूं नकोस " असें देवकी काकळूत करून विनवीत असताही त्यानें तिच्या हातून ती ओले केस असलेली मुलगी ओढून घेतली आणि " मुलगी आहे तर मारण्यास कांहींच हरकत नाहीं, ती मेलेलीच आहे, " असें म्हणून त्यानें तिला पूर्वकर्माप्रमाणें शिळेवर हापटून ठार केलें. त्या क्षणीं त्या मृतशरीरातून एक दिव्य स्त्री निघून आकाशांत गेली. तिच्या डोक्यावर मुकुट असून तिचे केस सुटलेले होते. तिचें मुख चंद्रासारखें मोहक असून तिचा वर्ण सोन्यासारखा पिवळा होता. तिनें काळें वस्त्र परिधान केलें असून गळ्यांत दिव्य माला धारण केली होती. तिला चार हात असून त्यांत दिव्य आयुधें होतीं. याप्रमाणें त्या अंधकारमय रात्रीं आकाशांत देदीप्यमान देवी कुमारी* पाहून कंस भयभीत झाला. ती आकाशांतूनच म्हणाली, " अरे कंसा, मला तूं शिळेवर हापटून ठार मारिलेंस यासाठीं जेव्हां तुझा शत्रु तुला फरफटा ओढील, त्या वेळीं मी आपल्या तीक्ष्ण नखांनीं तुझें शरीर फाडून तुझें उन्हून रक्त पिईन ! " हे भयंकर शब्द ऐकून कंसास भीति, लज्जा व पश्चात्ताप यांनीं ग्रासिलें. आपल्या भयंकर कृत्यांनींच आपला नाश होईल असें त्यास वाटूं लागलें. लज्जेच्या भरांत तो देवकीच्या पायां पडला व तिला म्हणाला, " देवकी, मी तुझे गर्भ विनाकारण मारले. माझा मृत्यु उत्पन्न झालाच आहे. मीं हें केवळ मूर्खपणानें काम केलें

---

* हीच देवी विंध्यवासिनी म्हणून मिरझापुराजवळ हल्लीं प्रसिद्ध आहे. हिची पूजा यादववंशीय विशेष करतात.

याजबद्दल तूं क्षमा कर. तुझे पुत्र आपल्या दैवानेंच माझ्या हातून मेले, याजबद्दल तूं शोक करूं नकोस. मी तुला आजपासून बंदींतून मुक्त केलें आहे. " असें म्हणून कंसानें वसुदेवदेवकीस तावडतोब पाहऱ्यांतून मोकळें केलें व लज्जेनें व दुःखानें तो आपल्या वाड्यांत निघून गेला ( हरिवंश, वि० अ० ४ ).

रोहिणी यापूर्वीच नंदाच्या घरीं बाळंत होऊन तिला मुलगा झाल्याची बातमी वसुदेवास लागली होती. नंदाच्या घरीं आपला दुसराही पुत्र आहे याची परिस्फुटता मात्र त्यानें कोणापाशीं केली नाहीं. किंबहुना नंदास व यशोदेस सुद्धा ती गोष्ट कळली नाहीं. यशोदेच्या पुढें आपला मुलगा ठेवून वसुदेव तिला झालेली मुलगी घेऊन गेला, त्या वेळेस यशोदा प्रसवमूर्च्छेंत होती. थोड्या वेळानें त्या दिव्य बालकाचें " क्यांहा " " क्यांहां " " क्यांहा " असें आनंददायक रोदन ऐकून सर्व मंडळी जागी झाली व त्यास यशोदेस पुत्र झाल्याचें कळून अतिशय आनंद झाला. राजा असो कीं रंक असो, पुत्रजन्माचा उत्सव सर्वांसच अतिशय असतो. त्यांत नंदास आजपर्यंत अपत्य नव्हतें. यामुळें त्यास परमावधीचा हर्ष झाला. प्रातःकाळ होताच त्यानें गोकुळांत साखर वांटली. लोकांनीही नंदाच्या घरीं येऊन त्यास धन्यवाद दिला. गोपाच्या स्त्रियांनीं उत्तम उत्तम लुगडीं नेसून डोक्यावर कलश घेऊन नंदाच्या घरीं येऊन गाणीं म्हटलीं. बालारिष्ट निवारण्यासाठीं नंदानें पंचमी षष्ठीपूजन थाटानें केलें व सर्वांस पेढे वांटले. बारशाच्या दिवशीं नंदानें सर्व गावास जेवण दिलें व लोकांनीं नंदास आहेर केले. मुलाचें नाव कृष्ण ठेविलें. जगताचें पाप क्षालन करतां करतां कलियुगाच्या आरंभीं श्रीविष्णूस काळे-पण आलें होतें ! किंवा वसुदेवाचा हा पुत्र आहे अशी कोणास शंका येऊं नये म्हणून त्या बालकानें घननील वर्ण धारण केला होता काय ? क्षत्रियांत तर गोष्टच नको, पण वैश्यांतही असा वर्ण क्वचित् सांपडेल, म्हणून मुलाचें नांव वर्णावरून कृष्ण ठेविलें. वस्तुतः तें नांव केवळ त्याच्या अतिमोहक रूपास नजर लागूं नये म्हणून गालबोटाप्रमाणें होतें. त्या मोहक रूपाकडे पाहून नंदयशोदेची तृप्ति होईना; त्यांस त्या दिव्य बालकास अंगावर घेतांच पराकाष्ठेचें सुख होई व ते आपल्यास धन्य मानीत. त्या मुलास ते क्षणभरही विसंबेनासे झाले. तीन चार महिन्यांनीं सरकारी देणें

भरण्याची वेळ आली तेव्हां मुलास घेऊन नंद पाटील बायकोसह मथुरेस गेला व तेथें त्यानें वार्षिक कर सरकारांत भरला. नंद बायकोसहित मथुरेस आला आहे ही बातमी वसुदेवास कळली, तेव्हां त्यास आनंद व भीति वाटली. नंदानें कर भरल्यानंतर वसुदेवानें त्याची एकान्तीं भेट घेतली. त्यांनीं एकमेकांस कडकडून आलिंगन दिलें व बराच वेळ सुखदुःखाच्या गोष्टी केल्या. शेवटीं वसुदेव म्हणाला, " नंदा, तूं या आपल्या मुलास घेऊन लवकर घरीं जा. अनेक प्रकारचीं संकटें लहान मुलांवर येतात. यासाठीं या मुलाचें सावधपणानें रक्षण कर. तुझ्या येथून रोहिणीस मला सध्यां आणतां येत नाहीं. तर रोहिणीचा मुलगा संकर्षण व हा तुझा मुलगा कृष्ण यांचेबरोबर संगोपन कर. माझ्या नशिबीं पुत्रसुख नाहीं, पण तुला तें लाधले आहे. तूं खरोखर धन्य आहेस. पण नंदा, तूं लवकर घरीं जा; येथें राहूं नकोस. ही पहा पहाट झाली. हे डाव्या उजव्या बाजूनें पक्षी झाडांवर किलबिल शब्द करीत आहेत, आणि तुला घरीं जाण्यास सांगत आहेत. " वसुदेवाचा निरोप घेऊन नंद, यशोदेसह आपल्या गाडींत बसून तात्काळ निघाला. श्रीकृष्णाला गाडीचा धक्का बसूं नये, म्हणून बरोबर डोली घेतली होती; त्यांत त्यास घालून ती डोली भोयांच्या खांद्यांवर दिली. याप्रमाणें पहाटेस निघून यमुनेच्या कांठाकांठानें जाणाऱ्या रस्त्यानें जातां जातां प्रहर दिवसाच्या सुमारास गोवर्धन पर्वताच्या पायथ्यापाशीं वसलेलें गोकुळ नंदाच्या दृष्टीस पडलें. त्या ठिकाणीं थंड वारा झुळझुळ वाहत होता. गोकुळाच्या सभोंवार वेलींनीं वेष्टिलेले उंच उंच वृक्ष दिसत होते. ठिकाठिकाणीं दुभत्या गाईंचे कळप झाडाखालीं बसलेले होते. जमीन पांढरी असल्यामुळें व नदीकांठ दरडीचा नसल्यानें रस्त्यात किंवा नदीच्या पाणवठ्यांत खांचखळगे मुळींच नव्हते. मस्त बैलांनीं शिंगें घासल्यामुळें मोठाल्या वृक्षांच्या साली निघालेल्या होत्या. झाडांवरून पक्ष्यांचे नानाप्रकारचे सुस्वर शब्द निघत होते. त्यांतच गांवांतून गाईंचें हंबरणें ऐकूं येई, तेव्हां ह्या शब्दांची रम्यता अधिक वाढे. उंच, सुदृढ, सुस्वरूप, काळें पिवळें लुगडें नेसलेल्या गवळणी डोक्यावर पाण्याचीं भांडीं घेऊन नदीच्या पाणवठ्यावर उतरतांना दिसत होत्या. काविनें तांबडीं झालेलीं धोतरें नेसून कास मारलेले मजबूत गवळी ठिकाठिकाणीं काम करतांना दृष्टीस पडत होते. त्या सशक्त गोपांच्या उद्योगीपणामुळें गांव भरभराटीस आलेला दिसत होता. अशा

रीतींची त्या व्रजाची शोभा पाहून नंदास फार आनंद झाला व तो मोठ्या उत्सुकतेनें गांवांत शिरला. गांवाच्या शिवेवर रानांतील झाडें तोडून कोट-वजा टाकलीं होतीं. प्रत्येकाच्या झोपडीसमोर मोठमोठीं अंगणें असून त्यांत वासरांना बांधण्याकरितां खुंट रोविलेले होते व त्यांस दावीं बांधिलेलीं होतीं. जिकडे तिकडे वाळलेल्या शेणाचा चूर पडला होता. झोपडीजवळ प्रत्येकाचे गाडे पडलेले होते. प्रत्येक झोपडींत ताक घुसळण्याचा माथणींचा ध्वनि ऐकूं येत होता; व त्यांत घुसळणाऱ्या बायकांच्या हातांतील बांगड्यांचा सुस्वर शब्द मिसळत होता. झुलपें ठेवलेलीं गवळ्यांचीं धट्टीकट्टी पोरें दारोदारीं खेळत होतीं. जागजागीं तूप कढत होतें, त्याचा सुगंध हवेंत भरला होता. अशा त्या मनोहर व्रजांत नंद शिरला, तेव्हां वृद्ध गोप त्यास समोर आले. अंगांत कांचोळ्या घातलेल्या व कानांत रानटी फुलाचे तुरे खोवलेल्या गवळ्याच्या मुली यशोदेस सामोऱ्या आल्या. सर्वांचे मुजरे घेऊन व सर्वांस विचारपूस करून नंद आपल्या बायको व मुलासह आपल्या घरांत शिरला व तेथें रोहिणीचा पुत्र राम होता त्याच्या बरोबरच त्यानें आपल्या मुलास ठेविलें ( हरिवंश, वि० अ० ५ ).

लहान मूल जोंपर्यंत आपल्या पायावर उभें राहून इकडे तिकडे हिंडूं लागलें नाहीं, जोंपर्यंत तें केवळ आईबापाच्या आधीन असतें, तोंपावेतों त्याचें सुख व प्रेम आईबापांस पराकाष्ठेचें असतें. पशु, पक्षी, मनुष्य इत्यादि सर्व योनींत परमेश्वराने तोंपर्यंत आईबापाच्या हृदयांत निरपेक्ष व निरतिशय प्रेम ठेविलें आहे; व त्या प्रेमामुळेच त्यास निरुपम सुख होतें. मुठी वळलेल्या व उताण्या पडलेल्या आपल्या मुलाचें चुंबन घेतां घेतां आई-बापांची तृप्ति होत नाहीं. तशांत तें बाळ सशक्त, सुदर, वारंवार उगीच हंसणारें असेल तर आईबापांच्या आनंदास पारावार नसतो. नंदाची बायको यशोदा व वसुदेवाची स्त्री रोहिणी यांनीं याप्रमाणें परमावधीचें पुत्रसुख अनुभाविलें. आपल्या अत्यंत सुंदर मुलांस पाहून त्यांस अतिशय प्रेम वाटावें, वारंवार प्रेमपान्हा फुटावा व घडोघडीं त्यांनीं आपल्या प्रियपुत्रांस अंगावर घ्यावें. त्यांना मंगलवाद्य लावून न्हाऊं घालावें. त्यांस पाळण्यांत निजवून गाणीं म्हणावीं. तीं रडूं लागलीं म्हणजे त्यांस कडेवर घेऊन इकडे तिकडे मौज दाखवीत हिंडावें. आईच्या कडेवर बसलेलें मूल जणूं सिंहासनावर बसलें आहे असें आनंदांत असतें व आपल्या चिमुकल्या मुठीनें तिचें लुगडें घट्ट धरून

कितीही प्रयत्न केला तरी खालीं उतरत नाहीं. अशा वेळीं आईलाही जगताच्या मोलाचा ठेवा आपल्या जवळ आहे असेंच वाटतें. खरोखर कडेवर पुत्र घेतलेली स्त्री आनंदातिशयांत असून सर्वांस अत्यंत पूज्य असते. असें मातेवांचून अनन्यगतिक बाळपण संपून राम व कृष्ण रांगूं लागले, तेव्हां त्यांच्या आयांना पुरेपुरेसें झालें. डाव्या गुडघ्यानें रांगत रांगत गोठ्यांत गाईजवळ कृष्ण गेला म्हणजे यशोदेनें धांवत जाऊन त्यास उचलून घ्यावें व त्याच्या शेणानें व मातीनें माखलेल्या अंगाचा स्पर्श झाला म्हणजे निरतिशय सुख अनुभवावें. "कृष्णा, तूं फारच अचपळ आहेस. मला घरांत काम करूं तें सुचूं देत नाहींस," असें यशोदेनें त्रासून म्हणावें, पण अंतर्यामीं तिला मोठें कौतुक व प्रेम वाटावें. गाईच्या वासराच्या मागें जाऊन त्याची शेपटी कृष्णानें धरावी आणि त्या वासरानें आपल्या भोंवतीं त्यास फरफटत फिरवावें तेव्हां रोहिणी, यशोदा व गोपाळांच्या स्त्रिया हर्षानें मौज पहात उभे राहावे व हंसावें. "कृष्णा, तुला भूक लागली आहे, ये पी" असें म्हणत कृष्णाला यशोदेनें आपला पान्हा द्यावा व व कृष्णानें पितां पितां मध्येंच थांबून यशोदेकडे पाहात स्मित करावें. त्या वेळेस त्याचें बारीक दंतकलिका आलेलें हंसरें मुख पाहून यशोदेस पराकाष्ठेचें सुख व्हावें. क्रमाक्रमानें राम व कृष्ण उभे राहून इकडे तिकडे फिरूं लागले, तेव्हां तर त्यांचे सौंदर्य फारच मनोहर दिसूं लागलें. त्यांचें अंग धुळीनें किंवा शेणानें भरे, तेव्हां ते हत्तीच्या छाव्यासारखे दिसत. त्यांच्या तोंडावर डोकीचे केस पडत, तेव्हां मेघाच्छादित चंद्राप्रमाणें शोभा दिसे. त्यांना खोड्या करण्याची अतिशय हौस होती, पण या त्यांच्या खोड्यापासून लोकांस किंवा आईबापास आनंद व प्रेमच वाटे. भलत्याच वेळीं त्यांनीं लोकांचीं वासरें सोडावीं व गोपी ओरडल्या म्हणजे हंसावें. लोकांच्या घरांत जाऊन लोणी चोरून खावें व घरांत कांहीं मिळालें नाहीं तर लहान मुलांना रडवावें. शिंक्यावर लोण्याचें मडकें असल्यास हात पोंचत नाहीं म्हणून काठीनें मडकें फोडावें व खालीं पडलेलें लोणी आपण खावें. आणि दुसऱ्या पोरांना, नाहीं तर माकडांना खाऊं घालावें. अशा नानाप्रकारच्या खोड्या गांवांत करून कृष्णानें आईजवळ सावासारखें येऊन उभें राहावें. गोपींनीं येऊन यशोदेपाशीं गाऱ्हाणीं सांगावीं आणि "कृष्णास तुम्ही मारूं नका-पण नुसतें रागें भरा" असें म्हणावें, तेव्हां यशोदेला कृष्णाकडे पाहून रागे-

सुद्धां भरावेंसें वाटूं नये; तिनें नुसतें हंसावें. शेवटीं तिच्यावरच जेव्हां पाळी आली, तेव्हां मात्र तिला कृष्णाच्या खोडकरपणाचा राग आला. कृष्णाच्या पाठीवर मूल नसल्यानें कृष्ण मोठा झाला तरी आईच्या अंगावर पीत होता. एकदां यशोदा ताक करीत असतां कृष्णानें धांवत येऊन आईच्या पाठीशीं उभें राहून प्यायला दे म्हणून हट्ट घेतला. यशोदेनें प्रेमानें ताक करणें ठेवून कृष्णास मांडीवर घेऊन स्तनपान दिलें. इतक्यांत चुलीवर दूध उतास जाऊं लागलें, तें पाहतांच स्त्रीस्वभावानुरूप कृष्णास लोटून यशोदा चुलीकडे धांवली. तेव्हां कृष्णानें रागानें ताकाचें मडकें रवीनें फोडलें व एका खोलींत जाऊन स्वारी लपून बसली. " कृष्णा, तूं फारच माजला आहेस, ज्याचीं त्याचीं मडकीं फोडतोस, थांब, आज तुझी पक्की खोड मोडत्यें. " असें म्हणून रागानें लाल झालेली यशोदा कृष्णास शोधूं लागली. खोलींतून कृष्ण निसटून बाहेर पळाला, तेव्हां यशोदा बाहेर त्याच्या पाठीस लागली. पण तिच्या हातीं तो कसचा लागणार ! " बरं, कधीं तरी तूं माझ्या जवळ येशील " असें म्हणून बिचारी यशोदा थकून खालीं बसली. तेव्हां कृष्ण आपण होऊन तिच्या जवळ आला. यशोदेनें त्यास लागलीच घट्ट धरून आंगणांतील उखळापाशीं खेचीत नेऊन जेवढी दावी सांपडली तेवढी त्याच्या पोटाशीं बांधून त्यास उखळीशीं बांधून ठेविलें. " धांव आतां कसा धांवतोस तो " असें रागानें म्हणत यशोदा घरांत निघून गेली. आईनें आपल्यास वासरासारखें बांधलें असें पाहून कृष्ण वासराप्रमाणें हातापायांवर फिरूं लागला. तें उखळ उपटून तो बलवान् श्रीकृष्ण आपल्या मागें त्यास ओढीत आंगणाबाहेर दोन जुळे अर्जुनवृक्ष जुने झाले होते, त्यांच्या मधून मुद्दाम गेला. तेव्हां साहजिकच तें उखळ त्या झाडांस अडकलें. कृष्णानें जोर करून उखळ ओढलें तेव्हां ते दोन्ही वृक्ष उलट दिशेनें उलथून पडले. त्या वृक्षांच्या पडण्याचा आवाज ऐकून चारी बाजूंनीं मुलें, स्त्रिया व पुरुष धांवत आले. यशोदेला तो भयंकर प्रकार पाहून दे माय धरणी ठाय झालें . हा काय उत्पात आहे असें म्हणत व यशोदेला नांवें ठेवीत नंदानें कृष्णाला त्या उखळीपासून सोडविलें, व त्यास आलिंगन देऊन तिच्या हवालीं केलें. " कृष्णा, मी तुला आतां कधींही शिक्षा करणार नाहीं " असें म्हणत यशोदेनें प्रेमभरानें त्यास पोटाशीं धरिलें व त्यास पान्हा दिला. कृष्णाचें पोट दाव्यांनीं

बांधलें होतें म्हणून त्यास त्या दिवसापासून गोपी दामोदर म्हणूं लागल्या.* ( हरिवंश, वि० अ० ७ भाग. ८ १० ).

बळराम व कृष्ण असे दोनी होतां होतां सात वर्षांचे झाले. ( त्यांच्या वयांत पांचसहा महिन्यांचेंच अंतर होतें ) तेव्हां नंदानें त्यांस आपल्या धंद्याच्या धुळपाटीवर बसविलें. त्यास झुलपें ठेवून धोतरें नेसावयास दिलीं. बळराम गोरा होता, त्यास निळें वस्त्र दिलें. कृष्ण काळा होता त्यास पिंवळें वस्त्र दिलें. त्यांच्या हातांत काठ्या दिल्या. गळ्यांत वनमाळा घातल्या. डोकीवर मोरपिसांचे मुकुट ठेविले. आणि त्यास वासरें चारावयास पाठवून दिलें. प्रातःकाळीं न्याहरी करून गांवच्या लहान मुलांबरोबर त्यांनीं जावें, तें दोनतीन तासांनीं गांवच्या जवळच वासरें चारून त्यांस यमुनेचें पाणी पाजून परत आणावें. जेवणखाण झाल्यावर दोन प्रहरांनंतर पुनः जावें. असा कांहीं दिवस क्रम चालतां चालतां रामकृष्ण बारा वर्षांचे झाले. तेव्हां दिवसभर वासरें चारीत ते रानांतच राहूं लागले. शरीरानें सशक्त व रूपानें सुंदर असे ते वस्त्र नेसलेले, झुलपें ठेविलेले दोघे कुमार आतां आपल्या खेळाडू व प्रेमळ स्वभावानें संवगड्यांस फारच आवडूं लागले. त्यांजवर पूर्वी जशा त्यांच्या आया व गावांतील गोपी अतिशय प्रेम करीत होत्या, त्याप्रमाणें आतां त्यांजवर त्यांचे समवयस्क संवगडीही अतिशय प्रेम करूं लागले. सर्वांवर प्रेम करून सर्वांस सुख देणें, व कांहींना कांहीं चळवळ करणें हें श्रीकृष्णाच्या बालचरित्राचें किंबहुना सर्व चरित्राचें सार होय. त्यांनीं कानांवर मोरांचीं पिसें ठेवून किंवा कमळें ठेवून वेणू म्हणजे वेळूची बासरी वाजवावी व आपल्या संवगड्यांस रिझवावें. कधीं रानांत पल्लवाची शय्या करून त्याजवर पडावें व सोबत्यांसह सुखाचा अनुभव घ्यावा. कधीं संवगड्यांबरोबर सगळ्या रानभर लहान शिंगराप्रमाणें हुतूतू घालून धांवावें. कधीं गोफणींनीं धोंडे मारावे व झाडावरचीं फळें पाडावीं. कधीं संवगड्यांच्या अंगांवर घोंगड्या टाकून त्यांना गाई बैल कल्पून धांवडावें तर कधीं स्वतः गाईबैल व्हावें. रानांतील पक्ष्यांचे आवाज काढीत त्या पक्ष्यांना उत्तर देत त्यांच्या मागें लागावें. कोकिळांना व भृंगांना त्यांच्याच सारखा आवाज

* पूतनेस मारणें, शकट उलथा करणें इत्यादि कित्येक दुसरे चमत्कार श्रीकृष्णानें बाळपणीं केले, पण नंदास व गोपांस ते उत्पाद वाटले.

काढून संतापवावें किंवा थकवावें, पक्ष्यांच्या छायेबरोबर पळावें. बगळ्या-बरोबर बकध्यान करून बसावें मोरांबरोबर नाचावें. माकडांबरोबर झाडा-वर चढावें व त्यांच्याबरोबर जांभया द्याव्या किंवा दांत विचकावे. बेडकां-बरोबर दोन्ही पायांनीं एकदम उडी मारावी, प्रतिछाया पाहून वेड्या-वांकुल्या दाखवाव्या. प्रतिध्वनि ऐकून त्यांस वेडीवाकुडीं उत्तरें द्यावीं. सारांश, नानाप्रकारच्या लीला करून त्यांनीं व्रजांतील समवयस्क मुलांना खेळवावें व खेळावें, आनंदवावें व आनंदावें. खरोखर श्रीकृष्णाबरोबर ज्या ज्या गोपांच्या मुलांनीं या प्रकारची क्रीडा केली ते योग्याहून धन्य होत. त्यांचें लक्ष नेहमीं कृष्णावर लागलेलें असे. कृष्णाची मूर्ति त्यांच्या डोळ्यांसमोर नेहमीं असून मनांतही सतत भरलेली असे. कृष्ण जरा कोठें दिसेनासा झाला कीं, त्यानीं कावरेंबावरें व्हावें. कृष्ण दिसला कीं, धांवून ' मी पहिल्यानें शिवलों, ' ' मी पहिल्यानें शिवलों ' म्हणून त्यास प्रीतीनें स्पर्श करावा. कृष्ण आपल्यास सकाळीं केव्हां हांक मारावयास येईल असें त्यास व्हावें. सायंकाळीं गाई घेऊन परत गांवांत येतांना आतां आप-णास कृष्णाचा वियोग होईल या कल्पनेनें त्यांस दुःख व्हावें. याप्रमाणें कृष्णावर अत्यंत प्रेम करणारे व कृष्णाशीं नेहमीं खेळ खेळणारे ते गोपपुत्र योग्याहूनही धन्य नव्हेत काय ? ( हरिवंश, वि० ६ भा० १२ ).

कांहीं दिवसांनीं नंदगोपाने तें व्रजाचें ठिकाण सोडून दुसरीकडे जाण्याचा विचार केला. हल्लींही गवळी बहुधा एके ठिकाणीं दहापाच वर्षे रहात नाहींत. पूर्वीं ज्या वेळेस हिंदुस्थानांत वनें विपुल होतीं, त्या वेळेस तर ते मुळींच रहात नसत. घरेंदारें करून किंवा शेतीवाडी करून घोषांनीं राहूं नये; तर हंसाप्रमाणे नव्या नव्या हिरव्या गवताच्या ठिकाणीं फिरावें अशी त्यांची समजूत होती. एका ठिकाणीं राहून भोंवतालचें रान तुडून आकाशासारखें उजाड झालें, म्हणजे तेथें गाईंस किंवा मनुष्यांस विश्रांति घेण्यास ठिकाण किंवा पिण्यास पाणी उरत नाहीं. लांकूडफाटें, किंवा गवतकाडी आणण्याकरितां दूर जावें लागतें. त्याच त्याच जागीं गाई चारल्या लागल्या-मुळें गवताला शेणामुताची घाण येऊं लागून गाई आनंदाने गवत खात नाहींतशा होतात. गांवांत स्थायिक वस्ती होऊन लोक लाकडें, गवत व जंगलांच्या भाज्या विकूं लागतात, व त्यांचा संचय करूं लागतात. सारांश जंगलांतील गौळवाड्याची सर्व प्रकारची मौज व सोय नाहींशी होते.

यामुळें गवळी लोक पूर्वकाली आपला गौळवाडा दहापांच वर्षांनीं हालवीत. त्यांची राहण्याची तऱ्हाही अशा हालचालीस अनुकूल असे. मोठमोठालीं घरें ते बांधीत नसत. त्यांजवळ नेहमीं गाडे तयार असून गाड्यांवर वाहून नेतां येईल इतकीच संपत्ति त्यांजवळ असे. पाहिजे तेथें मुक्काम करून पुनः नवीन गौळवाडा तयार करण्यास त्यांस फार वेळ लागत नसे. असो. त्या ठिकाणची उजाड स्थिति झाल्यानें व तेथें कृष्णावरून तीन–चार अरिष्टें गेल्यानें व अलीकडे तेथें लांडग्यांचा नवीन त्रास उत्पन्न झाल्यानें नंदानें व्रज उठवून दुसरीकडे नेण्याचा, वृद्ध वृद्ध गोपांच्या सल्ल्यानें निश्चय केला. दुसऱ्या दिवशीं पहाटेस उठा, गाड्या जोडा, सामान भरा, अशी एकच ओरडाओरड त्या व्रजात सुरू झाली. गोपांनीं आपली चीजवस्त, भांडींकुंडीं गाड्यांवर घातलीं. गोपस्त्रियांनीं रव्या व ताकाच्या माथण्या डोक्यावर घेतल्या. गोपांनीं दावीं व खुंटे बांधून डोक्यावर घेतले. गाईंचे कळप एकत्र पुढें चालूं लागले. त्यांमागून काळीं, पिंवळीं, तांबडीं लुगडीं नेसलेल्या गोपींची रांग इंद्रधनुष्याप्रमाणें शोभूं लागली. मध्यंतरीं एका रथांत बसून यशोदा व रोहिणी आपल्या दोघां सुंदर पुत्रांस घेऊन चालल्या. श्रीकृष्णाच्या लीलांचीं गाणीं गोपी व यशोदा–रोहिणी मधुरस्वरानें गात होत्या. मागून सामानाच्या गाड्यांबरोबर डोक्यावर दाव्यांचीं ओझीं घेतलेले व पाठीस धनुष्यबाण लावलेले गोप चालले, ते चालत्या वृक्षाप्रमाणें शोभूं लागले. याप्रमाणें तो समूह समुद्रासारखा उसळत व आवाज करीत जाऊं लागला. उत्तरेकडे जातां जातां वृंदावन नांवाच्या एका नवीन वनांत ते जाऊन पोहोंचले. हें वन त्यांच्या वसतीला फारच योग्य होतें. या वनाच्या मध्यभागांतून यमुना नदी जात असून चोंहींकडे शीतल वारा वाहात होता. चारी बाजूंना कदंबांची झाडी असून अगदीं तोंड न लागलेलीं व गवत वाढलेलीं शेंकडों कुरणें त्यांत होतीं. पूर्वेकडे गोवर्धन टेकड्यांची रांग आली असून त्याचें एक उच्च व रम्य शिखर नंदनवनांतील मंदार पर्वताप्रमाणें शोभत होतें. गोवर्धनाच्या पायथ्याशीं एक भाण्डीर नांवाचा हजार खोडांचा जुनाट वटवृक्ष असून त्याच्या छायेंत हजारों गाई बसतील असा त्याचा विस्तार होता. बायकांच्या डोकीवरील भांगाप्रमाणें शोभा देत वृंदावनामधून चाललेली यमुना, तो विस्तीर्ण भाण्डीरवृक्ष व तें गोवर्धनाचें उंच शिखर पाहून गोपगोपींस मोठा आनंद झाला. त्यांनीं यमुनेच्या कांठीं एक रम्य जागा पाहून तेथें आपला

व्रज कायम केला. चारी बाजूंना वृक्ष व कांटेरी झाडें असल्यानें त्या अर्ध योजन लांब पडलेल्या व्रजास सहजच कोटासारखें आवरण पडलें होतें. त्याच्या आंत त्या गोपांनीं आपले गाडें अर्धचंद्राकार लावले. जो तो आपल्या गाड्याच्या शेजारची जागा साफ करून तेथें आपलें खोपट उभारण्याच्या उद्योगास लागला. आपल्या खोपट्याजवळील जागा साफ करून त्यांनीं तेथें खुंट रोवले व आपलीं गाईवासरें बांधलीं. घरें पूर्वाभिमुख केलीं. घरासमोरील जागा बायकांनीं सारवून काढून तेथें त्यांनीं सडा टाकल्या. कांहीं बायका विस्तव पेटवूं लागल्या, तर कांहीं यमुनेचें पाणी आणूं लागल्या. कोणी माथण्या धुऊन स्वच्छ करूं लागल्या, तर कित्येक उखळें पुरूं लागल्या. सारांश, लहानथोर सर्व गोपगोपी कामांत चूर होऊन त्यांनीं तो गौळवाडा लवकरच तयार केला. त्या घोषाभोंवतीं अरण्य असल्यानें तो फार शोभिवंत दिसूं लागला. त्या अरण्यांत मधुर फळें, कंदमुळें व उदक यांची समृद्धि होती. पक्ष्यांच्या सुस्वर शब्दांनीं ते अरण्य दुमदुमून गेलें होतें. अशा त्या रम्य वृंदावनांतील व्रजांत ते गोप सुखानें व आनंदानें राहूं लागले. राम व कृष्ण आपल्या संवगड्यांसह पूर्वीप्रमाणें वासरें घेऊन वनांत चारावयास जाऊं लागले. ग्रीष्मऋतु असल्याने ते यमुना नदींत बारंवार उड्या टाकूं लागले. भाण्डीर वटाखालीं जाऊन खेळूं लागले व दुपारच्या प्रहरीं त्याच्या छायेंत विश्रांति घेऊं लागले. याप्रमाणें त्या बालगोपालांनीं तें सर्व वन थोड्याच दिवसांत पायाखालीं घातलें ( हरिवंश, वि० ९ ).

क्रमानें रामकृष्णांची कौमारदशा संपून पौगंड दशा सुरू झाली. मनुष्याच्या एकंदर आयुष्याचें जसे बाळपण, तरुणपण आणि वृद्धपण असे तीन भाग पडतात, त्याप्रमाणें बाळपणाचेही तीन विभाग पडतात. सात वर्षांपर्यंत मुख्य बालदशा, चौदा वर्षांपर्यंत कौमारदशा आणि चौदापासून एकवीस वर्षांपर्यंत पौगंड दशा. धर्मशास्त्रानें व कायद्यानें बालपणाचे असेच तीन विभाग मानिले आहेत. सात वर्षांपर्यंत मुलास अपराधाचा किंवा प्रायश्चित्ताचा कायदा मुळींच लागू नसतो. त्यानें चोरी केली तर ती चोरी नव्हे, लबाडी केली तर ती लबाडी नव्हे. सातव्या वर्षापासून चौदाव्या वर्षांपर्यंत जशी त्याची बुद्धि पक्क होऊन पाप–पुण्य असूक्त–सूक्त त्यास समजूं लागतें त्याप्रमाणें तो पापी किंवा अपराधी ठरतो. चौदा वर्षांनंतर जरी तो फौजदारी कायद्यानें बांधलेला आहे तरी एकवीस ( किंवा अठरा )

वर्षांचा होईपर्यंत दिवाणी कायद्यानें तो बांधलेला नाहीं. त्याची बुद्धि पूर्ण पक्क झालेली नसून त्यास आपलें हित-अनहित समजत नाहीं. या कारणानें तो आपल्या मिळकतीचा पूर्ण मालक मानला जात नाहीं. या तीन दशेंत मुलांची बुद्धि जशी कमीअधिक पक्क होत जाते, त्याचप्रमाणें त्यांचें शरीरही कमीअधिक वाढत जातें. अगदीं लहानपणीं मुलें जरी लठ्ठ असतात तरी तीं कौमार दशेंत कृश होतात, आणि पौगंड दशेंत पुन्हा लठ्ठ होतात, किंवा कृश राहतात. चौदा वर्षें संपून पौगंड दशा लागली म्हणजे मुलें सरासर वाढत जातात हें तर अनेकांच्या अनुभवांत असेल. या वयांत मुलें व्हायचीं तितकीं उंच होऊन त्यांच्या अंगांत भराभर शक्ति येते आणि त्यांच्या शरीर-यष्टीस एक प्रकारचें मोहकत्व प्राप्त होतें मुलगा मूळचा अशक्त किंवा कुरूप असला तरी या वयात त्याच्या तोंडावर बाल्याचें व तारुण्याचें मिश्रण होऊन एक प्रकारची कांति चमकूं लागते. रामकृष्णांची अशी पौगंड दशा सुरू झाली, तेव्हां ते सरसर वाढून उंच झाले. त्यांचें शरीर अत्यंत सुदृढ होऊन मोहक दिसूं लागलें. त्यांच्या जात्या अति सुंदर वदनावर बालच्छवि आणि यौवनच्छवि यांचा मिलाफ होऊन नजर ठरेनाशी झाली. आतां ते मोठे होऊन इतर गोपांप्रमाणें गाईंनाही चारावयास नेण्यास योग्य झाले असें समजलें जाऊन ते आपल्या वाढलेल्या संवगड्यांबरोबर व इतर मोठाल्या गोपांबरोबर गाई चारण्यास घेऊन जाऊं लागले. वाघ, लांडगे वगैरे घातुक जनावरें आल्यास त्यांस मारण्याकरितां त्यांच्या पाठीस धनुष्य-बाण असत. प्रसंग अतिच बिकट आल्यास लोकांस इषारा देण्या-करितां ते आपल्या जवळ शिंगही बाळगीत. गोप-वेणू अथवा पांवा उत्तम रीतीनें वाजवून ते गाई चरत असतां त्यांस रमवूं लागले. गळयात फुलांचे हार घालून व डोक्यावर मयूरपिच्छांचे मुकुट घालून ते गोपाळांबरोबर नाचूं व गाऊं लागले. कधीं गोपाळांना नाचवून रामकृष्णांनीं बासरी वाजवून हातांनीं ताल धरावा तर कधीं गोपाळांच्या तालावर व वाजवण्यावर आपण नाचावें. भांडीरवटाखालीं जाऊन गोपांबरोबर त्यांनीं नानाप्रकारचे मोठे-पणचे खेळ खेळावे, गायन करावें किंवा तुंबीवाद्य वाजवावें. त्यांचा सर्वांत अत्यंत प्रियकर खेळ म्हटला म्हणजे कुस्तीचा असे. त्या वेळीं हिंदुस्थानां-तील आर्य लोकांस कुस्तीचा फारच नाद होता व कुस्तीची कला त्या वेळीं हिंदुस्थानांत अत्यंत उत्कर्षास पोहोंचली होती. हल्लींही उत्तर हिंदुस्थानांत

लोकांस कुस्तीचा बराच नाद असून कुस्तीच्या कसबांत ते जगतापुढें आहेत असें म्हटलें तरी चालेल. प्राचीन काळीं हिंदुस्थानांतील आर्य विशेषतः क्षत्रिय व वैश्य कुस्तीच्या कामांत फारच निपुण असत. त्याच्यात कुस्ती अथवा नियुद्ध कधीं कधीं प्राणांतिकही होत असे. कंस, जरासंध, इत्यादि राजांच्या पदरीं असें प्राणांतिक युद्ध खेळणारे मल्ल तयार असत व जरासंधासारखे राजे स्वतःही अशा प्रकारचें नियुद्ध खेळण्यास मागेंपुढें पाहत नसत. गोपाचीं तर मल्लविद्या घरची होती. त्यांस पाहिजे तितकें गाईचें ( म्हशीचें नव्हे ) दूध प्यावयास मिळे. गाई चारण्याचा धंदा फुरसतीचा व थोड्या मेहनतीचा असल्याने त्यांस मल्लविद्या शिकण्यास कोणतीच अडचण नसे. साहजिकच राम व कृष्ण हे तत्कालीन मल्लविद्या शिकून भ्रामण, लंघन, क्षेपण, आस्फोटन, विकर्षण इत्यादि नियुद्धाच्या कलात निष्णात झाले व त्यांच्या अगात हत्तीसारखे बळ खेळूं लागले. ते अवतारी पुरुष असल्यानें त्याच्या अंगात अमानुष शक्ति सहज होती ही गोष्ट वेगळी. पण मनुष्यास शारीरिक शक्ति कशी प्राप्त होते ही गोष्ट त्यांनीं आपल्या उदाहरणावरून व्यक्त केली. ज्यास बालदशेंत आईच्या अंगावर पुष्कळ दिवस प्यावयास मिळालें व गाईचें लोणी पाहिजे तितकें खावयास मिळालें, जो कौमारदशेत धावणे, झाडावर चढणें, नदींत पोहणे इत्यादि खेळ गांवाच्या बाहेरच्या शुद्ध हवेत मनसोक्त खेळला व गाईचें दूध यथेष्ट प्यायला तो जर पौगंडदशेत मल्लविद्या शिकेल निदान शारिरीक मेहनत करील तर तो अप्रतिम शक्तिमान् होईल हें रामकृष्णानीं आपल्या चरित्रावरून सुचविलें. असो. सोळासतरा वर्षांच्या त्या दोघा कुमार मल्लाची अमानुष शक्ति पाहून गोपाळ तोंडात बोटे घालूं लागले, व त्याचें ते पौगंडदशेतील अलौकिक सौंदर्य पाहून प्रत्येक स्त्री–पुरुष मोहित होऊं लागला. त्यांत त्यांनीं दोनतीन शक्तींच्या अतर्क्य लीला केल्या. त्या पाहून तर हे दोन देव अवतार घेऊन आपल्या व्रजात आले आहेत असेच लोक मानूं लागले ( भाग० १५–१८, हरि० वि० ११ ).

व्रजाच्या उत्तरेस एका कोसावर यमुनेच्या प्रवाहांत एक प्रचंड व खोल डोह होता. त्यांत एक अंजनराशीसारखा काळाकुट्ट महाभयंकर सर्प रहात असे. पक्ष्यांचा राजा गरुड याच्या भीतीनें हा कालिया सर्प या डोहांत दडून राहिला होता. त्याच्या विषाने त्या डोहाचें पाणी अत्यंत दूषित झालें

होतें. त्याच्या भीतीनें व त्याच्या दर्पानें त्या प्रदेशांत पशु किंवा पक्षी फिरकत नव्हता. जिकडे तिकडे भयंकर रान वाढलें असून कालियाचे सचिव त्या रानाचें रक्षण करीत. या सर्पास तेथून हाकलून लावून त्या डोहाचें पाणी निर्दोष व सर्वास कल्याणकारक करावें असा आपल्या मनाशीं निश्चय ठरवून श्रीकृष्ण एके दिवशीं एकटाच गाई घेऊन निघाला. यमुनेकडे कटाक्ष फेकीत तो वृषभनेत्र श्रीकृष्ण कालियाच्या डोहावर पोंचला. डोहाच्या तटावर वाढलेल्या एका उंच कदंब वृक्षावर चढून त्यानें आपले दंड जोरानें थोपटले. तेव्हां त्या दंड थोपटण्याच्या नादानें तें वन दणाणून गेलें. श्रीकृष्णानें मग एक आरोळी ठोकून त्या डोहांत बेधडक उडी टाकली. त्याबरोबर त्या डोहाचें पाणी चोहोंकडे जोरानें उसळलें. त्या आवाजानें व पाणी उसळल्याने कालिया खवळून जाऊन पाण्यावर आला. त्याचे डोळे रागानें लाल झाले होते. त्याच्या पांच मुखांतून दहा भयंकर जिभा बाहेर धांवत होत्या. त्याच्या पांचीं फणा टोकारलेल्या असून त्याच्या नाकांतून विषारी फूत्कार बाहेर पडत होते. त्याने आपल्या प्रचण्ड देहानें श्रीकृष्णास एकदम विळख्या घातला, व त्यास दंश करण्याकरितां त्याजवर आपल्या फणा मारल्या. पण श्रीकृष्णानें यत्किंचित्‌ही न घाबरतां शिताफीनें दंश होण्यापूर्वीच आपल्या वज्रहस्तानें त्याची नरडी धरिली. इतक्यांत श्रीकृष्णाचा माग काढीत त्याचे गोपाल सवंगडी डोहावर पोंचले. त्यांनी तो भयंकर प्रकार पाहून मोठा आक्रोश केला. " कृष्णाला वांचवा, कृष्णाला वांचवा " असा आक्रोश करीत व शोक करीत ते व्रजांत धांवत परत आले व सर्व लोकांस त्यांनीं ती कृष्णकालियांच्या युद्धाची हकीकत सांगितली. ती ऐकून नंद व यशोदा वज्राचा आघात झाल्याप्रमाणें व्याकुळ होऊन त्यांनीं डोहाकडे धाव मारली. त्यांचे पाय दुःखानें व निराशेनें लटपटत होते. त्यांच्या मागून व्रजांतील यच्चयावत्‌ गोपगोपी आक्रोश करीत धांवल्या. ते डोहावर पोंचून पाहतात तों श्रीकृष्णास कालियानें गच्च वेष्टून टाकिलें आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां ते मोठ्यानें शोक करूं लागले ! "हायरे हाय ! आम्ही मेल्याहूनही मेले झालों. आमच्या लाडक्या बाळाला या कालिया सर्पानें वेढून टाकलें आहे. आतां आमचा प्रियकर कृष्ण कसा सुटतो ! हा दुर्दैवी नंद कृष्णाच्या मुखाकडे दृष्टि लावून कसा अचेतन दगडासारखा उभा आहे ! हे यशोदे, तूं खरोखरच अभा-

गिनी आहेस; तुझ्या नाशिवीं पोटचा गोळा समोर मरतांना पाहण्याचें आलें आहे ! यशोदे, दामोदराला घेतल्याशिवाय आम्ही परत जाणार नाहीं. श्रीकृष्ण मेला तर आम्हीही या सर्पाच्या डोहांत उडी टाकून मरूं. '' अशा प्रकारचा गोपींचा विलाप ऐकून व आपल्या मातापितरांची ती मृत्युतुल्य अवस्था पाहून श्रीकृष्णानें त्या सापाची नरडी आपल्या सर्व सामर्थ्यानें दाबली. त्याबरोबर तो साप गतप्राण झाल्यासारखा होऊन त्याचे विळखे ढिले पडले. त्याच्या तोंडांतून विष व रक्त भडभड ओकून पडलें, व तो पाण्यावर निश्चेष्ट पसरला. इतक्यांत श्रीकृष्ण त्याच्या मधल्या मस्तकावर आरोहण करून नाचूं लागला. तेव्हां त्याचें डोकें थडाथड पाण्यांत बुडूं लागलें. त्याची ती मृततुल्य अवस्था पाहून त्याची बायकापोरें व माणसें श्रीकृष्णास साष्टांग नमस्कार घालून शरण आलीं व त्यांनीं काकळूत करून आपल्या पतीचें जीवदान मागितलें. आपल्या बंधु-स्त्रीसह यमुनेच्या डोहांतून तात्काळ निघून समुद्रांत जाण्याची ताकीद करून श्रीकृष्णानें त्या कालियास जीवदान दिलें व त्याच्या मस्तकावरून उतरून तो किनाऱ्यावर आला. श्रीकृष्णाच्या पायांवर डोकें ठेवून व त्याची अनन्यभावानें स्तुति करून कालिया सर्प आपल्या गणगोतांसह लागलींच तेथून चालता झाला. हा सर्व प्रकार नंदयशोदा व गोपगोपी आश्चर्यानें व विस्मयानें पहात होत्या. श्रीकृष्णाचें त्या वेळचें दिव्यरूप व सामर्थ्य पाहून हा प्रत्यक्ष स्वर्गीचा श्रीविष्णूच अवतार घेऊन आपल्यांत आला आहे असें त्यांस वाटलें. त्यांनीं श्रीकृष्णास मनोभावानें प्रदक्षिणा घालून निरतिशय प्रेमानें स्पर्श केला. यशोदेनें तर माझा बाळ मला जिवंत मिळाला असें म्हणत त्याच्या कंठास मिठी मारली. मग ते सर्व लोक आनंदानें श्रीकृष्णाचीं गाणीं गात त्यास घेऊन व्रजांत परत आले. असो. कालियाच्या डोहाप्रमाणेंच दुसरें एक ठिकाण त्या वृंदावनांत भयंकर होतें. गोवर्धन पर्वताच्या उत्तरेस यमुनेच्या कांठीं एक तालवन होतें त्यांत एक रानगाढवांचा कळप माजला असून तो मनुष्यांस व जनावरांस त्या वनांत फिरकूं देत नव्हता. त्या गर्दभाचें रूप घेतलेल्या धेनुकासुरास व त्याच्या अनुयायांस रामकृष्णांनीं ठार मारून तें वन मनुष्यांस व गाईंस निर्भय केलें. तसेंच भाण्डीरवटापाशीं एक प्रलंब नांवाचा राक्षस गवळ्याच्या वेषानें रामकृष्णांच्या संवगड्यांत शिरला व ( हरिणाक्रीडन ) एकमेकांच्या पाठीवरून हरिणासारखी उडी मारण्याच्या

खेळांत रामास पाठीवर घेऊन अरण्यांत पळूं लागला. तें पाहतांच रामानें त्याच्या डोक्यावर इतक्या जोरानें बुक्की मारिली कीं, तो तात्काल गतप्राण होऊन खालीं पडला. या पराक्रमापासून रामास बलदेव, बलराम व प्रलंबहन् म्हणूं लागले. याप्रमाणें अमानुष शक्तीचीं कृत्यें करून रामकृष्णांनीं तें वृंदावन गोपांना निर्भय केलें ( ह० वि० १२।१३।१४ ).

या पराक्रमांपासून रामकृष्णांवर व्रजांतील सर्व लोकांची विलक्षण भक्ति जडली. श्रीकृष्णास तर, गर्गऋषींनीं एकदां नंदास सांगितल्याप्रमाणें, हा विष्णूचाच अवतार आहे असें समजून सर्व व्रजवासी अनन्य भावानें भजूं लागले. आजपर्यंत ते त्याजवर अत्यंत प्रीति करीत होते. विशेषत: गोपस्त्रिया त्यांजवर निरतिशय प्रेम करीत असत. कारण प्रेमाचा सांठा परमेश्वरानें स्त्रियांजवळ ठेविला आहे. पण आजवरचें त्यांचें श्रीकृष्णावरचें प्रेम निराळें व यापुढचें निराळें. आजवर यशोदा, रोहिणी व इतर समवयाच्या स्त्रिया त्याजवर मातृप्रेम करीत होत्या. त्यांहून कमी वयाच्या स्त्रियां भगिनीप्रेम करीत होत्या. अविवाहित गोपकन्या " नंदगोपसुतं देवि पतिं मे कुरु जन्मानि " अशी कात्यायनी देवीजवळ प्रार्थना करीत होत्या. पण यापुढें या निरनिराळ्या प्रकारच्या प्रेमांस एकच विलक्षण स्वरूप प्राप्त झालें. तें प्रेम आतां ऐहिक नसून पारमार्थिक स्वरूपाचें झालें. माता–पुत्र, बंधु–भगिनी, पति–पत्नी इत्यादि सर्व ऐहिक नातीं श्रीकृष्णाच्या ठिकाणीं लयास गेलीं. श्रीकृष्णास पाहिलें म्हणजे एका प्रकारचें अनिर्वचनीय सुख पाहणारास होऊं लागलें. श्रीकृष्णाची कलमवृष्टि करणारी दृष्टि पडली म्हणजे प्रत्येक जण मोहित होऊन त्याची समाधि लागे. श्रीकृष्ण दिसेनासा झाला म्हणजे स्त्री–पुरुषांस जग शून्य भासूं लागे. श्रीकृष्ण सकाळीं गाई घेऊन चारावयास जाई किंवा संध्याकाळीं बासरी वाजवीत गाई घेऊन परत येई, त्या वेळेस त्याचें दर्शन घेण्याकरितां आबालवृद्ध गोपगोपी आपआपल्या दरवाज्यांत उत्सुकतेनें वाट पाहात उभे राहत व श्रीकृष्णाचें दर्शन झालें म्हणजे आनंदभरानें देहभान विसरून जात. याप्रमाणें सांजसकाळ योग्यांसही न मिळणारें परमानन्दसुख व्रजवासी जनांस मिळूं लागलें. तेव्हां त्याची मुखकांति ब्रह्मतेजाप्रमाणें झळकूं लागली. नित्याचे व्यवहार करीत असतांही ते श्रीकृष्णाचें ध्यान करून भक्तिरसांत तरंगूं लागले. मनुष्यें तर राहूं द्या, मुकीं जनावरें सुद्धां श्रीकृष्णा-

वर निरतिशय प्रेम करूं लागलीं. श्रीकृष्णाचें दर्शन घेण्यास व त्याचा शब्द ऐकण्यास गाईवासरें सुद्धां उत्सुक होऊं लागलीं. श्रीकृष्णाची बासरी ऐकलीं म्हणजे सर्व जनावरें चरतां चरतां थांबत व हर्षानें चित्रासारखीं तटस्थ होत. श्रीकृष्णानें गाईना किंवा वासरांना हाक मारली म्हणजे तीं रोमांचित होऊन पुच्छ वर करून त्याजकडे धांव घेत. सारांश, श्रीकृष्णाच्या दिव्य मोहक शक्तीचा प्रभाव सर्व व्रजात पसरून सर्व प्रेमाहून श्रेष्ठ असें जें भक्तिप्रेम तें श्रीकृष्णमुखचंद्रदर्शनानें पर्वकाळच्या समुद्राप्रमाणें व्रजांत उचंबळूं लागलें. श्रीकृष्ण आमचा देव, दामोदर आमचा ईश्वर, अशा भावनेनें गोपगोपी त्याचें अर्धें वचन ऐकण्यास उत्सुक व तयार झाल्या.

असो. कांहीं दिवसांनीं पर्जन्यकाळ संपून शरदृतु सुरू झाला. प्रियक वृक्षांच्या पांढऱ्या फुलांनीं व बाणासनांच्या काळ्या फुलांनीं वनराजींना कांहीं विलक्षण शोभा आली. केतकीचीं बनें फुलल्यामुळे केवड्याच्या घमघमाटानें वनभाग भरून गेले. यमुनेच्या चिखलानें भरलेल्या कांठावर हंसांचे व सारसांचे समूह बसूं लागल्यानें आधीच रम्य असलेल्या यमुनेस विशेष शोभा आली. कमळे असंख्य फुललीं असल्यानें जलाशय निरभ्ररात्रीं अधिक चमकणाऱ्या चांदण्यांनीं भरलेल्या आकाशासारखे दिवसा शोभूं लागले. कणसे पिकल्यानें पिवळीं झालेलीं शेते व मत्त झालेल्या क्रौंचाचे सारखे चालणारे आवाज यामुळे पृथ्वीला हळद लागून जणुं काय तिचा विवाह मांडला आहे असे वाटूं लागलें. गाई पुष्ट होऊन द्विगुणित दूध देऊं लागल्या. बैल मस्त होऊन द्विगुणित डुरकण्या फोडूं लागले. मोर मात्र गर्वरहित होऊन निःशब्द झाले व त्याचे डोळे पृथ्वीवर जिकडे तिकडे गळलेले दिसूं लागले. मेघही भग्नदंत कुंजराप्रमाणें विद्युद्रहित व जलहीन झाले; अथवा सर्वस्व दान केल्याने शांत झालेल्या मुनीप्रमाणे मेघ शुभवर्चस् झाले होते काय ? क्रमाने आकाशातील मेघही नाहींसे झाले; पृथ्वीचा चिखलही वाळून गेला आणि पाणी निर्मळ व प्रसन्न झालें. साराश, जसा तीनही आश्रमांचा मल ईश्वरभक्तीने नाहींसा होतो, त्याप्रमाणें आकाश, पृथ्वी व जल यांचा मल शरदृतूनें नाहींसा झाला. वायूही शांत होऊन मंद वाहूं लागला, व मेघांच्या तडाख्यांतून सुटलेला सूर्य शरदृतूच्या आगमनानें प्रज्वलित झालेलें आपलें तेज प्रकट करूं लागला. चंद्रही निरभ्र शारदी रात्रीं आपल्या पूर्ण मोहकत्वानें सम्रा-

टाच्या श्वेतछत्राप्रमाणें शोभूं लागला ( ह० वि० १५-१६, भा. २०-२१ ).

अशा त्या शरदृतूच्या प्रारंभीं व्रजांतील गवळी शक्रोत्सव करण्यासाठीं तयारीस लागले. ' हा उत्सव तुम्ही कशासाठीं करितां ' असा श्रीकृष्णानें प्रश्न केला; तेव्हां एक वृद्ध गोप त्यास म्हणाला, " कृष्णा, इंद्र हा मेघांचा राजा आहे. त्याच्या आज्ञेनें मेघ पृथ्वीवर वृष्टि करितात आणि तिला तृण-धान्यांनीं समृद्ध करितात. इंद्रास आपण यज्ञयागांनीं संतुष्ट केलें म्हणजे तो आपल्यास याप्रमाणें वृष्टि करून संतोष देतो. इंद्रानें विपुल वृष्टि केली म्हणजे तृणधान्यें उगवून वाढूं लागतात. नवीन उगवलेलें हिरवें गवत खाऊन गाई–बैल पुष्ट होतात; आणि गाई विऊन पुष्कळ दूध देतात. मेघ जेथें याप्रमाणें वृष्टि करीत नाहींत, तेथें दुष्काळ पडून लोकांचे पाण्यावांचून व धान्यावांचून फार हाल होतात. यासाठीं राजेलोक, आम्ही गोप, किंबहुना सर्व मनुष्यें पावसाळा संपला म्हणजे मोठे उत्सव करून इंद्राची आराधना करतों ! " तेव्हां श्रीकृष्ण गोपांस म्हणाला, "तुम्ही इंद्राचा उत्सव करतां हें बरोबर नाहीं. ज्याची जी वृत्ति असेल त्यानें त्याचें पूजन करावें हें योग्य आहे. एका शेटची नोकरी करून दुसऱ्याची पूजा करणें हें एका पुरुषाची बायको असून दुसऱ्याच्या म्हणजे जाराच्या नादीं लागलेल्या असतीच्या कृत्याप्रमाणें इहलोकीं व परलोकीं अनर्थाला कारण आहे. जेथ-पर्यंत शेती असते तेथपर्यंत गांवाची शीव असते. या शिवेच्या पलीकडे जंगलें व जंगलांच्या पलीकडे डोंगर. जंगलें व डोंगर, हीं आपल्या उप-जीविकेचीं ठिकाणें आहेत. सिंह, वाघ, लांडगे वगैरे उग्र रूपें घेऊन डोंगर-दऱ्यांतून विहार करतात आणि वनांचें रक्षण करतात. गाईचें रक्षण करणें हें आपलें स्वकर्म आहे व ते गिरि व वनें यांजवर अवलंबून आहे. ब्राह्मण जसें वेदाचें पूजन करतात व कृषि करणारे वैश्य नांगराचें करतात, त्या-प्रमाणें आपण गाईचें व गिरीचें पूजन केलें पाहिजे. तर जें दूध, दहीं, वगैरे सामान तुम्हीं जमा केलें आहे, त्याच साहित्यानें तुम्ही गिरियज्ञ करा. हा पहा गोवर्धन पर्वत इंद्रधनुष्याच्या रंगाप्रमाणें चित्रविचित्र रंगांच्या पक्ष्यांनीं शोभिवंत दिसत आहे. याजवरचे वृक्ष घराएवढाले मोठाले असून फळा-पुष्पांनीं भरलेले आहेत. या पर्वताचें आपण पूजन करूं या; व तसेंच या गाईचेंही पूजन करूं या. ह्यांच्या गळ्यांत शरदृतूंतील फुलांच्या माळा घालून व शिंगांना तुरे व मोरपिसें बांधून, गळ्यांत लोंबत्या घंटा अडकवून त्यांसह

या पर्वतास प्रदक्षिणा करूं व ब्राह्मणांकडून गिरियज्ञ करवून दुधादह्यांची व मेध्यपशूंच्या मांसांची पक्कान्नें ब्राह्मणांपासून तों चांडालांपर्यंत सर्वांस खायला घालून तृप्त करूं. अशा रीतीनें गाईंचें व गिरीचें पूजन करणें हेंच आपल्याला श्रेयस्कर आहे असें मला वाटतें." हीं श्रीकृष्णाचीं भावी भगवद्गीतेच्या दिव्य उपदेशाचीं बीजभूत वाक्यें ऐकून सर्व गोपालांनीं तात्काळ त्याचें म्हणणें कबूल केलें. तूंच आमचा ईश्वर आहेस, तूं सांगशील तें आमच्या कल्याणाचेंच असलें पाहिजे, असें म्हणून त्यांनीं सर्व घोषांतील तीन दिवसांचें दहीं व दूध जमा केलीं; व दह्यादुधांचीं सुंदर सुंदर पक्कान्नें तयार केलीं. जलप्राशन करण्यासाठीं मंगलकारक कुंभ यज्ञाच्या जागीं नेऊन भरून ठेविले. मांसाचीं व भाताचीं तपेलीं बरोबर घेतलीं. शिंगें, तुताऱ्या इत्यादि मंगल वाद्यांच्या घोषानें व गाई, बैल, वासरें, यांच्या हंबरण्यानें गोपाळांना फारच हर्ष झाला; व ब्राह्मणांनीं सुमुहूर्तावर गोपाळांसह गिरियज्ञास आरंभ केला. यज्ञ संपवून सर्व ब्राह्मण व गोपाळ यांनीं यज्ञांत अर्पण केलेलें सर्वोत्कृष्ट अन्न आतृप्ति भक्षण केलें. नंतर गाईंना शृंगारून त्यांचे कळप करून गोवर्धनपर्वताभोंवतीं सर्वांनीं प्रदक्षिणा घातली. तांबडीं, पांढरीं, पिंवळीं वस्त्रें नेसलेले व मोरांच्या पिसांचीं बाहुभूषणें घातलेले गवळी हातांत काठ्या घेऊन गाईंच्या मागें नाचत व खेळत व चपळ गाईंना आवरीत जात असतांना मोठी मौज दिसली. याप्रमाणें तो गिरियज्ञ संपवून श्रीकृष्ण सर्व गोपालांसह आनंदानें व्रजांत परत आला (ह० वि० १७).

व्रजांतील गोपांनीं नेहमींप्रमाणें आपला उत्सव मुद्दाम केला नाहीं, हें पाहून इंद्रास क्रोध आला व त्यानें आपलें पर्जन्यास्त्र व्रजावर सोडलें. हिंदुस्थानांत शरदृतूंत बहुधा एक वेळ तरी वृष्टि होतेच, पण या वेळेस उत्पन्न झालेलें वादळ कांहीं विलक्षण भयंकर होतें. हत्तींच्या दाट समुदायाप्रमाणें एकमेकांशीं लागलेले काळे मेघ एकाएकीं आकाशांत दिसूं लागले. सर्व आकाश मेघांनीं व्याप्त होऊन चोहोंकडे काळोख पडला. लगेच विजेच्या लखलखाटानें सूचित होणारे मेघांचे भयंकर गडगडाट ऐकूं येऊं लागले. कांहीं वेळानें बांबूच्या दांड्यासारखी किंबहुना हत्तीच्या सोंडेसारखी पावसाची धार कोसळूं लागली. अपार व अगाध आकाशांत असा पाण्याचा कल्लोळ उसळल्यानें जणूं काय समुद्रानेंच आकाशांत उडी मारली आहे

कीं काय असें भासूं लागले. प्रळयकालच्या वृष्टीसारखी संतत धार चालू झाल्यानें, मनुष्य, पशु, पक्षी गांगरून गेले. पंख ओलेचिंब झाल्यानें पक्षी वृक्षावर जागच्या जागीं दीन होऊन बसले. हरिणाचे पाय चिंब झाल्यानें चालेनासे झाले. संतत वृष्टीने भिजून गेलेलीं मनुष्यें विद्रूप दिसूं लागलीं. थोड्या वेळानें पृथ्वी जलमय होऊन ओढे व नद्या पुरानें भरून गेल्या. वाऱ्याच्या सोसाट्यानें व पुराच्या धक्क्यानें वृक्ष उन्मळून पडले. यमुनेच्या प्रचंड पुराबरोबर पडलेलीं झाडे व मेलेलीं जनावरें वाहून येऊं लागलीं. दोन दिवस तरी झाले वृष्टि थांबेना व चंद्र-सूर्य आकाशात आहेत कीं नाहींत याचा थाग लागेना. अशी भयंकर स्थिति पाहून व्रजातील लोक घाबरून गेले. गाई व्याकूळ होऊन दीन स्वरानें हंबरूं लागल्या. त्यांचीं अंगें आर्द्रतेनें ताठून गेलीं. खावयास न मिळाल्यानें त्यांचीं पोटें खपाटीस गेलीं. कित्येक मटकन् खालीं बसल्या तर कित्येकांनीं आपल्या वासरास प्रेमाने पोटाखालीं घेतले. हा इंद्राचा आपल्यावर कोप झाला आहे असें वाटून लोक हवालदील झाले व ‘ कृष्णा ! तूंच आता आमचे रक्षण कर ’ असें म्हणून त्यास शरण गेले. कृष्णानें त्यास आश्वासन देऊन यत्किंचितही न घाबरता त्यास आपल्या गाईसह व चीजवस्तेसह गोवर्धन पर्वताला वर उचलून त्याखालीं पावसापासून वाचविले. सात दिवस वृष्टि चालली होती तरी त्यास काडीइतकी इजा झाली नाहीं. शेवटीं इंद्र थकून जाऊन पावसाची झोड बंद झाली. तेव्हां कृष्णानें लोकास पुनः व्रजात सुरक्षित आणून पोंचविले. लोकांनीं श्रीकृष्णास ‘ तूं उपेंद्र आहेस ’ असें म्हणून आनंदानें अभिषेक केला, त्याच्या पराक्रमाबद्दल व शहाणपणाबद्दल त्याची स्तुति केली आणि ध्वजाकार पताका उभारून सर्व व्रजांत लोकांनीं आपल्या सुटकेबद्दल मोठा उत्सव केला ( ह० वि० १८-१९ ).

याप्रमाणें लोकाची सुटका केल्यावर श्रीकृष्णानें या शरदृतूच्या दिवशांत नानाप्रकारचे खेळ करून लोकांचे मनरंजन केलें. पावसाळा चांगला झाल्याने मस्त झालेले बैल आणवून त्याच्या झुजा लावल्या. शेण व गवत याचा चुरा पडलेल्या व्रजातील रुंद पण वाकड्या तिकड्या रस्त्यात मस्त बैलाचीं झुंजें पाहण्यास व्रजातील स्त्रीपुरुष जमा झाले. एकाद्या झुंजांत बैल अनावर झाला तर श्रीकृष्णाने त्यास आपल्या अबाधव्य शक्तीनें मगरीप्रमाणे पकडून जागच्या जागीं दाबावे, तेव्हां व्रजांतील लोकांस मोठें

आश्चर्य व कौतुक वाटावे. वर्षाऋतूंतील विपुल दुधे पिऊन पुष्ट झालेल्या गोपाल-मल्लाच्याही त्यानें कुस्त्या करविल्या. रात्रीं पिठासारखें शुभ्र चांदणें पडे, त्या वेळेस तरुण गोप व गोपी मिळवून त्यानें रासक्रीडा केली. एक पुरुष नंतर एक स्त्री अशी रांग लावून श्रीकृष्णाचीं गाणीं म्हणत त्यांनीं तालावर फेरा धरावा, नाचावें व टिपऱ्या खेळाव्या. श्रीकृष्णानें मध्यें उभें राहून बासरी वाजवावी, तर कधीं बलरामाने मध्यें उभें राहून रासात नाचावे. अशा प्रकारच्या रासाच्या नाचात गोपगोपींना पराकाष्ठेचें इंद्रियातीत सुख होऊ लागले. ओल्या हळदीच्या आतल्या गाभ्याप्रमाणें पिंपळे रंजन रेशमी वस्त्र नेसलेल्या श्रीकृष्णाची मनोहर मूर्ति पाहून व शरच्चंद्राहूनही अधिक मोहक असा त्याचा मुखचंद्र अवलोकन करून गोपगोपी नाचताना तल्लीन होत. हा प्रत्यक्ष श्रीविष्णूच अवतार घेऊन आपल्यांत आला आहे अशा दृढ भावनेनें ते भक्तिरसात दंग होऊन जात. विशेषतः गोपींची या ईशभावनेने श्रीकृष्णावर जी भक्ति बसली ती कल्पनातीत होती. स्त्रिया पुरुषापेक्षा अधिक प्रेमळ व भाविक असतात हें सुप्रसिद्ध आहे. पतिपुत्रावर, साधुसंतावर, देवदेवतावर स्त्रिया निर्हेतुक व निरतिशय प्रेम करतात हा अनुभव जगतावरील सर्व देशांत व लोकात आहे. पण व्रजांतील गोपींची श्रीकृष्णावर जी भक्ति व जे प्रेम बसले ते सर्वांहून आधिक होतें. त्याची इतकी पराकाष्ठा झाली कीं, ते जगातील सर्व भक्तिप्रेमास उपमान होऊन बसले. कृष्णाची बासरी ऐकूं आली म्हणजे गोपांच्या स्त्रियानीं सर्व कामे टाकून श्रीकृष्णाच्या दर्शनाकरिता धावावें, त्याचे मुख अवलोकन करून देहभान विसरून जावे व आपल्या पतिबंधुसहवर्तमान त्याच्याबरोबर रास खेळून आनंद-समुद्रात बुडून जावे. फार काय सांगावें, रात्रंदिवस त्यास श्रीकृष्णाचाच ध्यास लागला. श्रीकृष्णाचे गुणानुवाद गाऊन व त्याचें ध्यान करून त्यानी आपलें नेहमींचे काम कसेबसे तरी करावे व सदोदित श्रीकृष्णचरणीं लीन होऊन निरतिशय ब्रह्मानंदाचे सुख अनुभवावें ( हरिवंश, वि० २० ).

असो. एके दिवशीं अवशीच्या वेळीं गोप व गोपी खेळ खेळत असतां एक भयंकर स्वरूपाचा मस्त बैल व्रजात शिरला. त्याचा रंग विझविलेल्या कोळशाप्रमाणें काळाकुळकुळीन होता. त्याचीं शिंगे व खूर तलवारीप्रमाणें

तीक्ष्ण होते. त्याचे डोळे निखाऱ्याप्रमाणें लाल असून त्याजवर लठ्ठ मांसल पापण्यांची अर्धवट झांपड पडली होती. त्याचें वशिंड अतिशय मोठें व कठिण असून त्याच्या धक्कयानें तो झाडेंसुद्धां पाडी. त्याच्या लठ्ठ माने-खालची पोळी जमिनीपर्यंत लोंबत होती. त्याचें अंग शेणामुतानें माखलेलें होतें. त्याचें पोट विशाल असून कमर मजबूत होती. खुरांनीं जमीन खरडीत, शिंगांनीं उंचवटे खोदीत व जागजागीं थोडथोडें हगत व मुतत तो मस्त बैल व्रजांत इकडे तिकडे वावरूं लागला, तेव्हां तें अरिष्टराक्षसाचें भयंकर वृषभरूप पाहून गाई—बैल व मनुष्यें घाबरून जाऊन सैरावैरा पळूं लागलीं. तो अति माजलेला बैल डुरकण्या फोडीत गाईंच्या मागें लागला, तेव्हां गाभण्या गाई दुवेतल्या. याप्रमाणें व्रजांत हाहाःकार उडाला, तेव्हां ‘ घाबरूं नका, मी आलों, ’ असें म्हणत श्रीकृष्ण त्या बैलाच्या मागें लागला. एक जोराची टाळी वाजवून श्रीकृष्णानें त्या बैलाचें लक्ष आपलेकडे ओढलें, तेव्हां तो मस्त बैल त्वेषानें श्रीकृष्णाकडे वळला. श्रीकृष्ण दगडासारखा निश्चळ समोर उभा आहे असें पाहून त्यास शिंगानें भोसकण्याच्या इराद्यानें शिंगें पुढें करून बैलानें श्रीकृष्णावर उडी घातली. पण श्रीकृष्णानें त्याचीं शिंगें गच्च पकडून त्यास जागच्या जागीं उभें केलें, इतकेंच नव्हे तर अठरा पावलें मागें रेटीत नेलें. मग त्यानें एकदम त्याच्या शिंगांना व मानेला धोतरासारखा पीळ दिला. तेव्हां तो बैल धाडकन् खालीं पडला. श्रीकृष्णानें त्याच्या एका शिंगावर पाय देऊन दुसरें शिंग जोरानें उपटलें, व त्याच शिंगानें त्याच्या तोंडावर एक असा फटका मारला कीं, त्या बैलानें तात्काळ रक्त ओकत, हगतमुतत व पाय खरडत आपला प्राण सोडला. याप्रमाणें आपल्या अचाट शक्तीनें व्रजावर आलेल्या त्या संकटाचें निवारण करून श्रीकृष्ण आश्चर्यचकित झालेल्या गोपगोपींसह त्या शरदृतूच्या चांदण्यांत पुनः खेळ खेळूं लागला ( हरि० वि० २१, भा० ३६ ).

# मथुरापर्व

श्रीकृष्णाचे अद्भुत पराक्रम व त्याजवरील गोकुळांतील लोकांची विशेषतः गोपींची देवनिर्विशेष भक्ति यांची कीर्ति हळूहळू चोहोंकडे पसरली यांत नवल नाहीं. व्रजांत कोणी तरी देवांश विभूति निर्माण झाली आहे अशी ख्याति सर्वत्र पसरून ठिकठिकाणचे लोक श्रीकृष्णाचें दर्शन घेण्यास धांवूं लागले. श्रीकृष्णाची सोळासतरा वर्षांची मदनमनोहर मूर्ति, त्याचें नवनागसमान अमानुष बल, त्याची लोकांचें मन आकर्षण करणारी दिव्य विद्युच्छक्ति यांच्या योगानें त्याचें दर्शन घेण्यास येणारे लोकांस मोह पडूं लागला, व जो तो कृष्णनामाचा ध्यास घेऊं लागला. " हा नंदाचा पुत्र नसून वसुदेवाचा पुत्र आहे; नारदानें वसुदेवाच्या पोटीं श्रीविष्णूचा अवतार येणार आहे असें कंसास सांगितलें होतें तोच हा श्रीकृष्ण " असें लोक बोलूं लागले. बलराम व श्रीकृष्ण हे रंगानें मात्र निराळे, पण रूपानें अगदीं सारखे होते, यामुळें सहजच हा समज लोकांत उत्पन्न झाला. वसुदेवानें रोहिणीस व बळरामास इतकीं वर्षें गोकुळांतच कां ठेविलें आहे याचें गूढ लोकांस आतां समजलें. वसुदेवानें कंसाच्या भीतीनें देवकीचा आठवा मुलगा नंदाच्या घरीं चोरून नेऊन ठेविला आणि नंदाची मुलगी मथुरेस आणून कंसाच्या स्वाधीन केली अशीही लोकांत बोलवा सुरू झाली. होतां होतां ही जनवार्ता कंसाच्या कानीं गेली. " मी वसुदेव–देवकीचीं आठ पोरें ठार मारण्याचा जो अट्टहास केला तो सर्व फुकट गेला अं ! " असें वाटून त्याच्या अंगाचा तिळपापड झाला. " माझा शत्रु माझ्याच राज्यांत माझ्या राजधानीपासून तीन कोसांवर सुखानें नांदत आहे व वाढत आहे " हें मनांत येऊन दिव्याखालीं खरोखरच अंधार असतो असें त्याच्या

अनुभवास आलें. " मी एवढा पराक्रमी, एवढा चौकस, एवढा डोळ्यांत तेल घालून पहाणारा; माझ्या हातावर या गरीब दिसणाऱ्या वसुदेवानें तुरी दिल्या काय ! " असें म्हणत असतां वसुदेवाचें या वेळीं काय करूं व काय न करूं असें त्यास झालें. आज सोळासतरा वर्षे त्यानें वसुदेवाकडे हा गरीब आहे अशा समजुतीनें दुर्लक्ष्य केलें होतें. त्याच्या जुलमाचा प्रभाव अन्य दिशेनें वाहात असून त्या प्रवाहांत शेंकडों यादव, भोज, वृष्णि वीर सांपडून देशोधडीस लागत होते. वसुदेवास व देवकीस माफी दिल्या दिवसापासून त्यांजकडे त्यानें वक्रदृष्टीन पाहिलें नव्हतें. वसुदेवानेंही आपल्या पुत्राच्या प्रेमानें केवळ मौन स्वीकारलें होतें. तो अज्ञातवासाप्रमाणें मथुरेंतच ईश्वर-भजनांत आपला काळ घालवीत होता, तो एकाएकीं या जनवार्तेनें त्यास अंधेरांतून ओढून प्रकाशांत आणिलें, आणि कंसाच्या क्रोधाग्नीची ज्वाळा त्याच्याकडे वेगानें वळली.

वसुदेवास ठार मारल्यानें आपला शत्रु नाहींसा होत नाहीं हें मनांत आणून दुष्ट कंसानें वसुदेवास अन्य रीतीनें शासन करण्याचा बेत केला. सज्जनांना अपमान मृत्युसमान असतो हें ध्यानांत घेऊन त्यानें वसुदेवाची भरसभेंत छी थू करण्याचा निश्चय ठरविला. असें केलें असता जनवार्तेत कितपत सत्य आहे हेंही दिसून येईल असा तर्क करून एके दिवशीं कंसानें मध्यरात्रीं मथुरेंत सर्व सामसूम झाल्यावर यादव, वृष्णि, भोज आदिकरून सरदारांची सभा बोलाविली. वसुदेव, कंक, सत्यक, दारुक, विपृथु, बभ्रु ( अक्रूर ), कृतवर्मा, भूरिश्रवा, अंधक इत्यादि महान् महान् वीर सभेंत जमा झाले. कंसानें बंदींत टाकलेल्या आपल्या पित्यासही सभेंत आणविलें आणि नंतर मोठ्या गंभीर वाणीनें त्यानें बोलण्यास आरंभ केला. " सभ्यहो, मी बोलतों इकडे लक्ष द्या. आपण सर्व वेद जाणणारे असून न्याय, नीति, धर्म, आचार इत्यादिकांत निष्णात आहां. आपण सर्व आप-आपल्या कर्तव्यांत दक्ष आहां. आपण शूर असून धनुर्विद्येंत आपला कोणी हात धरणारा नाहीं. आपण ऋषीप्रमाणे सदाचारसंपन्न, मरुतांप्रमाणें पराक्रमी, अग्नीप्रमाणें तेजस्वी आहां. पृथ्वीला जसा पर्वतांचा आधार आहे त्याप्रमाणें आपण या अवनतीस चाललेल्या यदुकुलास सांवरून धरलें आहे. असें असून तुम्ही माझी उपेक्षा करींत आहां हें आश्चर्य नव्हे काय ! गोकु-

ळांत माझा शत्रु नंदाचा पुत्र म्हणविणारा कृष्ण दिवसेंदिवस वाढत असून माझ्या मुळावर घांव घालण्याची त्याने वेळ आणली आहे हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? त्याचे खरे स्वरूप व त्याचा पराक्रम याचा मला थाग लागत नाहीं, यामुळें मी मूढ झालों आहे. एकाद्या दिव्य अवताराप्रमाणें त्याचीं कृत्यें अद्‌भुत व अलौकिक दिसतात. बाहेरून गोपासारखा क्षुल्लक वेष घेऊन त्यानें आपलें खरें स्वरूप गुप्त ठेविलें आहे; व यामुळें स्मशानांतील अग्नीप्रमाणें तो खुशाल गोकुळांत वाढत आहे. "

" नारदानें सांगितल्यावरून देवकीच्या गर्भाविषयीं जो मीं कित्येक वर्षें अट्टहास केला तो वसुदेवानें एका रात्रींत फुकट घालविला असें लोक म्हणतात, तें तुम्हीं ऐकिलें आहे काय ? गोकुळांत वाढत असलेला कृष्ण नंदयशोदेचा पुत्र नसून वसुदेवदेवकीचा आठवा पुत्र आहे ही गोष्ट खरी आहे काय ? असें असेल तर ज्याप्रमाणें कावळा ज्याच्या डोक्यावर बसतो त्याच्याच डोळ्यांत मांसासाठीं चोंच खुपसण्याचा यत्न करतो, त्याप्रमाणें या वसुदेवानें माझ्या अन्नावर बांधवांसह खुशाल चरून माझ्याच प्राणावर उठण्याची खटपट चालविली आहे. भ्रूणहत्या, गोहत्या, स्त्रीहत्या इत्यादि महापापांनासुद्धां प्रायश्चित्त आहे, पण कृतघ्नाला, विशेषतः आपल्या बांधवांशींच कृतघ्नपणा करणाराला, प्रायश्चित्त नाहीं. वरपांगीं स्नेह दाखवून जो दुष्ट कृतघ्नपणा करतो तो नरकाचीच वाट धरतो. वसुदेवा, तूं बाहेरून मोठा सदाचरणी दिसतोस, पण अंतर्यामीं मोठा कपटी व शठ आहेस. तूं अत्यंत पापी असून त्वां माझ्या कुलाशीं मोठा विरोध मांडला आहेस. अरे, माझें अन्न खातोस तर माझ्या प्राणापेक्षां तुला आपल्या पोराचे प्राण अधिक प्रिय वाटले काय ? तूं आपल्या पोरास वाचविलेंस हें तूं योग्य केलेंस काय ? अरे, ज्याअर्थीं तूं माझ्यावरच उठला आहेस त्याअर्थीं मीं अजाणपणें आपला मृत्युच आजवर पोसला असें मला वाटतें ! अरे, शहाणपणा हा कांहीं पांढऱ्या केसांवर अवलंबून नाहीं. मूर्खा वसुदेवा ! तुला वाटत असेल कीं कंसाचा नाश झाला म्हणजे माझा पुत्र मथुरेचा राजा होईल, पण थेरडा झाल्यानें तुझी बुद्धि भ्रष्ट झाली आहे ! अरे, तुजवर विश्वासून मी बसलों असतां माझेवरच प्रहार करण्यास तूं उद्युक्त झाला आहेस ! पण थांब, मीच तुझ्या समोर तुझ्या दोघां पोरांची विल्हेवाट लावतों ! जिवंत

राहण्याची इच्छा धरून कोण दंड थोपटून माझ्या समोर उभा राहूं शकेल ? अरे मूर्खा, तूं विश्वासघात करून आपल्या कुलाचा मात्र नाश करणार आहेस ! वृद्ध झालेल्या व माझ्या अन्नानेंच वाढलेल्या माझ्या बहिणीच्या नवऱ्याचा घात, ब्राह्मणहत्येप्रमाणें, मीं आजवर केला नाहीं व पुढेंही करणार नाहीं. पण तूं मात्र माझ्या वधाचा उपाय योजून आपल्या तोंडास व या सर्व यादवांच्या तोंडास काळें फासलें आहेस ! " याप्रमाणें अत्यंत निष्ठुर शब्द बोलून कंसानें वसुदेवाची विनाकारण निंदा चालविली असतां त्या क्षमासागर गंभीर पुरुषानें क्षमाशील वृत्ति धारण करून कांहींच उत्तर केलें नाहीं. परंतु कित्येक यादवांच्या तोंडून, त्याचें भाषण चाललें असतां, " धिक् " " धिक् " असे उद्गार निघाल्यावांचून राहिले नाहींत ( हरिवंश, वि० अ० २२ ).

चोरांच्या उलट्या बोंबा या म्हणीप्रमाणें आपण दोषी असतां वसुदेवावर दोष लोटूं पाहणाऱ्या कंसास अंधकानें उत्तर दिलें. तो वयोवृद्ध व सर्वमान्य यादव भर सभेंत कंसास म्हणाला, " कंसा, तूं जो हा आपल्या वाचेस शीण दिला आहेस तो अत्यंत निंद्य होय. वृद्ध, सन्मान्य, ज्ञातिबंधु अशा या वसुदेवाची तूं विनाकारण निर्भर्त्सना करीत आहेस, तेव्हां तुझा मृत्युच जवळ आला आहे असें मला वाटतें. या तुझ्या निंदेनें तुझें कोणतेंच कार्य साधलें नसून तूं आपलें इंगित मात्र लोकांपुढें व्यक्त केलेंस. सन्मार्गवर्ती गुरूंची निंदा करणें ब्रह्महत्येसमान महापातक आहे व त्यांचा कोप अग्नीप्रमाणें सर्वस्व जळणारा आहे. कंसा ! वसुदेवानें आपला पुत्र लपवून ठेविला यांत त्यानें अपराध काय केला ? तूं त्याच्या पुत्रांना विनाकारण ठार मारण्याचें जें भयंकर दुष्ट कर्म केलेंस त्याबद्दल पश्चात्ताप न दाखवितां तुझ्या अन्यायापासून त्यानें आपला पुत्र वांचविला त्याजबद्दल उलटा त्यास दोष देतोस ? आपला प्राण खर्चूनही पिता पुत्राचें रक्षण करतो. तुझ्या पित्यानें तुला जन्मतःच मारून टाकिलें नाहीं याचे उपकार त्याजला चांगले फळले ! असो. तुझ्या पित्यानें व वसुदेवानें आपलें कर्तव्य केलें. तूं मात्र या कुलांत कुलनाशक उत्पन्न झाला असून आपल्या दुष्कृत्यांनीं लवकरच क्षयास जाणार आहेस. हल्लीं नानाप्रकारचे अपशकुन होऊं लागले आहेत. दिवसां कोल्ह्यांचें रडणें ऐकूं येऊं लागलें आहे. देवता स्वस्थानापासून

चालित झाल्या आहेत. सूर्यग्रहण नुकतेंच होऊन गेलें आहे. मंगळ चित्रा नक्षत्रांत वक्री झाला आहे. सारांश, अशा अनेक अशुभ चिन्हांवरून राजाचा नाश लवकरच होणार असें दिसतें. तुलाही पूज्य व सन्मान्य वसुदेवास भर सभेंत दुरुक्त भाषणें बोलण्याची बुद्धि झाली हें त्याचेंच लक्षण होय. असो. भावी अनर्थ टाळावयाची तुझी इच्छा असेल तर वसुदेवाची क्षमा माग, आणि वसुदेवाला घेऊन जाऊन श्रीकृष्ण आणि बळराम यांना सन्मानानें व्रजांतून आणून त्यांच्याशीं जे तूं अकारण वैर मांडलें आहेस तें मिटीव. नाहीं तर या यदुकुलावर किंबहुना या सर्व नगरीवर व राज्यावर भयंकर प्रसंग ओढवेल असें मला स्पष्ट दिसतें." या भाषणानें कंसास अत्यंत राग आला, परंतु तो त्यानें दाखविला नाहीं. तो अक्रूराकडे वळून म्हणाला, "अक्रूरा, तूं व्रजांत जा आणि माझा भाचा आणि बलराम यांस येथें घेऊन ये. त्यास पाहण्याची मला फार उत्कंठा लागली आहे. ते मल्ल-विद्येंत फार निपुण झाले आहेत असें मी ऐकितों. आपल्या येथेंही चाणूर व मुष्टिक हे दोघे प्रख्यात मल्ल आहेत. त्यांचें नियुद्ध पाहूं. याशिवाय नंदाला आणि व्रजांतील इतर लोकांनाही घेऊन ये. आपण त्यांच्या करमणुकी-करितां धनुर्मुख करूं व त्याच्यांत कोण कोण धनुर्विद्येंत कुशल आहेत तें पाहूं. एक मोठा रंग तयार करण्याची तातडतोब व्यवस्था कर, आणि लवकरच त्या रामकृष्णांना व नंदाला येथें घेऊन ये." असें म्हणून आंतून रागानें संतप्त झालेला पण वरपांगीं प्रेम दाखविणारा कंस सभा बरखास्त करून आपल्या महालांत निघून गेला ( हरिवंश, वि० अ० २३ ).

कंसानें श्रीकृष्णास मथुरेस बोलावण्याचें ठरविलें खरें, पण त्याचे पाय भीतीनें लटलट कापूं लागले. नारदाच्या भविष्याप्रमाणें वसुदेवाचा आठवा पुत्र, मीं एवढा अट्टाहास केला तरीही, जिवंत राहून गोकुळांत मोठा झाला हें पाहून नारदाचें भविष्य खरें होणार असें त्यास वाटूं लागलें. कृष्ण मथुरेस आल्याबरोबर मला मारील अशी त्याची मनोदेवता त्यास सांगूं लागली. तो एवढा पराक्रमी पण या नुसत्या कल्पनेनें त्याचे हातपाय गळले. कृष्णास गोकुळांतच ठार मारावें, येथें येऊंच देऊं नये अशा विचारानें त्यानें आपला भाऊ केशी केवळ त्याचा बाहेर फिरणारा प्राण होता, त्यास बोलावून आणून कृष्णास हरप्रयत्नानें गोकुळांत, इकडे येण्यास निघण्यापूर्वीच

मारून टाकण्याची आज्ञा केली. केशी तात्काळ एका भयंकर घोड्यावर बसून निघाला आणि प्रातःकाळींच त्यानें श्रीकृष्णास आपल्या सवगड्यां-बरोबर गाई चारावयास निघाला असतां गांठलें. त्यानें त्याजवर वेलाशक चाल केली. आपल्यावर चालून आलेल्या शत्रूची उपेक्षा करावयाची नाहीं अशी श्रीकृष्णाची प्रतिज्ञाच होती. गोपाळांनीं श्रीकृष्णास पुष्कळ भीति घातली, परंतु श्रीकृष्णास भीतीचा लवलेशही शिवला नाहीं. त्या भयंकर घोड्यानें त्याच्या दंडावर चावा घेण्यासाठीं तोंड टाकलें तों श्रीकृष्णानें आपलें वज्रासारखें काठिण मनगट बेधडक त्याच्या तोंडांत स्वतःच घातलें व नुसत्या मनगटाच्या रेट्यानें त्याचे दांत कडाकड उखडून टाकिले. फाटलेल्या ओंठामुळें व उपटलेल्या दांतांमुळें रक्तबंबाळ झालेल्या तोंडानें आपल्यास चावतां येत नाहीं, असें पाहून त्या घोड्यानें आपल्या पुढच्या टापा कृष्णाच्या छातीवर मारण्याचा प्रयत्न केला, तों कृष्णानें त्याच टापा धरून त्यास जोरानें उलथून टाकलें. त्याबरोबर तो घोडा धाडकन् आडवा पडला. त्याच्या वरचा स्वार हापटून तात्काळ मरण पावला. व त्या घोड्यानेंही दोनचारदां उठण्याचा प्रयत्न करीत लेंडकें गाळीत धडपडत थोड्या वेळानें प्राण सोडला. याप्रमाणें त्या भयंकर घोड्याची श्रीकृष्णानें विल्हेवाट लाविलेली पाहून गोपाळांस अतिशय हर्ष झाला व कृष्णाची स्तुति करीत ते त्यास घेऊन व्रजांत परत आले आणि सर्वांस ती आनंदाची बातमी त्यांनीं सांगितली ( हरिवंश० व २४ ).

इकडे मथुरेंत एका विस्तीर्ण मैदानांत अक्रूरानें रंग व प्रेक्षागार झपाट्यानें तयार करण्याची व्यवस्था लावली. मध्यभागीं मल्लांना व वीरांना आपलें कौशल दाखविण्यासाठीं मोठ्या हौद्यासारखा रंग घेऊन त्याजभोंवतीं उंच बिनसंधीचे खांब उभारून हल्लींच्या कॉंग्रेसच्या मंडपाप्रमाणें, एक प्रेक्षागार तयार केलें. हजारों लोक बसतील व त्यांचा भार सहन करील अशी चढती बैठकांची मजबूत आंळ तयार केली. दरवाजा रुंद ठेवून त्याच्या ऐन समोर एक उंच वेदी तयार करून त्याजवर राजसिंहासन मांडलें. दोन्ही बाजूंच्या अर्धवर्तुळांत त्याहून लहान लहान वेदी म्हणजे उंचवटे तयार करून त्यांजवर सरदारांना बसण्यास मंच तयार केले. मंचांवर बसण्यास जाण्यासाठीं रांगा–रांगांमधून रुंद वाटा ठेविल्या. निरनिराळ्या श्रेणी अथवा जातींच्या

लोकांना बसण्यास बाकीच्या अर्धवर्तुळावर निरनिराळे भाग तोडून दिले, व त्यांचे रस्ते निराळे ठेविले. अंतःपुरांतील स्त्रियांस व सरदारांच्या स्त्रियांस बसण्यासाठीं पडदपोशीची जागा करविली. वरचें छपर मजबूत बांधलेलें असून चारी बाजूंनीं बाहेर पडणाऱ्या वलभि सुशोभित केल्या गेल्या. याप्रमाणें तें प्रेक्षागार दहापंधरा दिवसांत तयार झाले, तेव्हां तें पाहण्यास काशिवधानें अधिकच संतप्त झालेला कंस स्वतः आला व त्याची सुंदर रचना पाहून तो खुष झाला. त्यानें तेथील सर्व खांब लतांनीं, मालांनीं व चित्रांनीं शृंगारण्याची आज्ञा केली. मंचांवर व सिंहासनावर सुंदर आस्तरणें टाकण्यास सांगितलें. मंचांमधील वाटावर बनाती लावून ठिकठिकाणीं तोरणें व पताका लावण्याविषयीं आज्ञा दिली. हजारों लोक जमतील तेव्हां त्यांच्या खाण्यापिण्याच्या सोईसाठीं ठिकाठिकाणीं सुवर्णमंडित पानकुंभ व खाण्याचे पदार्थ व प्रसंग पडल्यास औषधिविजा कषाय ठेवून देण्याची ताकीद केली. मल्लांच्या उपयोगासाठीं वाळलेल्या शेणाचा चूर रंगाभोंवतीं ठिकाठिकाणीं राशी घालून तयार ठेवण्यास बजाविलें. हें सांगून शहरांतील सर्व श्रेणींस म्हणजे जातींच्या व धंद्याच्या लोकांस व मल्लांस उदईक बारा वाजतां प्रेक्षागारांत धनुर्मुख व नियुद्ध पाहण्यास येण्याविषयीं बोलावणें करण्याचा हुकूम सोडला. याप्रमाणें तजवीज लावून व अक्रूरास श्रीकृष्ण व बलराम यांस आणण्यास तात्काळ निघण्याविषयीं परवानगी देऊन तो आपल्या महालांत आला. नंतर त्यानें गुप्तपणें चाणूर व मुष्टिक या मल्लांस राजवाड्यांत बोलावून आणिलें व त्यांस म्हटलें, " तुम्हीं आजवर माझें अन्न खाल्लें व मीं आजवर तुमचा सत्कार केला त्याची उतराई होण्याची वेळ उद्यां आहे. उद्यां ते दोघे गवळ्यांचे पोर कृष्ण व संकर्षण कुस्ती खेळण्यास येणार आहेत, त्यास पाडल्यावर ताबडतोब ठार मारून टाका. ते पोर आहेत, म्हणून बेसावध राहूं नका; कारण ते फार बळकट व दमदार आहेत अशी त्यांची कीर्ति आहे. तरी सावध राहून व जीवापाड यत्न करून त्या माझ्या शत्रूचें तुम्ही निर्दाळन करा." त्या वेळेस त्यांनीं उत्तर केलें, " महाराज, आम्हीं एकदां कुस्तींत क्रुद्ध झालों म्हणजे आमच्या समोर ते बिचारे पोर उभे राहिलेच तर प्रेतच झाले असें समजा. " याप्रमाणें आश्वासन देऊन चाणूर व मुष्टिक निघून गेले तरी कंसाचें मन स्थिर होईना. हे मल्ल माणूस आहेत, कदाचित् यांस

रामकृष्ण जिंकतील तरी कुस्ती लावण्यापूर्वीच मस्त हत्तीकडून श्रीकृष्णास चिरडून टाकावा अशी युक्ति योजून कंसानें कुवलयापीड नांवाच्या आपल्या महाबलाढ्य व मस्त झालेल्या हत्तीच्या माहुतास बोलावून आणून तो हत्ती दरवाजाजवळ असा उभा करण्याविषयीं ताकीद केली कीं, श्रीकृष्ण दरवाजाशीं येत असता त्या हत्तीनें सहज बेफाम होऊन त्यास चिरडून टाकावें. ' दारीं झुलेत गजसंघ ' या उक्तीप्रमाणें राजदरबारीं दरवाजावर हत्ती उभा करण्याचा सांप्रदाय आहेच. त्याप्रमाणें दरवाजावर मस्त हत्ती उभा करण्याची ताकीद देऊन तो म्हणाला, " माहुता, तूं जर त्या दोघां पोरांना चिरडून टाकशील तर हा जो वसुदेव दुरटूर लावीत आहे व त्याचे अनेक यादव साथीदार मला भय घालीत आहेत ते सर्व निराधार होतील, आणि मग मी या मथुरेस निर्यादव करून सुखानें निष्कंटक राज्य करीन. तर हें माझें अत्यंत प्रिय कार्य तूं कर; तूं मागशील तें मी बक्षीस देईन. " याप्रमाणें रामकृष्णांस ठार मारण्याची गुप्त तजवीज लावून कंस कांहींसा निश्चित झाला ( हरिवंश, वि० २८ ).

यादवांचें निर्मूलन करण्याचा बेत कंस करीत असतां, त्याच्या उलट यादव, वृष्णि, भोज इत्यादि सर्व क्षत्रिय कंसाचे निर्दालन करण्याच्या विचारांत गुंतले होते. कंसाच्या जुलुमामुळे ते अतिशय त्रस्त झाले असून कित्येक महान् महान् वीर परागंदा होऊन कुरु, पांचाल, केकय इत्यादि परदेशांत काळ कंठीत होते. कंसानें केलेली वसुदेवाची निष्कारण निंदा व श्रीकृष्णास विना अपराध ठार मारण्याचा त्याचा बेत या दोन गोष्टींमुळें त्याच्या जुलुमाचा कळस झाला. पुऱ्या लादलेल्या उंटावर दोन काड्या अधिक ठेविल्या असतां जशी त्याची पाठ मोडते, त्याप्रमाणें कंसाच्या या कृत्यांनीं मथुरेतील क्षत्रियांच्या राजभक्तीचा कणा मोडून गेला,व त्यांनीं गुप्त रीतीनें जमून श्रीकृष्णास वांचवून कंसाचा कांटा कसा काढावा याचा विचार चालविला. शेवटीं अक्रूर कंसाचा जवळचा भाऊबंद असून त्याजवर कंसानें विश्वास टाकला आहे, त्यासच आपलेकडे वळवून घ्यावें असें ठरवून गोकुळास जाण्याच्या पूर्वीं त्यांनीं त्याची गांठ घेतली. श्रीकृष्णास कंसाच्या सर्व दुष्ट बेतांची आगाऊ बातमी देण्याविषयीं त्यांनीं त्याचें वचन घेतलें, व कंस श्रीकृष्णास ठार मारण्याचा यत्न करील तर श्रीकृष्णानें कंसास बेलाशक ठार

मारावें, आम्ही कोणी हरकत करणार नाहीं असेंही त्यांस सुचविण्याविषयीं सांगितलें. या कामगिरीबद्दल अक्रूरास संपूर्ण रीतीनें राजी करण्यासाठीं वसुदेवाचा जवळचा नातलग आहुक याची कन्या सुगात्री त्यास देण्याचें त्यांनीं ठरविलें. अक्रूराचें मन पूर्वीपासूनच श्रीकृष्णाकडे ओढत होतें, तें यामुळें त्याजला सर्वस्वीं अनुकूल झालें; आणि तो रामकृष्णांस आणण्यासाठीं रथांत बसून मोठ्या उत्सुकतेनें निघाला ( महा० सभा० ).

संध्याकाळचा समय येऊन दिवाकर मंदरश्मि झाला व संध्यामय पश्चिम–दिग्गुहेंत शिरूं लागला. शुद्ध चतुर्दशीचा चंद्रमा भावी स्ववंशाच्या रक्तपाताच्या छायेनें कीं काय संध्यारागानें रक्तवर्ण झालेल्या आकाशाकडे पाहून फटफटित झालेला पूर्वेस दिसूं लागला. पुढें होणाऱ्या दुःखाचा देखावा टाळण्याकरितांच कीं काय, पक्षी आपापल्या घरट्यांत दडूं लागले. उलट, रात्रीं फिरणाऱ्या मांसहारी श्वापदांच्या झुंडी आनंदित होऊन आपआपल्या गुहांतून बाहेर पडूं लागल्या. सर्व दिशा अंधारानें हळू हळू व्याप्त होऊं लागून जिकडे तिकडे शांत झालें. मधून मधून शिवांचे अशिव शब्द मात्र ऐकूं येऊं लागले. गाई घरीं परत येऊन गोठ्यांत बांधल्या जाऊन त्यांचें दूध काढण्यास गोप बसले, पण कांहीं कारण नसतां गाई गोप दोघेही स्तब्ध झाले. कित्येक गाई वासरांस लाथ मारून दूध पाजण्यास हरकत करूं लागल्या. कित्येक वासरांकरितां मोठमोठ्यानें हंबरूं लागल्या. रानांतून डोकीवर आणलेले लांकडांचे भार खालीं टाकून कित्येक गोप आपल्या दरवाजांत सुस्कारे टाकीत बसले. हळूहळू आकाशाचा पश्चिमेकडील भाग अग्नीसारखा जळजळीत व पूर्वेकडील भाग रक्तकमळासारखा लाल होऊन मधला भाग कोळशासारखा काळा दिसूं लागला व अंधुक अंधुक दिसणाऱ्या ताऱ्यामुळें एकंदर आकाश जळून गेलेल्या पर्वताप्रमाणें भासूं लागलें. अशा त्या शांत पण क्रूर वेळीं गांवांत रथ शिरल्याचा आवाज ऐकून गोप व गोपी, गाई व बैल एकदम दचकले. रथ पाहण्यास पुढें धांवत आलेल्या व आश्चर्यानें चकित झालेल्या गोपांस ‘ केशवाचें घर कोणतें ? ’ ‘ राम कोठें राहतो ? ’ ‘ नंदाचा वाडा कोणता ? ’ असें विचारीत विचारीत अक्रूर नंदाच्या वाड्याशीं येऊन पोंचला. रथांतून तडकन् उडी टाकून तो दरवाज्यांतून अंगणांत शिरला. तों श्रीकृष्णाची

मनोहर मूर्ति गाईच्या खालीं दूध काढण्यास बसलेली त्याच्या नजरेस पडली. हा विष्णूचा अवतार आहे असें समजून हजारों लोक ज्याच्या दर्शनास धांवतात, ज्याच्या नाशाकरितां कंसानें यापूर्वीं एवढा अट्टहास केला व हल्लीं करीत आहे,जो सर्व यादवांचा मुकुटमणि असून त्यांस श्रेष्ठपदास खचित पोंचविणार असें त्यास सर्व रस्ताभर वाटत होतें, तो सुंदर, सुस्निग्ध, तेजस्वी, पर्वतप्राय, पीतवसन श्रीकृष्ण समोर पाहतांच अक्रूरानें सद्गदित कंठानें " प्रभो " म्हणत त्यास साष्टांग नमस्कार घातला व " कृष्णा, ये, मला आलिंगन दे " असें म्हणून त्यास कडकडून आलिंगन दिलें. रथाच्या येण्यानें जिज्ञासा उत्पन्न झालेले वृद्ध वृद्ध गोप इतक्यांत नंदाच्या अंगणांत जमा झाले. पाहुणा कोण आला हें जाणण्यासाठीं नंदही घरातून बाहेर आला. बळराम दुसरीकडे दूध काढीत होता तोही तेथें आला व त्यासही अक्रूरानें आलिंगन दिलें. याप्रमाणें सर्व लोक जमा झालेले पाहून अक्रूरानें बोलण्यास सुरवात केली. " नंदा, कृष्णा, बळरामा, गोपांनो, तुम्हांस सर्वांस मथुरेस नेण्यासाठीं राजाच्या आज्ञेनें मी येथे आलों आहें. राम-कृष्णांची अगाध शक्ति व कुस्तीचें कौशल्य ऐकून कंसराजास त्यांचें सामर्थ्य पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे. कंसाच्या पदरींही चाणूर,मुष्टिक इत्यादि पुष्कळ बलवान् मल्ल आहेत, त्यांचें व यांचें नियुद्ध तुम्हांस पहावयास मिळेल. याशिवाय तुम्हां सर्वांच्या मनरंजनासाठीं कंस उद्या धनुर्मुख कर-णार आहे. तो पाहण्यास राज्यांतील सर्व लोकांप्रमाणें तुम्हांसही बोलाविलें आहे. तर आपण सर्वजण पहाटेस मथुरेस जाऊं. वसुदेवासही आपले हे देवासारखे पुत्र पाहण्याची उत्कंठा लागली आहे. बिचारी देवकी तर आपल्या या सुपुत्राचे दर्शनास जन्मापासून आज सोळा सतरा वर्षें अंतरली असल्यानें तिचे प्राण कंठांत आले आहेत. तर कृष्णा, संकर्षणा, आप-ल्यास उद्यां पहाटेस उठून मथुरेस गेलें पाहिजे. नंदा, तूंही राजास देण्याचा करभार व नजरनजराणा घेऊन या गोपांसह आमच्या बरोबर चल. " हें अक्रूराचें भयंकर भाषण ऐकून नंदाच्या व गोपांच्या डोक्यावर एकदम आकाश कोसळावें तसें झालें. हा काय प्रकार आहे हें त्यांस समजेना. ते आश्चर्यानें व दुःखानें एकमेकांकडे शून्यवत् पाहूं लागले. शेवटीं नंद म्हणाला, " आपल्या पाहुण्याचा फराळ होऊन श्रमपरिहार झाला म्हणजे

त्यास आपण सर्व हकीकत फिरून विचारूं. तोंपर्यंत तुम्ही घरीं जाऊन उद्यां पहाटेस निघण्याची तयारी करा आणि राजास अर्पण करण्याचे पदार्थ म्हणजे उत्तम उत्तम गाई, बैल व दूधतूप हीं एकत्र करा." हें नंदाचें भाषण ऐकून सर्व गोप मुकाट्यानें आपापल्या घरीं गेले व नंदही आपल्या राजकीय पाहुण्याच्या योग्य आदरसत्कार्यास लागला.

भोजनें झाल्यावर अक्रूर, श्रीकृष्ण व बलराम जे एकान्तांत बसले ते पहाटपर्यंत. त्यांत मध्यंतरीं अडथळा आणून आणखी हकीकत विचारण्याचे नंदास धैर्य होईना. त्याची विचाऱ्याची स्वतःचीच कंबर खचून गेली होती. श्रीकृष्ण आपला पुत्र नव्हे हें ऐकून त्याला दाही दिशा शून्य झाल्या होत्या. त्याची पत्नी यशोदा तर दुःखाच्या आवेशानें जमीन धरून बसली. तिचें सांत्वन करण्यांत नंदाची सर्व रात्र जागून गेली. "कृष्णा, तुझें दर्शन मला कायमचें अंतरणार काय?" असें वारंवार विचारीत यशोदा सारखी रडत होती. गोकुळांतही ती दुष्ट वार्ता पसरून घरोघर रडारड सुरू झाली होती. गोविंद, दामोदर, माधव, अशा हाका मारीत सर्व गोपी आक्रोश करीत होत्या. श्रीकृष्णाचा आपल्यास अत्यंत वियोग होणार या कल्पनेनें त्यांचें हृदय फाटून गेलें होतें. याप्रमाणें तो व्रज सर्व रात्रभर शोकांत मग्न होता. त्या रात्रभर चाललेल्या शोकाच्या वर्षावास पहाटेस महापूर आला. पहाटेस सारथ्यानें अक्रूराचा रथ तयार करून अक्रूरास वर्दी दिली, तेव्हां त्या तिघांनीं पहाटेचीं नित्य कृत्यें आटोपून निघण्याची तयारी केली. श्रीकृष्ण बलरामासह रोहिणीस व यशोदेस भेटावयास गेला, तेव्हां श्रीकृष्णास पाहतांच यशोदेनें हंबरडा फोडून त्याच्या कंठास मिठी मारली! "कृष्णा, मी तुझी आई नव्हे काय? कृष्णा, तूं मला भेटायला पुन्हां परत येशील ना? मला वाटतें तुझी माझी ही शेवटचीच भेट आहे. कृष्णा, तू जाऊं नकोस! तूं येथून गेलास तर माझे प्राण तुझ्या बरोबरच निघून जातील. रामचंद्र वनवासास गेले तेव्हां कौसल्या चवदा वर्षांनीं तरी रामचंद्राचें मुख पहावयास मिळेल या आशेनें जीव धरून बसली होती. कृष्णा! मी कोणत्या आशेवर जीव धरूं? कृष्णा! आजवर मीं तुझें पालनपोषण केलें, तुझे लाड पुरवले, तुला मीं आपल्या अंगावर दूध पाजलें, तें सर्व आज फुकट गेलें काय? तूं खरोखरच आमचा कोणी नाहींस काय? कृष्णा! मी जर तुझी

आई असेन, व माझ्यावर जर तुझें प्रेम असेल तर तूं मला दुःखसमुद्रांत लोटून जाऊं नकोस ! " याप्रमाणें यशोदेचा आक्रोश ऐकून श्रीकृष्णाला गहिंवर आला. त्यानें प्रेमाच्या आवेशांत तिला म्हटलें, " आई, ज्याअर्थी जन्मल्या दिवसापासून तूं माझ्या प्राणांचें रक्षण केलेंस त्याअर्थी तूं मला माझ्या जन्मदात्री देवकीपेक्षांहि प्रिय आहेस. सर्व जगांत माझी माता म्हणून तुझेंच लोक यश गातील. मला कंसानें कुस्तीकरितां बोलाविलें आहे तर मला गेलेंच पाहिजे. ज्याला यश प्रिय आहे तो कुस्तीचें बोलावणें कसें अव्हेरील? ' तुला कुस्तींत यश येईल ' असा, आई, मला आशीर्वाद दे; आणि नेहमींप्रमाणें मला मांडीवर घेऊन माझ्या मस्तकाचें अवघ्राण कर. आई, मला तूं आनंदानें जाऊं दे. माझे मातापितर मथुरेस माझ्यासाठीं आज सोळा वर्षे दुःख करीत आहेत, त्यांचें दर्शन घेण्यास मला परवानगी दे." श्रीकृष्णाचे हे शेवटचे शब्द ऐकून यशोदानें आपलें दुःख आवरलें. तिनें त्यास मांडीवर घेऊन त्याच्या ताळूस प्रेमानें हुंगलें व ती त्यास म्हणाली, " कृष्णा, जा. तुझ्या देवकी मातेस काय दुःख होत असेल तें मला येथून समजत आहे. तुला कुस्तींत यशच येईल. तूं प्रत्यक्ष श्रीविष्णूचा अवतार आहेस. तुला अपजयाची वार्ता कशास शिवेल ? देवकीच्या पोटीं जन्म घेऊन तुझें सर्व बाळपण माझ्या घरीं गेलें, हेंच माझें महद्भाग्य. हेंच मला पुरें. तुझ्या बाळपणाच्या अद्भुत लीला स्मरण करून मी काळ कंठीन. तुझें बाळस्वरूप हेंच मला अत्यंत प्रिय आहे; हाच माझा जीव आहे; माझा बाळकृष्ण हाच माझा आधार आहे. जा, तूं सुखानें जा. तुझ्या भावी मोठेपणाच्या उत्कर्षांत तूं आम्हांस विसरलास तरी हरकत नाहीं. कारण तुझ्या बाळपणाचें जें सुख आम्हीं भोगिलें आहे तें इतरांस, किंबहुना देवांसही, दुर्लभ आहे. " असें म्हणत सुज्ञ यशोदेनें त्याच्या हातावर थोडें दहीं घातलें. तें श्रीकृष्णानें खाऊन सद्गदित कंठानें आईच्या चरणावर मस्तक ठेविलें, रोहिणीच्या ठेविलें, नंदाच्याही ठेविलें व तो बलरामासह रथांत बसण्यास घराच्या बाहेर पडला.

यशोदेचें समाधान लवकर झालें, पण बाहेर रथापाशीं जमलेल्या त्या शेंकडों गोपगोपींचें समाधान लवकर कसें व्हावें ? या वेळेस पहाट संपून अरुणोदय झाला होता. दिसायला लागून तारका अदृश्य झाल्या होत्या.

पक्षी आपआपल्या घरट्यांत किलबिल करूं लागले होते. गाई, बैल, श्रीकृष्णाचें शेवटचे दर्शन घेण्यास गोठ्यांत चळवळ करूं लागले होते. अशा वेळीं श्रीकृष्णाचें व बलरामाचें मुख पाहतांच जमलेल्या सर्व लोकांनीं गोविंद, दामोदर, राम, संकर्षण असा त्यांच्या नांवाचा एकच गजर केला. श्रीकृष्णाचें हें दर्शन शेवटचेंच असें गोपगोपींस खास वाटत होतें. श्रीकृष्णासही आदले रात्रीं अक्रूरानें सांगितलेल्या सर्व हकीकतीवरून आपण पुन्हा व्रजांत परत येणार नाहीं असेंच वाटत होतें. यामुळें त्या दोघांचेंही अन्तःकरण त्या वेळीं क्षुब्ध झालें. दोघांच्याही नेत्रांतून पाणी वाहूं लागलें. समवयस्क मल्ल गोप व कांहीं वृद्ध गोप पाठीराखे म्हणून श्रीकृष्णाबरोबर येणार होते, ते आपआपल्या गाड्यांत बसले. बाकीच्यांस श्रीकृष्ण व बलराम यांनीं आलिंगन देऊन ' येतों, आमची आठवण असूं द्या, '' इत्यादि शब्दांनीं त्याचा निरोप घेतला. पण गोपींचा निरोप घेतांना श्रीकृष्णाच्या तोंडांतून शब्द निघेना. त्यांची विलक्षण भक्ति व त्यांचें त्या वेळचें परम निराशेचें स्वरूप पाहून त्याचा कंठ भरून आला ! गोपीही सद्गदित होऊन म्हणाल्या, ''कृष्णा ! आम्हाला सोडून तूं जाणार ना ? आजवर आम्हांला स्वप्नांत ठेवून आतां आम्हांस तूं जागें केलेंस ! हजारों संकटांतून आमचें रक्षण करून आम्हांवर प्रेम केलेंस आणि आतां आम्हांस दुःखांत लोटून तूं जाणार ? तूं खरोखर देव असून आमच्या गरीबांत कसा जन्मास आलास याचें आम्हास नेहमीं आश्चर्य वाटे; शेवटीं तेच खरें झालें. तूं आमचा नाहींस हें पाहून आमच्या रक्ताचें पाणी झालें आहे ! आमचें पूर्वजन्मींचें पुण्य थोडें तरी होतें, म्हणून तुझें बाळपण तरी आमच्यांत गेलें. ब्रह्मदेव खरोखर दुष्ट आहे, त्याला कोणालाही नेहमीं सुखांत नांदतांना पहावत नाहीं. त्यानें आमच्या आजवर सुखांत रुळलेल्या व्रजावर आज कायमची दुःखाची छाया पसरली. कृष्णा, तूं आतां आमच्यांत परत येणार नाहींस हे आम्हांस पक्कें माहीत आहे. तुझा मुखचंद्र पुन्हा आमच्या दृष्टीस पडणार नाहीं. तुझी सुस्वर वेणू पुन्हा आमच्या कानीं येणार नाहीं. तूं आम्हीं गांवढळांबरोबर पुन्हा कधीं रास खेळणार नाहींस. असो. तूं जरी आम्हांस टाकलेंस तरी आम्ही तुला टाकणार नाहीं. तुझें ध्यान सतत करून आम्ही आपले प्राण ठेवूं. तुझ्या लीला वारंवार गाऊन आम्ही आपलें राहिलेलें आयुष्य दुःखानें संपवूं.

गोविंद, दामोदर, कृष्ण इत्यादि तुझ्या नांवांचें सारखें स्मरण करून तुला हांका मारूं. तूं ज्या रस्त्यानें गेलास, तूं ज्या ठिकाणीं फिरलास त्या त्या ठिकाणच्या धुळीनें आम्ही आपलें अंग माखून घेऊन आपल्या पापांचें क्षालन करूं. तूं जेथें जेथें आमच्याशीं रास खेळलास तेथें तेथें तुझ्या उमटलेल्या पावलांजवळ प्रहरोप्रहर बसून त्यांस आमच्या अश्रूंनीं अभिषेक करूं. " याप्रमाणें गोपींचा शोकपूर वाढूं लागला, तेव्हां सर्व सृष्टीच्या नेत्रांतून अश्रुधारा खळखळ वाहूं लागल्या. झाडें, घरें हीं पहाटेच्या दंवाच्या मिषानें अश्रु ढाळूं लागलीं व पृथ्वीवरील पाषाणही ओले झाले ! तो शोकपूर थांबवून शेवटीं श्रीकृष्ण म्हणाला, " गोपींनो, मीच खरोखर अभागी कीं मी तुमच्या अनन्य भक्तीला आज अंतरतों आहें. तुम्हीं माझ्यावर जें प्रेम केलें व करीत आहां तें आजवर कोणीं केलें नाहीं किंवा यापुढेंही कोणी करणार नाहीं. माझ्या भक्तीची तुमच्या ठिकाणीं सीमा झाली. तुमच्या भक्तीची आठवण करून भगवंताचें जे नाम घेतील ते भवसमुद्र तरून जातील. असो. तुमचा माझा वियोग होत आहे तो केवळ माझ्या कर्तव्याकरितां होत आहे. पण मी जरी येथून शरीरानें जात आहें तरी माझा आत्मा याच ठिकाणी वास करील. गोपींनो, मी तुम्हांस नमस्कार करतों व माझ्याहून लहान आहेत त्यांना आशीर्वाद देतों. माझी तुम्ही आठवण ठेवा हें सांगणें म्हणजे तुमच्या भक्तीस कलंक लावणें आहे." असें म्हणत श्रीकृष्ण व संकर्षण रथांत बसले, व अक्रूरानें स्वतः सारथ्य पत्करून घोड्यांस इषारा केला. तेव्हां रथ चालूं लागला. ' थांब, अक्रूरा, थांब, रथ चालवूं नकोस; आम्हांला श्रीकृष्णाचें पुन्हा एकवार मुखकमल पाहूं दे; त्याच्या पायांवर आम्हांस मस्तक ठेवूं दे; त्याचे मधुर शब्द पुन्हा एकवार आम्हांस ऐकूं दे; अक्रूरा, भगवंताचें शेवटचें दर्शन आम्हांस पुन्हां घेऊं दे. " इत्यादि गोपींचे गहिंवरयुक्त शब्द एकावर एक ऐकूं येऊं लागले, पण अक्रूरानें क्रूर हृदय करून रथ चालूच ठेविला. रथ जोंपर्यंत दिसत होता तोंपर्यंत व रथाचा आवाज कानीं पडत होता तोंपर्यंत त्या गोपिका जागच्याजागीं तटस्थ पहात होत्या. तो रथ दिसेनासा झाला, त्याचें निशाणही दिसेनासें झालें, तेव्हां " हायरे हाय, आमचा हिरा बाळ श्रीकृष्ण अक्रूरानें हिरावून नेला, " असें

ओरडून सर्व गोपी मूर्छित होऊन खालीं पडल्या ! ( हरिवंश, २५–२६ भाग० द० ३७–३८ ).

दुःखसमुद्र मागें टाकून कठिण हृदयानें अक्रूरानें जो रथ चालवला, तो झपाट्यानें एका प्रहरांत मथुरेस नेऊन पोंचविला. नंद व मल्लगोप व इतर वृद्ध-गोप ज्या गाड्यांत बसले होते, त्यांचेही बैल चांगले असल्यानें अक्रूराच्या रथाच्या मागोमाग चालत होते. मथुरा दिसावयास लागली, तेव्हां अक्रूरानें कृष्णास व नंदास सर्वजण माझ्या घरीं चला आणि माझें घर पवित्र करा असा आग्रह केला. पण " आर्यास ( वसुदेवास ) भेटून नंतर त्याजबरोबर तुझ्या घरीं येऊं " असें नंदानें व कृष्णानें सांगितलें. सध्यां आम्ही आपल्या नेहमीच्या जागेंत उतरतों असें म्हणून मथुरेच्या बाहेरच्या एका बागेंत त्यांनीं मुक्काम केला. यमुनेवर स्नान व बरोबर आणलेल्या भाकऱ्यावर भोजन करून श्रीकृष्ण, बलराम व त्यांचे साथीदार मल्ल मथुरा पहावयास व नंतर कुस्त्यांच्या ठिकाणाकडे जावयास निघाले. इकडे अक्रूरानें झालेल्या काम-गिरीची वर्दी कंसास दिली व तोही आपल्या घरीं गेला. श्रीकृष्णानें आजवर मथुरा इतकी जवळ असूनही पाहिली नव्हती. तिचा मजबूत कोट, उंच दरवाजे, रुंद रस्ते, मोठमोठाले वाडे पाहून त्यास मोठें कौतुक वाटलें. याच शहरांत माझा जन्म झाला असून माझा पिता बंदिवासात होता व हल्लीं अज्ञात-वासांत आहे हें मनांत येऊन त्यास अतिशय दुःख झालें. " कंसाच्या जुलुमामुळें येथील सर्व क्षत्रिय त्रस्त आहेत, त्यांची सुटका आजच मी करतों" असा नेहमीच्या निश्चयी स्वभावाप्रमाणें आपणाशीं निश्चय करून थोडा वेळ मथुरा पाहण्यांत घालविल्यानंतर तो राजवाड्याकडे व धनुर्मखासाठीं मुद्दाम प्रेक्षागार उभारलें आहे असें त्यास कळलें त्याकडे वळला. मुख्य लढणाऱ्या मल्लांस योग्य असा आपला वेष असावा या हेतूनें व कुचेष्टा केल्याशिवाय प्रतिष्ठा वाढत नाहीं हें ध्यानांत आणून, राजाच्या रंगाऱ्याच्या दुकानीं सुंदर सुंदर वस्त्रें रंगवलेलीं दृष्टीस पडलीं तेथें ते दोघे वीर व त्यांचे अनुयायी उभे राहिले व त्याजपाशीं त्यांनीं वस्त्रें नेसावयास मागितलीं. त्यांचें तें गांव-ढळ स्वरूप पाहून त्या रंगाऱ्यानें " जा भिकारड्यांनो,तुम्हां गांवढळांना हीं उंची राजवस्त्रें काय होत " असा निर्भर्त्सनेचा जबाब दिला.त्याबरोबर एक जोराची चढकण देऊन श्रीकृष्णानें त्यास तात्काळ यमसदनास पाठविलें.

नंतर त्या दोघां मल्लांनीं आपणांस हवीं होतीं तीं वस्त्रें घेऊन बाकीचीं तेथेंच टाकून दिलीं. पुढें फुलमाळ्याचें दुकान लागलें. तेथें त्यांनीं त्याजपाशीं हार मागितले, ते त्यानें प्रेमानें व आदरानें दिले. त्यास आशीर्वाद देऊन व ते हार गळ्यांत घालून ते वीर पुढें चालले. तों राजाची कुब्जा दासी राजा-करितां उत्तम गंध व उटणें घेऊन जात होती. तिला तूं कोण कोठें जात आहेस, असा श्रीकृष्णानें प्रश्न केला तेव्हां " तुम्ही कोणी बाहेरचीं माणसें दिसतां, मी राजाची प्रसिद्ध कुब्जा दासी तुम्हांस कशी माहीत नाहीं ! राजाच्या स्नानाची वेळ झाली आहे; त्याकरितां उटणें व गंध घेऊन जात आहे, " असें तिनें उत्तर केलें. तेव्हां हें गंध आम्हांस लावावयास दे, असें मागतांच तिनें मोठ्या आदरानें त्या दोघां सुंदर मल्लांस तें गंध देऊन टाकलें. तें गंध त्या दोघां वीरांनीं आपल्या कपाळीं व अंगांस लाविलें तेव्हां ते दोघे वस्त्र, माल्य व गंध यांनीं अत्यंत शोभूं लागले. ज्या धनुष्याचा मख व्हावयाचा आहे, तें धनुष्य कसें आहे हें पाहण्याकरितां राजवाड्यापाशीं पोंचून ते आयुधागारात गेले. त्या ठिकाणीं तें धनुष्य बाहेर काढून ठेविलेंच होतें, व शेंकडों लोकांची गर्दी तें धनुष्य पाहण्यास तेथें जमलीच होती. तेथें श्रीकृष्णानें हें धनुष्य किती जड आहे तें मी पाहतों असें पाहेकऱ्यास म्हणून तें धनुष्य त्यानें सहज उचललें व धनुष्याची दोरी लीलेनें चढवून ती दोरी ओढली त्याबरोबर त्या जुन्या झालेल्या धनुष्याचें लांकूड काडकन् मोडून गेलें. त्या धनुष्याच्या मोडण्याच्या आवाजानें तेथील लोकांच्या कानठळ्या बसल्या. तो अद्भुत पराक्रम पाहून जमलेल्या लोकास मोठें आश्चर्य वाटलें. व्रजांतील ज्या गोपमल्लांची आज कुस्ती व्हावयाची आहे ते हेच, ज्या वसुदेवाच्या पुत्रास मारण्याचा कंसानें अट्टहास चालविला आहे तो हाच, असें म्हणत लोकांनीं त्यांच्या भोंवतीं गर्दी केली. श्रीकृष्णाची ती दिव्य बालरूपानें अधिकच मनोहर दिसणारी सशक्त व सुबुद्ध मूर्ति पाहून लोकांस आपल्या नेत्राचें पारणें फिटलें असें वाटलें. असो; लोकांच्या गर्दीतून वाट काढीत काढीत प्रेक्षागाराकडे ते जावयास निघाले; तेव्हां आयुधागारांतील पाहरेकरी, मखाकरितां काढलेल्या धनुष्याचे श्रीकृष्णानें तुकडे केले, असें कंसास सांगण्यास धावले ( हरिवंश, अ० २७ ).

बारा वाजण्याच्या सुमारास प्रेक्षागाराकडे प्रेक्षकांची रीघ लागून थोड्या

वेळांत तो मंडप प्रेक्षकांनीं भरून गेला. मोठमोठे सरदार आपापल्या शृंगारले-ल्या जागेवर जाऊन बसले. सामान्य लोकांच्या श्रेणी व गण आपापल्या धंद्याचीं सूचकचित्रें काढलेल्या पताकांनीं शोभिवंत केलेल्या जागेंत बसले. भरजरी जाळीचे रत्नमंडित पडदे सोडलेल्या दालनांत अंत:पुरांतील स्त्रिया बसल्या. आकाशांत हंसाप्रमाणें शोभणाऱ्या पांढऱ्या उंच माळ्यांवरून जाळींमधून पाहण्याच्या जागा केल्या होत्या, त्या शहरांतील स्त्रियांनीं भरून गेल्या. निरनिराळे दरवाजे असून जाण्याचे रस्ते रुंद असल्यानें सर्वांस आप-आपल्या ठिकाणीं सहज बसतां आलें. याप्रमाणें तो मंडप प्रेक्षकांनीं गच्च भरून समुद्रासारखा शोभूं लागला. त्याचे अष्टकोनी खांब चित्रांनीं व पल्ल-वांनीं शोभिवंत केले असून दरवाजे पताकांनीं व खिडक्या अर्धचंद्राकृति मालांनीं सुशोभित केल्या होत्या. ठिकठिकाणीं सुवर्णाचे मंच लागले असून त्यांजवर उत्तम उत्तम गालीचे पसरले होते. सर्व रस्त्यावरून बनात पसरली असून मुख्य वेदीवरील राजाच्या सिंहासनापासून तो पूर्वाभिमुख दरवाजापर्यंत रंगातून पायघड्यांचा तांबडा उंची गालिचा पडला होता. जागजागीं प्रेक्षकांची तहानभूक भागविण्यासाठीं सुवर्णमंडित घटांत जल भर-लेलें असून तेथे कषाय, आसवें व फळफळावळ सेवकांच्या नजरेखालीं सज्ज होती. दरवाजावर राजाचे कित्येक सैनिक सज्ज असून कुवलयापीड हत्तीही झुलत होता व शृंगारलेले कोतवाल घोडे खिकाळत होते. याप्रमाणें सर्व तयारी होऊन वाघ वाजल्याबरोबर कंसाची स्वारी राजवाड्यातून प्रेक्षा-गाराकडे जावयास निघाली. यज्ञाकरिता काढलेलें धनुष्य कृष्णानें मोडून टाकलें ही बातमी ऐकून कंसानें आपलें चेन मोडलें नाहींत. भीतीची उठलेली लहर क्रोधाच्या लहरीनें दबून जाऊन त्याचे नेत्र क्रोधानें लाल झाले. "काय चिंता आहे, मस्त हत्तीकडून त्या पोरास चिरडून टाकतों" असें म्हणत त्यानें दुसरें धनुष्य तयार ठेवण्याविषयीं सेवकास आज्ञा केली. व पालखींत पाय ठेवला. हा हां म्हणतां राजवाड्यांतून निघून कंसाची स्वारी प्रेक्षागारापाशीं पोचली तेव्हा शिंगांच्या उंच ललकाऱ्यांनीं दाही दिशा भरून गेल्या. पालखींतून उतरून मुख्य दरवाजानें कंसाची स्वारी मंडपांत शिरली, तेव्हां सर्व लोक उठून उभे राहिले. स्वच्छ पांढरीं उंची वस्त्रें परि-धान केलेली, हिऱ्यांचा पांढरा मुकुट घातलेली, डोक्यावर पांढरें छत्र धर-

लेली, त्याची तेजस्वी मूर्ति पाहून लोकांनीं जयशब्दानें त्याचें स्वागत केलें. रंगामधून घातलेल्या गालीच्यावरून झपाझप चालत जाऊन, पायऱ्या चढून कंस आपल्या सिंहासनावर विराजमान झाला. तेव्हां शेंकडों भालदारांच्या ललकाऱ्यांनीं तें प्रेक्षागार दणाणून गेलें. तितक्या अवधींत सेवकांनीं रंगातील पायघड्या चटकन उचलून घेतल्या. क्षणभरानें कंसाचा इषारा होतांच कुस्तीकरितां बोलाविलेले मल्ल आपआपल्या मंडळीसह तुताऱ्यांच्या आवाजांत रंगांत शिरून कंसास मुजरा करून त्यांच्यासाठीं मुद्दाम राखिलेल्या रंगाजवळच्या जागेंत भालदारांनीं दाखविल्याप्रमाणें बसले. शेवटीं श्रीकृष्ण व बलराम आपल्या गोपमल्लांसह आले. त्यांचीं मुखें प्रसन्न असून त्यांच्या गळ्यांत व डोक्याभोंवतीं फुलांचे हार होते. त्यांचें उघडें बांधेसूद लोखंडा-सारखें शरीर बाळपणच्या गोंडसपणानें व सुटसुटितपणानें फारच मनोहर दिसत होतें. त्यांनीं पिंवळें व निळें वस्त्र परिधान केलें असून काच्या मारला होता. तुताऱ्याच्या आवाजांत त्यांची सलामी झाली, तेव्हां दरवाजावरील सर्व लोकांचें लक्ष त्याजकडे वेधलें. त्यांचें पर्वतप्राय शरीर व सुंदर बाळरूप पाहून हेच ते रामकृष्ण असा मनाशीं निश्चय करून कुवलयापीडाच्या माहुतानें त्याजवर आपला हत्ती चालविला. तें पाहतांच तेथें असलेल्या सर्व लोकांत हाहा:कार उडाला. तो मंदस्राव चाललेला, माणकासारख्या लाल डोळ्यांचा हत्ती आपल्याच अंगावर येत आहे, असें पाहून श्रीकृष्णास अतिशय संताप आला. कंसाच्या दुष्टपणाची व नीचपणाची कमाल झाली असें मनांत येऊन कंस आज खचित यमाच्या घरीं जाणार असें त्यास वाटलें. " घाबरूं नका, मी याचा सहज समाचार घेतों " असें आपल्या अनुयायांस म्हणत तो धाडसी, विद्युल्लतेसारखा चपल व हत्तीसारखाच बलवान् श्रीकृष्ण दंड थोपटून पुढें सरसावला. व त्यानें मोठ्यानें एक आरोळी ठोकली. त्याबरोबर तो मस्त हत्ती चिडून त्याजवरच घसरला व त्यानें कृष्णाभोंवतीं आपली सोंड टाकली. कुस्तीच्या पेंचाप्रमाणें त्या सोंडेचाच आधार घेऊन श्रीकृष्ण चटकन हत्तीच्या पाठीकडे आला. व त्याच्या पोटाखालीं शिरून त्यानें आपल्या वज्रमुष्टींनीं पोटावर असे प्रहार चालविले कीं, तो हत्ती संतापानें व वेदनेनें गरगर फिरूं लागला. श्रीकृष्ण कोणीकडे आहे हें चांचपडण्यासाठीं त्यानें शुंडाग्रानें एका बाजूस पाहावें

तों तो दुसऱ्या बाजूकडे. याप्रमाणें श्रीकृष्णानें त्या हत्तीची त्रेधा उडवून दिली. या रीतीने कांहीं वेळ त्याची मस्ती जिरवून श्रीकृष्ण पुन्हां त्या हत्तीच्या समोर येऊन दंड थोपटून उभा राहिला. हें पाहून तो चवताळलेला हत्ती दांतांचा प्रहार करण्यासाठीं त्याजवर चालून गेला व त्यानें दांत भोसकण्यासाठीं एकदम मोहोरा करून गुडघे टेकले. श्रीकृष्णानें तोच दांत पविऱ्यांत उभें राहून दोन्हीं हातांनीं धरून जोरानें वर उचकला. हत्तीचा वरून जोर व श्रीकृष्णाचा खालून, ह्याप्रमाणें दुहेरी जोरात तो दांत काडकन मोडून हत्तीचे तोंड रक्तबंबाळ झालें. इतक्यांत त्याच दातानें श्रीकृष्णानें पुढे गुडघे टेकलेल्या हत्तीच्या मस्तकावर तात्काळ असा एक जोराचा फटकारा मारला कीं, तो एवढा प्रचंड हत्ती पण मस्तक फुटून घेरी येऊन धाडकन खालीं पडला व त्यानें क्षणभरानें हगत, मुतत व मोठ्यानें चीत्कार करीत प्राण सोडला. हत्ती कोसळल्याबरोबर तो माहूतही खालीं पडला. त्याजलाही श्रीकृष्णानें दाताच्या फटकाऱ्यानें लागलींच यमसदनास पाठविलें. याप्रमाणें त्या प्रचंड हत्तीचा एक्या अर्ध्या घटकेंत श्रीकृष्णानें नाश केलेला पाहून सर्वांनीं तोंडात बोटें घातलीं, व श्रीकृष्ण आणि बळराम वीरश्रीनें गर्जना करीत रंगाच्या दरवाज्यात शिरले ( हरिवंश, अ० २९ ).

हत्तीची व श्रीकृष्णाची झुंज कंसानें पाहिली. हत्तीस ठार मारून श्रीकृष्ण रंगद्वारांत शिरला, तेव्हां कंसाचे पाय भीतीनें लटलट कांपूं लागले. मदोन्मत्त हत्ती ज्याने केवळ बाहूंनीं ठार मारिला, त्यापुढें चाणूराचा काय टिकाव लागणार असें मनांत येऊन आपलीं शंभर वर्षें आज भरलीं, असें त्यास पक्कें वाटलें. इकडे प्रेक्षकांनींही ती झुंज पाहिली होती, त्यांस ती अद्भुत कृष्णलीला पाहून परमावधीचे आश्चर्य वाटलें. हा खरोखरच कोणी देव अवतीर्ण झाला आहे, असें समजून त्यांनीं श्रीकृष्णाचें प्रचंड जयघोषानें अभिनंदन केलें. मदस्रावानें व रक्तानें माखलेलें श्रीकृष्णाचें उघडें शरीर, त्याच्या हातांतील अर्धचंद्राकार हस्तिदंत व त्याचे विशाल आरक्त झालेले नेत्र पाहून निरनिराळ्या व्यक्तींस निरनिराळा भास झाला. कंसास अंतकाप्रमाणें, मल्लांस अशनीप्रमाणें, यादवांस विष्णूप्रमाणें, सामान्य लोकांस सम्राट् राजाप्रमाणें, स्त्रियांस कामदेवाप्रमाणें व देवकीस बाळाप्रमाणें श्रीकृष्ण

भासला. क्षणभरानें आपल्या भीतीस मागें टाकून कंसानें डोळे फाडून कृष्णाकडे पाहात चाणूरास त्याशीं कुस्ती करण्याची आज्ञा केली व मुष्टिकास बलरामाशीं भिडण्याची आज्ञा केली. तेव्हां ते मल्ल आपआपल्या मंडळींतून आपआपल्या गुरूंस वंदन करून उठले. इकडे श्रीकृष्ण व बलरामही आपल्या गोपमल्लांस योग्य ठिकाणीं बसवून व वृद्ध मल्लांची आज्ञा घेऊन हौद्यांत उतरले. त्या वेळेस ते बाळमल्ल त्या दोघां प्रौढ व कसलेल्या मल्लासमोर कुस्तीस उभे राहिलेले पाहून सर्व यादव, वृष्णि, व भोज वीरांस हा अन्याय आहे असें वाटूं लागलें. ही कुस्ती योग्य नाहीं असेंही कित्येक कुजबुजूं लागले. “ नियुद्धाचे नियम ब्रह्मदेवानें घालून दिले आहेत. ते सर्वांस मान्य असले पाहिजेत. कुस्ती रंगभूमीवर व्हावी. त्यांत पंच असावेत. कोणीही शस्त्राचा उपयोग करूं नये.ठराविक वेळानें दमलेल्या योद्ध्यास पाण्याचा घोट घेण्याची व गोमयाचें चूर्ण लावून आपला घाम जिरवण्याची परवानगी असावी. नंतर प्रतिपक्ष ज्या स्थितींत असेल त्याच स्थितींत दुसऱ्यानें पुन्हां युद्ध सुरू करावें. उभे असल्यास उभ्याने व भुईवर पडले असल्यास पडून सुरू व्हावें. योद्धा लहान आहे कीं वृद्ध आहे, कृश आहे कीं लठ्ठ आहे, बलिष्ठ आहे कीं अशक्त आहे हें परीक्षकांनीं ठरवावें. कोणाचें बल किती, कोणाचें चातुर्य किती, हें परीक्षकांनीं पाहून स्वत्या जोड्या लावाव्या. गडी चीत झाल्यावर प्रतिपक्ष्यानें त्यास कांहीं एक करूं नये, वगैरे कुस्तीचे नियम प्रसिद्ध आहेत. प्रस्तुत जोड्यांत वयाचें व शक्तीचें फारच अंतर दिसतें. कृष्ण व बलराम पोरवयाचे असून त्यांहून त्यांचे प्रतिपक्षी फारच बळकट दिसतात. ” अशी विनंति कंसास एका यादवानें उघड केली, तेव्हां प्रेक्षकांत अधिक गडबड सुरू झाली. पण इतक्यात श्रीकृष्णानें उत्तर केलें, “ सभ्यहो, मी लहान असून हा मल्ल धिप्पाड आहे खरा, पण अशा प्रतिपक्ष्याशींच कुस्ती खेळण्यास मी तयार आहे. युद्धाच्या नियमांचा मी अतिक्रम करणार नाहीं. शेणाचा चुरा अंगाला लावणें किंवा पाण्यानें अंग पुसणें, किंवा अंगाला काव फासणें इत्यादि आखाड्याचे संप्रदाय आहेत, ते मला मान्य आहेत. पण हे सर्व नियम जेथें आकसानें कुस्ती होत नाहीं तेथें पाळावयाचे आहेत. हा चाणूर करुष देशांतील असून आकसानें युद्ध करणारा आहे. आपलें प्रचंड सामर्थ्य दाखविण्यासाठीं

प्रतिपक्षी चीत झाल्यावरही यानें कित्येकांस ठार मारलें आहे. हा आकसानें युद्ध करण्यास या वेळीं उभा आहे, तेव्हां धर्मयुद्धाचे नियम बाजूस ठेविले तरी हरकत नाहीं. मी याचा वध करून यास याच्या पूर्वकर्माबद्दल उचित प्रायश्चित देतों. " असें श्रीकृष्ण म्हणत आहे तोंच दंड थोपटून ते दोघेही योद्धे एकमेकांवर त्वेषानें आदळले. ज्याप्रमाणें मस्तीस आलेल्या हत्तींची रानांत झुंज लागते, त्याप्रमाणें श्रीकृष्णाची व चाणूराची निकराची झुंज त्या रंगांत लागली. एकमेकांस ओढीत, छातीवर छाती रेटीत, मनगटाचे दंडुके देत, डोक्यावर डोकें थडकीत, वज्रप्राय तळहाताच्या डोक्यावर ताड-ताड चडकणा मारीत, पुन्हा एकमेकांपासून दूर होऊन दंड थोपटून पुन्हा भिडत, पेच किंवा तोड वारंवार करीत करीत असता त्यांजवर नजर ठरत नव्हती. याप्रमाणें त्या दोघां बलिष्ठांचें व नियुद्धकुशलांचें ते आकसाचें युद्ध पाहून प्रेक्षकांच्या हृदयांत थर्रर होऊन अंगावर कांटा उभा राहिला ' वाहवा ' ' शाबास, ' ' हाय, ' ' अरेरे, ' इत्यादि शब्द त्यांच्या तोंडांतुन निघूं लागले. याप्रमाणें कृष्णचाणूरांचें युद्ध चाललें· त्याच वेळेस आखाड्याच्या दुसऱ्या हिश्श्यांत बळराम व मुष्टिक यांचीही कुस्ती चालू झाली, व तेही अप्रतिम बलशाली मल्ल एकमेकांस चीत करण्याचा नव्हे तर ठार मारण्याचा प्रयत्न करूं लागले.

याप्रमाणें त्या वीरांचें प्राणांतिक युद्ध चालू असतां कंसाचें सर्व लक्ष श्रीकृष्णाकडे वेधलें होतें. तो त्याजकडे पापणीस पापणी न लावतां पाहत होता. त्याचे सर्व प्राण डोळ्यांत आले होते. त्यास यत्किंचितहि गलबला सहन होईना. त्यानें डाव्या हाताच्या खुणेनें प्रेक्षकांची गडबड बंद करविली. उजव्या हातानें मृदंग वगैरे वाद्यें वाजत होतीं, तींही बंद करविलीं. चोंहीं-कडे गप्प झालें तेव्हां त्याचा जोरानें चाललेला श्वास सुद्धां ऐकूं येऊं लागला. श्रीकृष्णाची सरसी होई त्या वेळेस त्याच्या अंगांतून घाम येई. चाणूराची होई तेव्हां त्याच्या चेहऱ्यावर प्रफुल्लता दिसे. शेवटीं चाणूराचा दम कमी पडून त्याची बाजू लंगडी पडूं लागली. तेव्हां श्रीकृष्णानें त्यास उभ्या उभ्या आपल्या बाहूंनीं वांकवून छातीवर गुडघ्याची ठोकर दिली, आणि इतक्या जोरानें मुष्टिप्रहार केला कीं, त्याचे रक्तानें थबथबलेले डोळे डोक्यांतून बाहेर पडून लोंबकळूं लागले व लागलीच तो गतप्राण होऊन धाडकन

खाली पडला. तें श्रीकृष्णाचे घोर पण विलक्षण कृत्य पाहून सर्व प्रेक्षकांनीं आनंदानें जयजयकाराची गर्जना केली. श्रीकृष्णही सिंहनाद करून दंड थोपटून रंगात कंसाकडे पाहत उभा राहिला. तेव्हा कंसाज्ञेनें तोशल नावाचा दुसरा मल्ल श्रीकृष्णाशीं युद्ध करण्यास उठला. दंड थोपटण्याचा भयंकर आवाज काढून ते तात्काळ एकमेकांशीं भिडले व त्यांचेही एकमेकांचे प्राण घेण्याचे उपाय चालू झाले. इतक्यात बलरामाने आपल्या वज्रमुष्टीचा प्रहार इतक्या जोराने मुष्टिकाच्या डोक्यावर केला कीं, त्याचेही डोळे बाहेर पडून तो मरून खालीं पडला. ते पाहताच श्रीकृष्णानेंही विलंब न लावता पर्व ताच्या शिखरासारख्या त्या प्रचंड तोशलाला उचलून डोक्याभोंवतीं फिर- वून जमिनीवर जोराने हापटले, तेव्हा तोही मरणोन्मुख होऊन त्याच्या मुखातून रक्त वाहू लागलें.

याप्रमाणें तिघां अति बलाढ्य मल्लास ठार मारून श्रीकृष्ण व बलराम यांनीं रंगात उभे राहून सिंहनाद केला व क्रोधानें आपले वज्रप्राय दंड थोपटले. तो आवाज ऐकून बाकीचे सर्व मल्ल आपआपल्या जागीं थिजून गेले, व रंगस्थान मल्लशून्य होऊन भयंकर दिसूं लागलें. प्रेक्षकांपैकीं कित्ये- कास भीतीनें कंप सुटला, तर कित्येकास आनंदानें अश्रु आले. नंदादि वृद्ध गोप प्रेक्षकात होते, त्यांना आनंद व भय यांनीं एकदम घेरलें. देवकीस केवळ आनंदाचे अश्रु आले व पुत्रप्रेमाने तिच्या स्तनातून दूध वाहू लागले. वसुदेवाची जरा नाहींशी होऊन त्याचे पांढरे होत चाललेले केस एकदम काळे झाले. कंसाचे मात्र केस भीतीनें एकदम पांढरे पडले. त्याच्या अंगाला दरदरून घाम आला. त्याचा घसा कोरडा पडला. शेवटीं क्रोधानें व भीतीनें तो ओरडून, सेवकांना म्हणाला " अरे, या गवळ्याच्या पोरांना येथून हाक- लून द्या; हे दुष्ट पोर माझ्या नजरेसमोर नकोत. नंद गवळ्याला बेड्या घालून कैदेत टाका. या थेरड्या वसुदेवाला फटके मारणें योग्य नाहीं, पण याला दंडाने शासन करा. याने माझा भयंकर अपराध केला आहे. " या प्रमाणे कंस बडबडूं लागला तोंच श्रीकृष्ण चित्त्यासारखा रंगातून उडून त्याच्या सिंहासनाजवळ गेला. तो इतक्या तडाक्याने गेला कीं, तो आखाड्यातून केव्हा उडाला हें कोणास दिसले नाहीं. श्रीकृष्ण आपल्याजवळ आलेला पाह- तांच कंसाची गाळण उडाली. त्याचा मुकूट खालीं पडून केस मोकळे झाले.

ते धरून श्रीकृष्णानें कंसास खालीं रंगांत ओढलें. त्याबरोबर त्याचा प्राण भीतीनें व जमिनीवर आपटल्यानें निघून गेला. श्रीकृष्णानें त्यास रंगांत फरफटत ओढलें तेव्हां क्षत्रियांपैकीं कोणीही उठलें नाहीं किंवा तोंडांतून चकारशब्द काढला नाहीं. एक सुनामा नांवाचा कंसाचा बंधु मात्र श्रीकृष्णावर धांवला, त्याचा बलरामानें तात्काळ चेंदा उडविला. याप्रमाणें भयंकर प्रकार झालेला पाहून व श्रीकृष्णाची व बळरामाची क्रुद्ध मुद्रा पाहून सभागृह भराभर मोकळें होऊं लागलें. प्रेतांनीं भरलेला आखाडा टाकून ते दोघे वीरपुत्र वसुदेव बसला होता तेथें गेले व त्यांनीं त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. नंतर पायरीपायरीनें सर्व यादवांना व इतर क्षत्रियांना त्यांनीं नमस्कार केला. अंतःपुरांतील स्त्रियांत देवकी बसली होती तेथे जाऊन श्रीकृष्णानें देवकीच्या पायांवर डोकें ठेविलें, तेव्हां तिनें त्यास अश्रुधारांनीं व स्तनांतील दुग्धधारांनीं स्नान घातलें. याप्रमाणें मातापितरांना भेटून व नंदादि गोपांस नमस्कार करून बलदेव व श्रीकृष्ण वसुदेवदेवकीस घेऊन त्या प्रेक्षागृहांतून बाहेर पडले, आणि रथांत बसून आपल्या वाड्याकडे चालते झाले ( हरि० वि० अ० ३०, भाग अ० ४३–४४ ).

श्रीकृष्णाच्या भीतीनें दाबून टाकिलेला कंसस्त्रियांचा शोकपूर श्रीकृष्ण जातांच अंतःपुराच्या पडद्याचा बांध फोडून बाहेर निघाला. " हायरे ! देवा ! आम्हांवर कसा रुष्ट झालास ? " अशा आर्तस्वरानें आकांत करीत कंसाच्या स्त्रिया आखाड्यांत पडलेल्या कंसाच्या प्रेताजवळ येऊन बसल्या व त्याचे हात, पाय, डोकें आपल्या अंगावर घेऊन शोक करूं लागल्या. " नाथा ! आम्हाला अनाथ टाकून आपण एकटेच स्वर्गास कसें चालला ? प्रिया ! आमच्या अल्पस्वल्प इच्छाही आपण आजवर पुरविल्यात, आमचा शब्द खालीं पडूं दिला नाहीं, आणि आज आमच्यावर कां रुष्ट झालांत ? आमचे अपराध झाले असतील तर आम्ही पदर पसरतों. ते सर्व पोटांत घाला आणि आमच्याशीं एक शब्द तरी बोला ! आमच्याकडे प्रेमानें पहा, आम्हांला आपल्याजवळ घ्या. नाथा ! स्वर्गांतील स्त्रिया आपल्यास आमच्यापेक्षां अधिक प्रिय तर वाटल्या नाहींत ना ! छे ! छे ! त्या बाजारबसव्यांचें प्रेम आम्हांप्रमाणें कसें असेल ? कृतांता ! आमचें जीविताचें सर्वस्व आणि आमचें सुखाचें निधान तूं कसेंरे हिरावून नेलेंस ? पति हेंच आमचें परम

दैवत आहे. आतां आम्हीं कोणाच्या तोंडाकडे पहावें ! आम्हांलाही त्यांच्या बरोबर कां नेलें नाहींस ? महाराज, आपण आपल्या सिंहासनावर आपल्या तेजानें देदीप्यमान असें आतांच बसलां होतां ! ते या मातींत कां येऊन निजलांत ! आपलें तेज सर्व राजांवर चमकत होतें. शेंकडों मांडलिक आपल्यास करभार अर्पण करीत होते व रत्नें आणून देत होते ते कोठें गेले ? आपलें चतुरंग अजेय सैन्य, ज्यानें आपण इंद्रासही जिंकलेंत, तें काय झालें ? जरासंधाचें आपल्यास पाठबळ होतें तें आज हतवीर्य कसें झालें ? महाराज, आपण सर्व राजांत पराक्रमी व बलिष्ठ होतां, ते एका गवळ्याच्या पोरानें आपली ही अवस्था केली तेव्हां काळ दुर्धर आहे असेंच म्हटलें पाहिजे, दुसरें काय ? “ मला देवांची किंवा दानवांची किंवा मनुष्यांची भीति नाहीं. मला स्वार्थी ज्ञातिबंधूंचीच भीति आहे ! ” असें जें रावणानें म्हटलें तें अक्षरशः खरें आहे ! महाराज, आतां आम्हीं कृष्णाच्या तोंडाकडे पहावें काय ? हाय ! हाय ! काय आमची दशा झाली आहे ! नाथा ! आमच्यावर कृपा करा. आम्ही आपले चरण धरितों, आपल्या पायांवर डोकें ठेवितों; आपण हा दीर्घ प्रवास धरला आहे तो सोडून आमच्याजवळ परत या ! छे, छे, आतां आमचे नाथ कसचे परत येतात ? आणि आम्हीं येथें जिवंत राहून रडत बसावें यांत अर्थ काय ? पतीबरोबर आम्हीं जावें हेंच आमचें कर्तव्य असून आम्ही येथें रडत बसलों आहों हें आश्चर्य नव्हे काय ? सेवकहो ! आमच्या सहगमनाची लवकर तयारी करा आणि आम्हांस या दुःखसमुद्रांतून बाहेर काढा. ” याप्रमाणें त्यांचा शोक चालला असतां कंसाची आई उग्रसेनासह तेथें आली. तीं दोघें बंदींत होतीं, त्यांस ती भयंकर हकीकत समजतांच पुत्रप्रेमानें तीं धांवत निघालीं; त्यांस कोणीं आडकाठी केली नाहीं. पुत्र कितीही दुष्ट व दुःशील असो, त्याचें मरण म्हणजे मातेस आकाशांतून पडलेल्या कुऱ्हाडीप्रमाणें दुःसह असतें. पुत्राचें प्रेत पाहतांच कंसाची आई त्या प्रेतावर धाडकन पडली. “ हायरे बाळा ! तुझी काय ही गति झाली ! पुत्रा ! मला टाकून तूं इतक्यांत कसारे निघून गेलास ? ह्या तुझ्या स्त्रिया करुणस्वरानें तुला हाक मारीत आहेत त्यांजकडे पाहा तरी. अहो महाराज ! या आपल्या वज्रानें छिन्न झालेल्या पर्वताप्रमाणें पडलेल्या पुत्राकडे पहा.याचें उत्तरकार्य राजास योग्य असें करण्याची व्यवस्था

करा. राज्य हें वीरांचेंच असतें हें खरें आहे, आणि आपण या वेळीं पराजित झालों आहों, तेव्हां श्रीकृष्णाची परवानगी मागून आणा आणि याला सद्गति द्या. वैर मरणांत असावें; प्रेतानें तुझा काय अपराध केला आहे असें त्या श्रीकृष्णास समजावा आणि याचें प्रेतकार्य चांगलें करा. हाय रे देवा! कशी आमची स्थिति दुर्धर झाली आहे!" असें म्हणून तिनें पुत्रास पुन्हां कवटाळलें. उग्रसेन शून्य दृष्टीनें पुत्राच्या प्रेताकडे पहात होता व भार्येचा व स्नुषांचा शोक ऐकून नेत्रांतून अश्रु ढाळीत होता. शेवटीं भार्येच्या म्हणण्याप्रमाणें कंसाच्या प्रेताची व्यवस्था लावण्याविषयीं परवानगी मागण्याकरितां तो मोठ्या दुःखानें श्रीकृष्णाकडे जावयास निघाला (हरिवंश, वि०अ३१).

इकडे श्रीकृष्ण, बलराम, वसुदेव व देवकी आपल्या वाड्यांत येऊन पोंचले. ज्या वाड्यांतून श्रीकृष्णास जन्मल्याबरोबर कंसाच्या भीतीनें आज सतरा वर्षें बाहेर नेऊन टाकलें होतें, त्या वाड्यांत आज कंसास ठार मारून श्रीकृष्ण परत आला असें पाहून, त्या वाड्यांत जो आनंद पसरला होता त्याचें काय वर्णन करावें! श्रीकृष्ण व बलराम दरवाज्यांत येतांच त्यांजवरून सेवकांनीं निंबलोण उतरविलें. आंत जाऊन त्यांनीं हात पाय धुऊन अंग पुसून स्वच्छ वस्त्रें परिधान केलीं व त्यांनीं आपल्या कुलदेवतांस नमस्कार केला. ज्या खोलींत श्रीकृष्ण जन्मास आला होता ती पाहून देवकीच्या डोळ्यांतून खळखळ पाणी वाहूं लागलें. "श्रीकृष्णा, आम्ही किती अभागी आहों! तुझा जन्म या खोलींत झाला त्या वेळेपासून आम्ही पुत्रसुखास आंचवलों. तुझें लालनपालन आम्हीं केलें नाहीं; तुझे बोबडे मधुर बोल आमच्या कानीं पडले नाहींत; तुला अंगावर घेऊन तुझ्या बालमुखाचें चुंबन आम्हीं घेतलें नाहीं. असो. तूं जिवंत राहून पराक्रम करून आज आम्हांला परत मिळालास हेंच मोठें भाग्य!" श्रीकृष्णानें उत्तर केलें, "आई, तूं अभागी नसून आम्हीच अभागी आहों. आम्हांस आपल्या मातापितरांना आजवर सुख देतां आलें नाहीं हें आमचेंच दुर्दैव! जे आपल्या मातापितरांस, साध्वी भार्येस, गुरूस व शरणागतास सुख देत नाहींत ते यमलोकीं आपलेंच मांस खाऊन भूक भागवितात. आई, आम्ही समर्थ असून आजवर तुमची कंसाच्या भीतीपासून मुक्तता केली नाहीं, तेव्हां आमचे इतके दिवस फुकट गेले. असो; आतां यापुढें तरी आम्हांस आईबापांची सेवा

अक्षय घडावी हीच परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. " हें भाषण होत आहे तों नंद वृद्ध गोपांसह वसुदेव—देवकीस व रामकृष्णास भेटावयास आला; तेव्हां सर्वास दुधांत साखर पडल्यासारखें झालें. वसुदेव—देवकीनें त्यांचें आनंदानें स्वागत केलें. श्रीकृष्णानें तर नंदास कडकडून आलिंगन दिलें आणि म्हटलें, " नंदा, तुझ्या कृपेनें मी सर्व संकटें तरून आज आपल्या आईबापांस भेटलों आहें. पण नंदा, तूं ताबडतोब व्रजास परत जा आणि यशोदामातेस आणि गोपांस सर्व आनंदाची बातमी सांग; सर्व हकीकत तूं प्रत्यक्ष पाहिलीच आहेस. " असें श्रीकृष्णानें म्हटले तेव्हां वसुदेवाने त्याची तात्काळ बोळवण केली. त्याचे अनंत उपकार स्मरण करून त्यास वस्त्रें, अलंकार, सुवर्ण अर्पण केलें व त्यास दारापर्यंत पोंचविलें. तों संध्याकाळचा समय होऊन सूर्य अस्तास जाऊं लागला. इतक्यांत अनेक यादववीर श्रीकृष्णाचें व बलरामाचें दर्शन घेण्याकरितां व वसुदेवास धन्यवाद देण्याकरिता तेथें आले. त्यांचा यथायोग्य आदर करून वसुदेवानें त्यास उत्तम आसनावर बसविलें. वसुदेवाचें अभिनंदन केल्यावर त्यांनीं कंसाच्या स्त्रियांचा विलाप श्रीकृष्णास सांगितला, तेव्हा श्रीकृष्णास अत्यंत वाईट वाटलें. तो म्हणाला, " यादवहो, रागाच्या आवेशांत मीं कंसाचा वध केला व त्याच्या अनेक स्त्रियांस वैधव्यदुःखांत लोटले याजबद्दल मला फार वाईट वाटतें. स्त्रियांचा आर्त स्वर ऐकून कोणाचें हृदय कळवळत नाहीं ? विधवांच्या करुण विलापानें कृतांतसुद्धां शोकसागरांत पडतो ! मग आपणां सर्वास दुःख होत आहे यात नवल कोणतें ? पण कंस पापी व सज्जनांचा द्वेषी असल्यानें त्याचा वध करण्याचा निश्चय मीं पूर्वींच केला होता. निर्दय व पापवृत्ति मनुष्याचा वध करणेंच श्रेयस्कार आहे. ज्याचा लोक धिक् शब्दानें अव्हेर करतात तो मेलाच आहे. दुष्कृत्यें करणें सोपें असल्यानें दुराचारी लोक जगतांत पुष्कळ निपजतात. यासाठीं कंसाच्या मरणानें त्याच्या अनन्वित कृत्यांचा उच्छेद झाला हें एका प्रकारें चांगलें झालें. यासाठीं कंसाच्या स्त्रियांचें सांत्वन करा आणि मथुरेंतील लोकांचेंही समाधान करा. " असें बोलणें होत आहे तों कित्येक आणखी यादवांस बरोबर घेऊन उग्रसेन तेथें आला. लज्जेनें तोंड खालीं घालून आलेल्या उग्रसेनास वसुदेवानें अत्यंत सत्कारानें मुख्य स्थानीं बसविलें, तेव्हां तो श्रीकृष्णास म्हणाला,

" कृष्णा, माझ्या पुत्रास पराक्रम करून तूं यमलोकीं पाठविलेंस यांत तूं स्वधर्म करून कीर्ति मिळविलीस. आपलें नांव पृथ्वीतलावर प्रथित केलेस. तुझे शत्रु तुला थरथर भिऊं लागले आहेत. यादवांची मजबूत पाया-वर तूं स्थापना केली आहेस. तुझ्या पक्षाकडील लोकांचीं मुखें अभिमा-नानें प्रफुल्लित झालीं आहेत. सामंतराजे आतां तुझ्याच भजनीं लागतील; द्विज तुझें स्तोत्र गातील; प्रजा तुझ्या आज्ञेनें वागतील. तर कृष्णा, कंसाचें हें राज्य तं आपल्या ताब्यांत घे; हे गज, रथ, अश्व, पदाति यांनीं भर-लेलें चतुरंग सैन्य आपल्या स्वाधीन करून घे. धन, धान्य, रत्नें, वस्त्रें सुवर्ण, दामदासी इत्यादि जी राज्याची संपत्ति आहे ती मोजून व पाहून घेण्यास आपले अधिकारी पाठीव. आम्हां दीन झालेल्या लोकांचें एवढेंच मागणें आहे कीं, तुझ्या कोपानलानें दग्ध झालेल्या या कंसाचें प्रेतकार्य करण्यास आम्हांस परवानगी दे. याचें और्ध्वदैहिक कृत्य आटोपलें म्हणजे मी, माझी बायको व माझ्या सुना यांस बरोबर घेऊन अरण्यांत जाऊन मृगांबरोबर आपला काळ कंठीन. मृताचें और्ध्वदैहिक करून बांधव त्याच्या ऋणांतून मुक्त होतात त्याप्रमाणें मला मुक्त होण्याची तूं परवानगी दे, एवढीच माझी आतां प्रार्थना आहे. " हें भाषण ऐकून श्रीकृष्णास गहिं-वर आला. तो उग्रसेनास हात जोडून म्हणाला, " तात, आपण जें बोल-लांत तें या कालाला व आपल्या कुलाला उचित आहे. पण मी हें जें साहस केलें ते मला राज्य मिळावें या हेतूनें केलें नाहीं, हें आपण खचित समजा. स्वार्थ मला कधींच शिवला नाहीं, हें मी शपथपुरःसर सांगतों. आपण निश्चिंत असा; हा जो कंस आपल्या कर्मानें मरण पावला आहे, त्याचा प्रेतसंस्कार राजास साजेल अशाच रीतीनें आपण करूं. नराधिपा, स्वतःच्या कर्मदोषाने तुझ्या पुत्रास मरण आलें आहे. कालानेंच त्याचा अंत केला आहे. मी निमित्तमात्र झालों आहें. मला राज्याची इच्छा नाहीं, हें मी शपथपूर्वक पुन्हां पुन्हां सांगतों. यदुकुलाचा अग्रणी व प्रभु तूंच आहेस; स्वराज्यावर तूंच आपल्यास अभिषेक करून घेऊन आम्हां सर्वांचें व या नगरीचें पालन कर. माझें मन संतुष्ट करावयाचें असेल तर तुला तुझेंच राज्य मी परत अर्पण करीत आहें त्याचा स्वीकार करून चिरकाल आम्हांवर राज्य कर. " हें श्रीकृष्णाचें उदार वचन ऐकून उग्रसेनानें कांहीं

एक उत्तर केलें नाहीं, तेव्हां श्रीकृष्णानें लागलीच कंसाचा मुकुट आणवून उग्रसेनाच्या डोक्यावर आपल्या हातानें ठेविला. त्या वेळीं तेथें जमलेल्या सर्व यादव, भोज, वृष्णि, अंधक क्षत्रियांनीं श्रीकृष्णाचा व उग्रसेनाचा जय-जयकार केला. याप्रमाणें राज्याची व्यवस्था तात्काळ निरपेक्षपणें श्रीकृष्णानें लाविली, तेव्हां ती रात्र सर्वांना समाधानांत गेली प्रातःकाळ होतांच कंसाच्या प्रेताची व्यवस्था राजास योग्य अशाच थाटानें श्रीकृष्णानें व सर्व यादवांनीं केली. सुवर्णशिबिकेंत त्याचें प्रेत ठेवून राजवैभवानिशीं यमुनेच्या उत्तर तीरावर त्यांनीं नेलें व तेथें चंदनकाष्ठांनीं ते प्रेत दहन केलें. नंतर सर्वांनीं दक्षिण तीरावर येऊन त्यास यथाशास्त्र तिलांजली दिले व दहा दिवस हस्ति, अश्व, रथ, अलंकार, दासदासी, भूमि व कोट्यवधि सुवर्ण दान करून उग्रसेनानें कंसाचें और्ध्वदेहिक उत्तम रीतीनें शेवटास नेलें. त्याचप्रमाणें त्यानें सुनाम्याचाही अंत्यविधि यथाशास्त्र व यथावैभव केला (हरिवंश, वि० अ० ३२, भाग० द० ४६).

याप्रमाणें कंसाचा अंत होऊन वृद्ध व नीतिमान् उग्रसेन राज्यावर बसला, तेव्हां त्याच्या अमलाखालीं मथुरा नगरी पुन्हां सुख पावूं लागली. जे जे यादव, भोज, वृष्णि, अंधक, कुलांतील क्षत्रिय परागंदा होऊन बाहेरदेशीं दिवस कंठीत होते ते सर्व परत येऊन त्यांचें सर्व धन, जहा-गीर, मानमरातब परत मिळून पुन्हां आनंदांत मथुरेंत राहूं लागले. यामुळें सर्व श्रेणी, व्यापारी लोकही पुन्हां भरभराटीस आले. वसुदेवानेंही श्रीकृ-ष्णाचे व बलरामाचे जन्मापासून राहिलेले संस्कार कुलगुरु गर्गाकडून कर-विले. क्षत्रियांच्या उपनयनाचा अनतीत काल बावीस वर्षे असल्यानें त्यांच्या मुंजी यथाशास्त्र व यथावैभव झाल्या. मुंजी झाल्यावर गुरुगृहीं वास कर-ण्यासाठीं ते दोते वीर उज्जयिनीस सांदीपनी काश्य नांवाच्या प्रसिद्ध गुरू-जवळ गेले. तेथें यथाविधि आपलें गोत्र गुरूस निवेदन करून त्यांचें शिष्यत्व संपादन केल्यावर गुरुगृहीं वेदविद्येचा व धनुर्विद्येचा त्यांनीं अभ्यास केला. त्यांची विलक्षण बुद्धिमत्ता पाहून सांदीपनी आश्चर्यचकित झाला व हे कोणी देवांशधारी पुरुष आहेत असें वाटून त्यानें त्यास आदरानें आपली सर्व विद्या दिली. केवळ चौसष्ट दिवसांतच त्यांनीं सर्व वेदांचें ग्रहण केलें आणि नंतर संग्रहसहित धनुर्वेद पठण केला. गुरुगृहीं असतां इतर सर्व शिष्यांप्रमाणें

रामकृष्णांनीं गुरूची सेवा करावी; त्याजकरितां रानातून लांकडें, समिधा, कुश इत्यादि आणून द्यावें; व सर्व प्रकारची शारीरिक मेहनतीची गुरूचीं कामें आनंदानें करावीं. गाईंचें दूध काढावें व गाई चरावयास न्याव्या, ते जरी आतां पूर्ण वैभवशाली राजपुत्र होते तरी त्यांची निष्ठा व मेहनत पाहून गुरु त्यांजवर प्रसन्न झाले, त्यास व्रजात सर्व प्रकारची मेहनत करण्याची संवय होतीच, तेव्हां त्यांस गुरुच्या घरचें कोणतेंही काम करण्यास हरकत पडलीच नाहीं. श्रीकृष्णाचें उज्जयिनींतील राहण्याचें ठिकाण व रानांतून लांकडें तोडण्याचें ठिकाण भाविक लोक अद्याप उज्जयिनींत दाखवितात. सांदीपनीचा आश्रम उज्जयिनीस अंकपात नांवाच्या ठिकाणीं असून तेथें हल्लीं अहल्याबाईनें बांधलेलें श्रीकृष्णमंदिर आहे. असो; याप्रमाणें उज्जयिनीस सहा महिने राहून सर्व विद्या संपादन करून व गुरूची अनुज्ञा घेऊन रामकृष्ण मथुरेस परत आले तेव्हां सर्वांस अत्यंत आनंद झाला. उग्रसेन स्वतः राजवैभवानिशीं त्यास समोरा गेला व वाजतगाजत त्यास शहरांत आणिलें. त्या दिवशीं शहरांत कोणीही मलिन वस्त्राचा किंवा दुर्मुखलेला मनुष्य दिसत नव्हता. वसुदेव—देवकीस सहा महिन्याचाही रामकृष्णांचा वियोग दुःसह झाला होता, त्यास तर त्यांच्या परत येण्यानें परमावधीचा आनंद झाला. बळरामाची माता रोहिणी कंसाच्या वधानंतर लागलीच व्रजाहून मथुरेस आली होती हे निराळें सांगणें नकोच. तिलाही अतिशय आनंद झाला. पुष्कळ दिवस रामकृष्णाचें मुखदर्शन अंतरलेल्या पौरजनांनाही अतिशय आनंद झाला. या पराक्रमी वीरांचा पराक्रम, धनुर्विद्या ग्रहण केल्यानें द्विगुणित होऊन मथुरेचें बल द्विगुणित झालें असें सर्व लोकांस वाटून त्यांचे बाहु स्फुरण पावूं लागले ( हरिवंश, वि० अ० ३३. भाग० अ० ४. )

गुरुगृहीं संपादन केलेली रामकृष्णाची धनुर्विद्या व मथुरेंतील लोकांचें बाहुस्फुरण लवकरच कसोटीस लागलें. मथुरेंतील सर्व लोकांची रामकृष्णावर अत्यंत प्रीति जडली हें सांगणें नकोच. दोघी स्त्रियांच्या हृदयांत मात्र जो त्याजविषयीं द्वेषाग्नि पेटला होता तो शमला नाहीं. तो हा वेळपर्यंत धुमसतच राहून शेवटीं पुन्हां प्रज्वलित झाला. जरासंधाच्या दोन मुली अस्ति व प्राप्ति कंसाच्या पट्टस्त्रिया होत्या हें पूर्वीं सांगितलेंच आहे, त्यांस

श्रीकृष्णाचें वैभव सहन झालें नाहीं. आपल्या पतीस यानें ठार मारून आपणांस दुःखसमुद्रांत लोटलें हें त्या कधीं विसरल्या नाहींत. एक वर्ष-पर्यंत त्या कशाबशा मथुरेंत राहिल्या, पण यानंतर त्या राजगृहीं आपल्या बापाकडे गेल्या व त्याचा क्रोधाग्नि त्यांनीं आपल्या आर्त विलापांनीं व सतत चाललेल्या निःश्वासांनीं प्रदीप्त केला. जरासंधासही श्रीकृष्णाच्या कृत्याचा अत्यंत राग आला होता, पण उग्रसेनासच त्यानें राज्यावर बस-विल्यानें त्यानें हा वेळपावेतों कांहीं हालचाल केली नव्हती. श्रीकृष्णाचें मथुरेंत फारच स्तोम माजलें आहे, उग्रसेन सुद्धां त्याच्या भजनीं आहे हें आपल्या मुलींकडून ऐकून जरासंधानें आपल्या सैन्यानिशीं कंसाचा सूड उगविण्यासाठीं मथुरेवर चाल केली. जरासंध या वेळेस सर्व हिंदुस्थानच्या सार्वभौम-पदास पोंचला होता. सर्व राजांनीं त्याचें वर्चस्व कबूल केलें होते. याशिवाय अनेक राजे त्याचे चाहाते व दोस्त होते. ह्या आपल्या मित्र राजांस बरोबर घेऊन जरासंधानें मथुरेस वेढा दिला. करुष देशाचा राजा दंतवक्र, चेदि देशाचा शिशुपाल, विदर्भाचा भीष्मक व त्याचा पुत्र धनुर्धर श्रेष्ठ रुक्मी, तसेंच काशी, विदेह, मद्र, त्रिगर्त, शाल्व, दरद इत्यादि देशांचे राजे काश्मीरेश्वर गोनर्द, सौवीर देशाचा शैब्य वगैरे राजांना त्याने आपल्या मदतीस बोलाविलें व शूरसेनांत गवत, धान्य व लांकडें यांचा मुबलक पुरवठा असल्यानें त्यांच्या प्रचंड सैन्यास मथुरेस वेढा देण्यास कांहींच अडचण पडली नाहीं. लाखों सैन्य मथुरेभोंवतीं पसरलें आहे, हजारों हत्ती व रथ मथुरेभोंवतीं जमले आहेत, शुभ्र छत्र वर धरलेले शेंकडों राजे शहराभोंवतीं सैन्य लावीत आहेत हें पाहून मथुरेंतील यादव, भोज, वृष्णि, अंधक इत्यादि क्षत्रिय वीर घाबरले नाहींत. श्रीकृष्ण व बळराम या दोन पराक्रमी सेना-पतींच्या आधिपत्याखालीं त्यांनीं मथुरेच्या रक्षणाचें काम जोरानें व सावध-पणानें चालविलें. शहराभोंवतीं मजबूत कोट असल्यानें व त्याजबाहेर रुंद व खोल खंदक असल्यानें शहर सुरक्षित होतें. शहरांत अन्नाचा पुरवठा चांगला होता. हजारों वीर दरवाज्यांचें व तटांचें रक्षण करण्यास सज्ज होते. याप्रमाणें दोन्हीं सैन्यें समोरासमोर होऊन एकमेकांशीं लढूं लागलीं, तेव्हां भयंकर रणकंदन सुरू झालें. शत्रूकडील वीर खंदक ओलांडून दरवाज्यावर व कोटावर चढूं लागले व त्यांचा प्रतिकार यादववीर करूं लागले. ठिकठिकाणीं खंदक

भरून काढण्याचा वेढा घालणाऱ्यांनीं सपाटा चालविला. कित्येक जागीं कोट पाडून टाकण्याचाही त्यांनीं प्रयत्न चालविला. मधून मधून निवडक यादववीर दरवाजातून बाहेर पडून शत्रुसैन्यावर तुटून पडत. याप्रमाणें, सत्तावीस दिवसपर्यंत तें युद्ध अव्याहत चाललें. बळरामाच्या प्रमुखत्वाखालीं अठ्ठाविसाव्या दिवशीं शिनी, अनाधृष्टि, बभ्रु, वगैरे यादववीर अर्धें सैन्य घेऊन दक्षिण दरवाजाबाहेर निघून मगधसैन्यावर तुटून पडले. तेथे स्वतः जरासंध, चेदिपति, शाल्व, शल्य व आणखी कित्येक उत्तरेकडील शूर राजे होते. त्यांची व यादवांची भयंकर लढाई झाली. जरासंधाजवळ हंस व डिंभक नांवाचे दोन अत्यंत बलाढ्य मल्ल होते, त्यांपैकीं डिंभकाची व खास बळरामाचीच लढाई लागली. दोघेही विरथ होऊन बाहुयुद्ध करूं लागले, तेव्हां रामानें डिंभकास उचलून धाडदिशीं खालीं हापटलें, त्याबरोबर तो मृतप्राय होऊन निश्चेष्ट पडला. ही बातमी हंसाला समजतांच त्यानें यमुनेंत उडी टाकून प्राण दिला. ज्याचा कधींही पराभव व्हावयाचा नाहीं, जो केवळ अवध्य होता, त्या डिंभकाचा रामानें प्राण घेतला हें पाहून हंसानें दुःखानें व संतापानें आत्महत्या केली. डिंभक शुद्धीवर आला तेव्हां हंसानें आत्महत्या केली हें ऐकून त्यानेही यमुनेंत उडी टाकून आत्महत्या केली. याप्रमाणें जरासंधाचे दोन्ही हात गळून पडले, तेव्हां जरासंधाचा जोर कमी झाला. इकडे श्रीकृष्णाच्या आधिपत्याखालीं बाकीचें अर्धें सैन्य पश्चिम दरवाजानें बाहेर पडलें होतें त्याजबरोबर अवगाह, कंक, पृथु, शतद्युम्न इत्यादि यादववीर होते व तेथें भीष्मक, रुक्मी, देवक इत्यादि प्राच्य व दाक्षिणात्य राजे उलट पक्षाकडे होते, त्यांचें व यादवांचें न भूतो न भविष्यति युद्ध झालें. रक्ताच्या नद्या वाहिल्या. श्रीकृष्णानें आपल्या नवीन संपादन केलेल्या धनुर्विद्येनें विलक्षण पराक्रम करून रुक्मीस व इतरांस पळावयास लावलें. याप्रमाणें दोन्ही दिशांच्या राजांचा पराभव करून यादववीर सिंहनाद करीत मथुरेंत परत आले. त्या रात्रीं जयाची आशा सोडून जरासंधानें वेढा उठविला व तो आपल्या देशाकडे परत फिरला. इतर राजेही आपआपल्या सैन्यानिशीं स्वदेशाकडे चालते झाले, यादवांचें सैन्य थोडे असल्यामुळें त्यांनीं त्याचा पाठलाग केला नाहीं. अठ्ठावीस दिवस युद्ध चालून मथुरा मुक्त झाली तरी आपल्यास यश आलें असें समजून यादव गाफिल झाले नाहींत. कारण

जरासंध आपल्यावर पुन्हा चाल करून येईल असे त्यांस पक्के माहीत होतें. त्यांनीं पडलेल्या कोटाची व खंदकाची दुरुस्ती चालविली व शहरांत धान्यसामग्री व शस्त्रास्त्रे यांचा पुरवठा करण्याचा सपाटा लाविला ( हरिवंश, वि० ३६).

जरासंधाचा पराभव होऊन तो राजगृहास परत गेला, पण यादवांनीं कल्पना केल्याप्रमाणे तो थोड्याच दिवसांत अधिक तयारी करून मथुरेवर पुन्हां चालून आला. या वेळीं मात्र मथुरेंतील लोक व यादव घाबरून गेले. जरासंधाजवळ अगणित सैन्य असून त्याजला अनेक राजे अनुकूल होते. यादवांची संख्या थोडी असून त्यास कोणाचेंही साहाय्य नव्हतें. पुढें काय करावें याचा विचार करण्यासाठीं सर्व क्षत्रिय जमा झाले, तेव्हा विकद्रु नावाचा एक वृद्ध व श्रेष्ठ यादवसरदार म्हणाला, " कृष्णा, राजकारणाचा व बलाबलाचा विचार करून मला काय वाटतें तें मी स्पष्ट बोलतो. मथुरा नगरीची मागील वेढ्यांत फारच खराबी झाली आहे. तिची तटबंदी अद्याप दुरुस्त झाली नाहीं. भोवतालच्या खंदकांतील पाणीही अद्याप साफ झालें नाहीं शिवाय दूरवर आणखी तटबंदी उभारणें जरूर आहे. शहरांत धान्य-सामग्री व जळण यांचा अद्याप पुरेसा पुरवठा झालेला नाहीं; शेंकडों क्षत्रियवीर मागच्या रणांत पडल्यामुळे आपलें मनुष्यसामर्थ्यही कमी झालें आहे; लोकांतही अद्याप त्राण आला नाहीं. अशा स्थितींत शत्रूस सामना न देतां बाहेर पाय काढावा असें मला वाटतें. मथुरा पुन्हा वेढ्यांत सापडली तर यादवांनीं आत्मनाश करून आमचा सर्वांचा नाश केला असेंच लोक म्हणतील. तुझ्या पराक्रमावर व सेनानायकत्वावर माझा पूर्ण भरंवसा आहे. तथापि या वेळीं मी अशी सल्ला देतों कीं, जरासंधाचा राग तुझ्यावर आहे तर कांहीं दिवस तूं येथून दक्षिणेकडे जा. दक्षिणेकडे यादवांचीं चार राज्यें आहेत, त्यांच्या आश्रयानें तूं कांहीं दिवस कालक्षेप कर. यदूला नाग-कन्यापासून चार पुत्र झाले होते, त्यांचीं नावें मुचुकुंद, पद्मवर्ण, सारस व हरित अशीं होतीं. या चौघांनीं विंध्याद्रीच्या दक्षिणेस चार राज्यें स्थापन केलीं. मुचुकुंदानें ऋक्षवान् पर्वताच्या आश्रयानें नर्मदातीरावर माहिष्मती व पुरिका अशीं दोन शहरें स्थापन केलीं. पद्मवर्णानें सह्याद्रीच्या पठारावर वेणा नदीच्या काठीं करवीर नावाचें नगर बांधून तेथें आपलें राज्य स्थापिलें. त्यास पद्मावत असें म्हणतात. सारसानें क्रौंचपूर नांवाचें शहर

त्याच्याही दक्षिणेस वनांत स्थापन केलें. त्या नगराभोंवतालचा प्रदेश तांबड्या मातीचा असून सुपीक आहे; त्याच्या देशास वनवासी असें म्हणतात. हरितानें अगदीं समुद्राकिनाऱ्यावर आपलें राज्य स्थापन केलें. तेथील कोळी समुद्रांत बुड्या मारण्यांत कुशल आहेत व ते समुद्रांतून मोतीं, शंख, प्रवाळ इत्यादि रत्नें काढतात. तेथील व्यापारी दूर दूरदेशीं या रत्नांचा व्यापार करून हरितास संपत्ति आणून देतात. हरिताच्या देशास रत्नद्वीप असें म्हणतात. असो; तर हीं चार यादवराज्यें दक्षिणेंत नांदत आहेत तिकडे जाऊन तूं कांहीं दिवस रहा. मथुरेंतून तूं निघून गेलास म्हणजे जरासंध मथुरेवर येणार नाहीं असें मला खात्रीनें वाटतें. हें माझें प्रांजल मत ऐकून तुला उचित वाटेल तें कर. " राजकारणांत कुशल असलेल्या चित्रकद्रूचें हें भाषण वसुदेवाला मान्य झालें, व त्या महात्म्यानें पुत्रलोभास न गुंतता श्रीकृष्णास हीच सल्ला दिली. तेव्हां श्रीकृष्णानें उत्तर केलें, " ज्याअर्थी जरासंधाचा मीं अपराध केला आहे त्याअर्थी माझ्याकरितां या मथुरा नगरीवर अनर्थ आणणें हें मलाही पसंत नाहीं. माझ्या अपराधाचें प्रायश्चित्त भोगण्यास मी तयार आहें. जो मनुष्य आपल्या चुकीसाठीं दुसऱ्यास दुःख भोगावयास लावतो त्याच्या स्वार्थीपणाची कमाल आहे. मी याच क्षणीं आर्य रामासह मथुरेंतून निघून दक्षिणेकडे जातों. बलिष्ठासमोरून अशक्तानें पाय काढण्यांत कोणताही दोष नाहीं. सामर्थ्य येईल त्या वेळेस लढावें ही राजनीति आहे. तुमच्यावरचा अनर्थ टाळण्यास जरी मी शक्तिमान् आहें, तरी अशक्ताप्रमाणें या वेळीं दक्षिणेकडे जातों. करवीर, क्रौंचपूर वगैरे शहरें व सह्याद्रीचीं उंचउंच रम्य शिखरें पाहून आमचें तिकडेही मन रमेल. " याप्रमाणें जबाब देऊन श्रीकृष्णाने व बळरामानें एक क्षणाचा विलंब न लावतां दक्षिणापथाचा रस्ता धरला; व ते नाना देश व रम्य स्थलें पहात पहात दक्षिणेंतील करवीर शहराजवळ पोंचले ( हरिवंश, वि० भा० ३७–३८–३९ ).

वेणानदीच्या कांठीं एका मोठ्या विस्तीर्ण वटवृक्षाच्या छायेंत बसलेला एक अत्यंत, तेजःपुंज ऋषि त्यांच्या दृष्टीस पडला. त्याच्या मस्तकावर जटाभार असून त्याच्या खांद्यावर परशु पडला होता. त्याचें शरीर स्वच्छ गोरें असून त्याच्या तोंडावर अग्नीसारखें तेज चमकत होतें. त्रिकाळ स्नान

करून अग्नीचें त्रिकाळ हवन करीत असल्यानें त्याचें अंग ओलसर व प्रज्व-लित होतें. त्याजवळ एक पांढरी सुंदर धेनु असून तिची ओटी दुधानें भरलेली दिसत होती. क्षत्रियाचा अनेक वेळा अन्त करणारा प्रत्यक्ष परशुरामच हा असावा असा तर्क करून त्या दोघां वीरांनीं त्याजवळ जाऊन त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें व ते त्यांच्या समोर हात जोडून बसले. नंतर श्रीकृष्ण म्हणाला, " महाराज, आपल्या पित्याचा महान् अपराध करणाऱ्या सहस्रार्जुनाच्या हजार बाहूंचे अरण्य आपल्या परशूनें तोडणारे परशुराम आपण आहां असें मला खचित वाटतें. आपणच ह्या सह्याद्रीपासून समुद्रास बाणानें मागें हटवून जेथें बाण पडला तेथें पांचशें धनुष्यें ( चार हातांचें ) लांब व अडीचशें धनुष्यें रुंद असें शूर्पारक नगर स्थापन केलें. आपणच पृथ्वीवरील क्षत्रियांस एकवीस वेळां मारून रक्ताचे पाट वाहविले, त्यामुळें ही पृथ्वी अद्याप ओली व लाल दिसत आहे ! असो. आपण आम्हांस या संकटाचे वेळीं कृपा करून सल्ला द्याल तर आमच्यावर उपकार होतील. " असें म्हणून श्रीकृष्णानें त्यास आपली सर्व हकीकत सांगितली. व जरासंध आपला पाठलाग करील तेव्हा त्याजपासून आपलें कसें संरक्षण करावें याजबद्दल सल्ला विचारिली. परशुरामानें उत्तर केलें, " मी तुम्हांस भेटण्यासाठींच येथें बसलों आहें. तुम्ही कोण आहां हें मी जाणतों. या करवीरास तुमचाच यदुवंशीय शृगाल नांवाचा राजा राज्य करीत आहे, पण तो दुष्ट आहे. त्यानें आपल्या भाऊबंदांस, पुत्रांस व प्रजेला त्राहि त्राहि करून सोडलें आहे. तो अत्यंत गर्विष्ठ, मत्सरी व संयमरहित आहे. तर तुम्ही या करवीर नगरींत राहूं नका. आपण आतांच आपल्या बाहूंनीं ही वेणा नदी पोहून जाऊन पलीकडे या देशाच्या शिवेवर यज्ञगिरी नांवाचें सह्याद्रीचें शिखर आहे तेथें आज रात्रीं राहूं. तेथून उद्यां पुढें जाऊन खट्वांग नदीचा धबधबा पाहूं. ती नदी उंच पर्वतावरून तेथें पडत असून मोठमोठ्या काळ्या कसोटीच्या शिळा तिच्या प्रवाहांत पडल्या आहेत. तेथें खालीं एक तपोवनही आहे. तेथें दुपारची विश्रांति घेऊन आपण पुढें जाऊं. पुढच्या पर्वतावर मानार्ह असूनही मानाची इच्छा न करणारे अनेक तपस्वी ब्राह्मण आहेत. त्यांचें दर्शन घेऊन आपण पुढें जाऊं. पुढें आपल्यास क्रौंचपूर लवकरच लागेल. तेथें यदुवंशीय राजा राज्य

करीत आहे, आणि तो चांगला आहे. त्याच्या आश्रयानें तुम्ही गोमंत पर्वतावर रहा. हा पर्वत फारच उंच असून फलपुष्पांनी भरलेला आहे. जरासंध जरी तेथें आला तरी त्याच्या सैन्याचें तेथें कांहीं चालणार नाहीं. कारण त्यास डोंगरांत कसें युद्ध करावें हें माहीत नाहीं. तुम्हांस त्याच्या सैन्याचा फडशा करण्यासही तेथें सुलभ पडेल. तर उठा, आणि ह्या होम-धेनूचें अमृततुल्य दूध पिऊन गोमंतपर्वतास जाऊं " असें म्हणून जाम-दग्न्यानें त्या गाईचें दूध काढून त्या दोघांस प्यावयास दिलें व आपणही प्राशन केलें. त्या दुधानें त्या दोघांस एकदम हुषारी आली व त्यांचें बल वाढून ते तिघेही वर वर्णन केलेल्या रस्त्यानें मार्गस्थ झाले. मत्त हत्ती-प्रमाणें वेगानें व दर्पानें जात जात दुसरे दिवशीं सायंकाळीं ते गोमन्ता-चलावर पोंचले. गोमंताची शोभा पाहून रामकृष्णांस फारच आनंद झाला. त्याचीं उंच शृंगें गगनास पोंचलीं होतीं. त्याजवर पनस, आम्रा-तक, आम्र, अगरु, चंदन, एला, तमाल इत्यादि मोठमोठ्या वृक्षांचीं वनें-च्या वनें लागलीं होतीं. चारी बाजूंना मोठमोठ्या दऱ्या व अरण्यें असून त्याच्या शिखरावर शुभ्रवर्णाचे मेघ बसले होते. नीलमण्यांच्या राशींच्या राशी व धातुरस त्या पर्वताच्या कड्यांमधून दिसत होते. मोठमोठे जलौघ पर्वतावरून पडत असतांना त्यांचा धो धो ध्वनि ऐकूं येत होता. त्यांतच मयूराचे टाहो व हत्तींचे चीत्कार ऐकूं येत. ठिकठिकाणीं खोलगटांत जला-शय भरले असून त्यांत कमलें फुललीं होतीं. त्या भोंवतालच्या जमिनीवरही स्थलकमलें फुललेलीं होतीं. ठिकठिकाणीं मोठमोठे काळेभोर कडे तुटलेले असून त्यांची फारच भयानक शोभा दिसत होती. चोहींकडे पक्ष्यांचे सुस्वर शब्द व रानकिड्यांचे कर्कश आवाज ऐकूं येत होते; व त्यांचा प्रतिध्वनि समोरच्या तुटलेल्या कड्यांवरून उमटत होता. त्या पर्वतावर मनुष्याचा बिलकुल संचार नसून सिद्ध, चारण, गंधर्व हे मात्र व्याघ्रांच्या रूपानें त्याज-वर आनंदानें फिरत होते. त्या पर्वतास इंद्राच्या वज्राचा म्हणजे अशनीचा आघात माहीत नव्हता किंवा वणवा किंवा झंझावात यांचाही त्याला स्पर्श झाला नव्हता. यामुळें गर्द अरण्यें असलेल्या चढत्या भूमिभागांनीं त्यास फारच शोभा आली होती. जसा सुंदर स्त्रियांनीं वेष्टिलेला पति शोभतो त्याप्रमाणें तो दऱ्या, गुहा, नद्या, वनराजि यांनीं वेष्टिला असून शोभिवंत

दिसत होता. त्याचा पायथा फार खोल व विस्तीर्ण असून त्याचीं शिखरें आकाशांत उंच गेलीं होतीं, यामुळें जणूं काय पृथ्वी व अंतरिक्ष या दोहों-मध्यें तो पर्वत बुडी मारून बसला आहे असें वाटत होतें. याप्रमाणें त्या पर्वताचें रम्य व भीषण स्वरूप पाहून रामकृष्णास फारच आनंद झाला व हें ठिकाण आपल्यास निवांत राहण्यास उत्तम आहे असें वाटून त्यांनीं पर-शुरामाचे आभार मानले. नंतर त्यांनीं गिरिशिखरावर आपल्यास रहावयास एक आश्रमरूपी झोंपडें बांधले व त्यांत ते सुखानें राहूं लागले. तेव्हां जाम-दग्न्यही त्यांस आशीर्वाद देऊन शूर्पारक नगराकडे निघून गेला ( हरिवंश, अ० ३९–४० ).

परशुराम निघून गेल्यावर रामकृष्ण गोमंताच्या शिखरावर नानातऱ्हेचीं रूपें घेऊन आनंदानें फिरूं लागले. त्यांचा वर्ण अनुक्रमें गोरा व काळा असून ते काळें व पिवळें वस्त्र नेसत. गळ्यांत वनांतील पुष्पांच्या माळा घालीत. डोंगरांतील धातुरसांनीं ते आपलीं शरीरें निरनिराळ्या रंगांनीं रंगवीत. याप्रमाणें नानारूपें धारण करून ते तरुण वीर रम्य स्थलें पहात हिंडत व पर्वताच्या उंच शिखरांवरून चंद्राचे व ग्रहांचे अस्तोदय पहात. थोड्या दिवसांतच त्यांस वेगानें चालणाऱ्या रथांचें ध्वजाग्र दुरून दिसूं लागलें. भाकित केल्याप्रमाणें जरासंध मथुरेवरची चाल सोडून दक्षिणेकडे श्रीकृष्णाचा पाठलाग करीत गोमंत पर्वतापाशीं येऊन पोंचला, तेव्हां पृथ्वी-वरून आकाशांत दिसणाऱ्या हंसांच्या पंक्तीप्रमाणें गोमंतावरून पृथ्वीवर राजांच्या शुभ्र छत्रांच्या पंक्ति दिसूं लागल्या. पृथ्वीवरून आकाशांत जसे काळे, वीज चमकावणारे मेघ दिसतात, त्याप्रमाणें गोमंतावरून सोन्याच्या अलंकारांनीं शृंगारलेल्या काळ्या कुळकुळीत हत्तींच्या रांगा दिसूं लागल्या. हजारों घोडे पक्ष्यांच्या थव्याप्रमाणें उड्या मारीत गोमंताकडे चाल करून येत आहेत असें दिसलें. पायदळ सैन्य असंख्य असल्यानें टोळधाडीप्रमाणें पुढें येत होतें व शिपायांच्या ढाला पंखांप्रमाणें दिसत होत्या; आणि त्यांचा कुजबुजाट अगणित टोळ्यांच्या गोंगाटाप्रमाणें वर ऐकूं येत होता. कांहीं वेळानें तें प्रचंड सैन्य पसरावयास लागून, रथांचे घडघडाट, हत्तींचे चीत्कार, घोड्यांचे खिंकाळ व पायदळ सैनिकांचे सिंहनाद यांनीं दाही दिशा भरून गेल्या. रात्र पडली तेव्हां चोहोंकडे लोक आगट्या पेटवून आपआपले स्वयंपाक करूं

लागले, तेव्हां पृथ्वीवरून जसें निरभ्र आकाश लाखों चांदण्यांनीं व्याप्त झालेलें दिसतें, त्याप्रमाणें गोमंतावरून पृथ्वीवर पसरलेल्या काळोखांत चांदण्या चमकत आहेत कीं काय असें भासूं लागलें. असो. दुसरे दिवशीं सर्व राजांनीं मिळून गोमंत पर्वतावर कसा हल्ला करावा याचा विचार सुरू केला हरिवंश, अ० ४०–४१ ).

ज्याप्रमाणें शहरावर चारी बाजूंनीं हल्ला करतात त्याप्रमाणें निरनिराळ्या चार टोळ्यानीं चारी बाजूंनीं पर्वतावर चढत जाऊन रामकृष्णांस मध्यें धरावें व मारून टाकावें असा जरासंधानें अभिप्राय दिला, पण शिशुपालानें ही सल्ला पसंत केली नाहीं. तो म्हणाला, " आपले हे क्षत्रिय मैदानांत रथांत बसून बाणांनीं युद्ध करणारे असल्यानें सुकुमार आहेत. त्यांस पर्वत चढण्याची संवय नाहीं. कांट्यांतून, दगडांतून, झाडांतून, धांवत्या ओढ्यांतून वर चढणें याच्या हातून होणार नाहीं. शिवाय रामकृष्णांस वरून खालीं धोंडे लोटण्यास किंवा बाण मारण्यास फारच सोपें जाईल. तर मला असें वाटतें कीं, वाळलेलें गवत व लांकडें या डोंगराभोंवतीं पसरून त्यास आग लावून द्यावी म्हणजे हा सर्व डोंगरच पेटेल, आणि कृष्ण व बळराम होरपळून जातील; नाहीं तर उड्या टाकीत मैदानांत येतील. " ही शिशुपालाची सल्ला सर्वांस पसंत पडली. मग त्या अगणित सैन्यानें गवत, लांकडें, शेण्या जमा करून पर्वताच्या भोंवतीं पसरल्या व त्यांस आग लावून दिली. त्या आगीमुळें डोंगरावरील अरण्यानें पेट घेतला, व वायूच्या सहाय्याने ती आग थोड्या वेळानें पसरून तो सर्व डोंगर चारी बाजूंनीं जळूं लागला. तेव्हां चोहोंकडे भयंकर कल्लोळ झाला. जागोजागीं धुराचे काळे लोट आकाशांत जाऊं लागले. दिवसा, विशेषत: रात्रीं, धुरामागून ज्वाळा उठून दाही दिशा दीप्त दिसूं लागल्या. मोठमोठ्या शिळांचे तुकडे चारी बाजूंनीं उल्काप्रमाणें उडूं लागले. अग्नीच्या प्रखर तापानें डोंगरांतील धातुसुद्धां पातळ होऊन त्यांचे रस वाहूं लागले. मोठमोठ्या झाडांचे धगधगीत निखारे खालीं पडूं लागले. शरीर अर्धें जळल्यामुळें वेदनेनें फूत्कार टाकणारे, भयंकर फणा टोकारलेले व क्रोधानें लाल डोळे झालेले सर्प इकडेतिकडे उड्या मारूं लागले. सिंह, वाघ, लांडगे त्रस्त होऊन आपल्या गुहांतून बाहेर निघून जळत्या आगींतून बाहेर पडण्याच्या हेतूनें लांबलांब उड्या मारतांना दिसूं लागले.

पण ते शेवटीं डोकीं हापटून मरतांना त्यांच्या भयंकर गर्जना ऐकूं येऊं लागल्या. हरिण, ससे इत्यादि लहान श्वापदें सैरावैरा धांवूनही जळून मरूं लागलीं. राख व निखारे यांच्या योगानें पिंगट झालेली हवा आकाशांत वर जाऊं लागली व पक्षी त्या हवेंत सांपडून गुदमरून प्रेतवत् खालीं अग्नींत पडूं लागले. याप्रमाणें तो पर्वत दोन दिवस जळत होता, तेव्हां त्याच्या तापानें पायथ्याभोंवतीं पसरलेलें सैन्यसुद्धां अर्धा कोस मागें हटलें. आपल्याकरितां त्या पर्वतावरील वृक्षांची व प्राण्यांची अशी राखरांगोळी झालेली पाहून रामकृष्णांस अतिशय कोप आला व ते आपलीं आयुधें घेऊन पर्वतावरून उडी टाकून खालीं जरासंधाचें सैन्य पसरलें होतें त्याजवर घसरले. युद्धास योग्य जागा पाहून तेथें दोघांनीं मागें पर्वताचा आश्रय घेऊन आपली धनुर्विद्या प्रकट केली व हजारों रथी, घोडे, हत्ती व पायदळ बाणांनीं ठार मारले. श्रीविष्णूचेच दोन अर्ध असल्यानें राम व कृष्ण युद्धांत अजेय होते. त्यांनीं आपल्या धनुष्यबाणांनीं शत्रुसैन्यास पळावयास लावलें. मग दोघांनीं आपलीं आवडतीं शस्त्रें हल व चक्र घेतलीं. हलानें रथ किंवा हत्ती ओढावा आणि मुसळाच्या तडाक्यानें जमीनदोस्त करावा, याप्रमाणें बलरामानें कंदन चालवलें. श्रीकृष्णाने आपलें चक्र फेंकावें, तें कित्येकांचीं शिरें तोडून पुन्हां हातांत यावें व त्यानें तें पुन्हा फेंकावें. याप्रमाणें त्या दोघां वीरांनीं कंदन चालविलें, तेव्हां जरासंधाच्या सैन्याची दुर्दशा झाली. साठ साठ वर्षांचे हत्ती मोठमोठ्यानें ओरडत रणांगणावर पडले. शेंकडों रथांचा चुराडा होऊन किंवा एकेक चाक मोडून रणाच्या मैदानावर अस्ताव्यस्त पडलें. हजारों घोडे व माणसें मरून पडल्यानें रणभूमीवर रक्तमांसाचा चिखल झाला. याप्रमाणें तें रणमैदान यमधर्माच्या विहारभुवनाप्रमाणें भयंकर दिसूं लागलें. शेवटीं जरासंध पराभव पावून परतला. त्याचें व इतर राजांचें हतशेष सैन्य तेथून निघून गेलें. श्रीकृष्ण व बलराम यांनीं त्याचा पाठलाग केला नाहीं. ते तेथून निघून क्रौंचपुरास आले. तेथें शिशुपालाचा बाप चेदिपति दमघोषास व क्रौंचपुराचा राजा यांनीं त्यांच्या अद्वितीय पराक्रमाची तारीफ केली. दमघोषास श्रीकृष्णाची सख्खी आत्या दिली होती; तो संबंध मनांत आणून त्यानें जरासंधाची साथ या वेळीं सोडली. नंतर त्या दोघां राजांनीं रामकृष्णांस उत्तम रथ देऊन

व कांहीं सैन्य बरोबर देऊन त्यांची मथुरेस जाण्यासाठीं उत्तरेकडे रवानगी केली ( हरिवंश, अ० ४२–४३ ).

" चतुर्दशसहस्राणि रक्षसां भीमकर्मणाम् । हतान्येकेन रामेण मानुषेण पदातिना ।! " जनस्थानांत एकट्या रामचंद्रानें चौदा हजार राक्षस पायीं लढून मारले, त्याप्रमाणें गोमंताजवळ त्या दोघा वीरांनीं जरासंधाच्या लक्षावधि सैन्याचा पराभव पायीं केला. तेव्हां त्यांची मल्लविद्येंत आजवर जशी ख्याति होती तशीच यापुढें धनुर्विद्येंतही ख्याति झाली. यापुढें धनुर्धरश्रेष्ठ असेंच त्यांस लोक म्हणूं लागले. या त्यांच्या विलक्षण पराक्रमानें शृगाल राजाची मात्र खात्री झाली नाही. त्या दुर्वृत्त व गर्वानें फुगलेल्या राजानें रामकृष्ण करवीरावरून जाऊं लागले तेव्हां त्यास प्रतिबंध केला. सावित्र व्रत करून सूर्यापासून मिळविलेल्या एका दिव्य रथांत बसून तो एकटाच शहराबाहेर पडला आणि श्रीकृष्णास द्वंद्वयुद्धास आव्हान करून म्हणाला, " कृष्णा, जे अनेक राजे तूं गोमंताजवळ जिंकलेस त्यांत कोणी खरा शूर नव्हता किंवा खरा नायकही नव्हता, यामुळे तुला आयता जय मिळाला. आतां माझ्याशीं गांठ आहे. मी एकटाच तुझ्याशीं धर्मयुद्ध करून तुला यमसदनास पाठवितों. " असें बोलून त्यानें श्रीकृष्णाशीं द्वैरथयुद्ध सुरू केलें व त्यावर बाणाचा वर्षाव केला. श्रीकृष्णानें हांसतच त्याच्या अनेक बाणांना आपल्या बाणांनीं तोडून टाकिलें. शेवटीं त्यानें आपलें अमोघ सुदर्शनचक्र त्याजवर फेंकलें तेव्हां तें चक्र त्याची छाती फोडून बाहेर निघून पुन्हां श्रीकृष्णाच्या हातांत आलें ! याप्रमाणें शृगाल राजा आपल्या गर्वानें पतंग जसा अग्नींत उडी टाकून मरतो त्याप्रमाणें श्रीकृष्णाशीं विनाकारण युद्ध करून मरण पावला. तेव्हां त्याच्या स्त्रिया व पद्मावती पट्टराणी त्याच्या लहान मुलास पुढें करून श्रीकृष्णास शरण आल्या. श्रीकृष्णानें त्यांचें सांत्वन करून त्या मुलास तात्काळ सचिवांकरवीं पुरोहिताकडून राज्याभिषेक करवून करवीराच्या गादीवर बसविलें आणि शृगालाचा दिव्य रथ घेऊन ते दोघे बंधु त्याच दिवशीं तेथून पुढें चालते झाले ( हरिवंश, अ० ४४ ).

पांच दिवस रस्ता चालून व एक दिवस चेदिपति दमघोष याच्या राजधानींत राहून श्रीकृष्ण व बलराम मथुरेजवळ पोंचले, तेव्हां मथुरेंतील लोकांस पराकाष्ठेचा आनंद झाला. सर्व शत्रु जिंकून व सर्व धनुर्धरांत श्रेष्ठ

पदवी मिळवून ते दोघे वीर आपल्या शहरीं परत आले, तेव्हां यादवांस व सर्व शहरवासी लोकांस सहजच अत्यंत अभिमान वाटला. सुंदर पताका लावून त्यांनीं सर्व शहर शृंगारलें व उत्तम उत्तम पोषाख करून उग्रसेनासह ते रामकृष्णांस सामोरे आले. आकाशांतील पक्षी सुस्वर शब्द काढूं लागले. गाई, घोडे व हत्ती आनंदाचे हंबार, हेषा व चीत्कार करूं लागले. स्त्रिया सुस्वर स्वरांत गाणीं म्हणूं लागल्या. आकाश निरभ्र होऊन वायु मंद व कल्याणकारक वाहूं लागला. सारांश, सर्व तऱ्हेनें शुभसूचक मुहूर्तावर श्रीकृष्ण व बलराम यांनीं मथुरेंत प्रवेश केला, त्या वेळेस रस्त्यांत जमलेल्या हजारों लोकांनीं जयघोष केला. त्यांच्या मागून यादववीर आपापल्या ऐश्वर्यानिशीं चालत होते. याप्रमाणें जातां जातां ते दोघे वीर वसुदेवाच्या वाड्यापाशीं आले. तेथें त्यांचें मंगलयुक्त स्वागत होऊन ते घरांत शिरले व त्यांनीं आपल्या मातापितरांच्या पायांवर मस्तक ठेविलें. याप्रमाणें श्रीकृष्णाचा मथुरेस पुन्हां परत येण्याचा उत्सव अद्वितीय थाटानें होऊन सर्व लोक आनंदित झाले व सर्व शहर तेव्हांपासून निर्भय होऊन रामकृष्णांच्या पराक्रमाच्या छत्राखालीं पुन्हां भरभराटीस येऊं लागलें.

मथुरा निर्भय झाल्यानें यापुढील दोन तीन वर्षें श्रीकृष्णाचीं मोठ्या आनंदांत गेलीं. त्याच्या पराक्रमाच्या दर्पानें कोणीही शत्रु मथुरेकडे वाकड्या नजरेनें पहात नव्हता. यामुळें सर्व लोक सुखांत व आनंदांत होते. रामकृष्णांसही आपल्या मातापितरांच्या सेवेंत परम सुख वाटत होतें. आपले आप्तसंबंधी कोण कोण आहेत यांची त्यांस या वेळीं चांगली ओळख झाली. वसुदेवाची बहीण पृथा अथवा कुंती ही पंडूची बायको होती. ती नुकतीच आपल्या पांच पुत्रांसह पंडूच्या मरणानें निराश्रित होऊन हिमालयांतून हास्तिनापुरास आली असें त्यांस कळल्यावरून त्यांनीं तिच्या समाचारास अक्रूरास पाठविलें. तिच्या लहान मुलांचें म्हणजे धर्म, भीम व अर्जुन यांचें वय या वेळीं सात–सहा–पांच वर्षांचें होतें. श्रीकृष्णाचें वय या वेळीं सुमारें बावीसतेवीस वर्षांचें असून तो पूर्ण तारुण्यांत आला होता. आपल्या आतेभावांस योग्य तऱ्हेनें वागवा असा निरोप त्यानें अंध धृतराष्ट्रास व भीष्मद्रोणादि त्याच्या प्रधानांस पाठविला. अक्रूरानें कुंतीची भेट घेऊन तुझ्या अर्भक पुत्रांच्या पाठीवर पराक्रमी श्रीकृष्ण आहे असें कुंतीस आश्वा-

सन दिलें व अंध धृतराष्ट्रासही योग्य उपदेश करून तो तेथून परत आला. इकडे चेदिपति दमघोष यांची बायको म्हणजे शिशुपालाची आई हीही वसुदेवाची बहिण होती. ती वसुदेवास भेटावयास मथुरेस आली. श्रीकृष्ण नुकताच तिच्या घरीं जाऊन आला होता. तिचेंही श्रीकृष्णानें समाधान केलें. आपला पुत्र शिशुपाल जरासंधाच्या नादीं असला तरी त्याचे अपराध तूं क्षमा कर असें तिनें श्रीकृष्णास विनविलें. तें श्रीकृष्णानें मान्य करून तिची सुखानें व समाधानानें रवानगी केली. व्रजवासी गोपगोपींचें समाधान करण्यासाठीं खुद्द बलराम गोकुळास गेला, तेव्हां व्रजवासी लोकांस जो आनंद झाला तो काय वर्णन करावा ! कंसास ठार मारून व जरासंधाचा पराभव करून रामकृष्णांनीं जो लौकिक मिळविला होता तो त्यांस कळलाच होता. अशा भरतखंडांत प्रसिद्ध झालेल्या क्षत्रियांचें योग्य स्वागत आपल्यासारख्या गरीब गांवढळांकडून कसे होतें याची त्यांस मोठी पंचाईत पडली. पण बळराम मुळींच गोपवेशानें तेथें गेला; त्यामुळें तेथलि लोकांस कांहींच अडचण न पडतां त्यांस मागलि सुखाचे दिवस आठवले. नंदयशोदा व गोपगोपी यांनीं त्याचा सत्कार आपल्या जिवापाड केला; व श्रीकृष्णाविषयीं त्याजपाशीं वारंवार चौकशी केली. श्रीकृष्णाचे गुणानुवाद सतत गाणाऱ्या व घरीं-दारीं, रानांत, वनांत, निजल्या बसल्या, काम करतांना व झोपीं जातांना गोविंद, दामोदर, माधव इत्यादि मधुर नांवांनीं श्रीकृष्णास वारंवार हांक मारणाऱ्या त्या गोपींच्या प्रेमपुरांत बलराम वाहून गेला. असो. नंदयशोदेचें व गोपगोपींचें कसेंबसें समाधान करून बलराम मथुरेस परत आला आणि श्रीकृष्णास व्रजांतील लोकांचें त्यानें कुशल सांगितलें, तेव्हां वसुदेवासमोर त्या दोघां बंधूंच्या व्रजांतलि अनेक जुन्या आठवणी निघून नानाप्रकारच्या गोष्टी झाल्या, त्या ऐकून वसुदेवास आनंद व आश्चर्य वाटलें ( हरिवंश, अ० ४६ व भा. अ० ४९ ).

आतां रामकृष्णाचें वय ऐन तारुण्याचें होऊन त्यांच्या विवाहाची काळजी वसुदेव व त्याच्या दोघी पत्न्यांस लागली. क्षत्रियांचा विवाह बहुधा स्वयंवरानेंच झाला पाहिजे. निदान कोणी बरोबरीचा कन्या सांगून आला पाहिजे. असें असल्यानें मातापित्यांस घाई करतां येईना. इतक्यांत विदर्भाचा राजा भीष्मक कुंडिनपुरास आपल्या रूपवती कन्येचें स्वयंवर करणार

आहे अशी बातमी दूतांनीं आणली. भीष्मक विशेषतः त्याचा पुत्र रुक्मी जरासंधाच्या पक्षाचा असल्यानें या स्वयंवरास श्रीकृष्णास निमंत्रण नव्हतें. श्रीकृष्ण व रुक्मिणी हीं एकमेकांकरितांच निर्माण झालीं होतीं. शेंकडों अवतारांत लक्ष्मीनारायणाचें जोडपें हेंच होतें. तशांत श्रीकृष्णाचे अद्‌भुत पराक्रम रुक्मिणीच्या कानावर गेलेच होते; आणि बापानें व भावानें ज्यास मुद्दाम वगळलें, त्याजवर क्षत्रियकन्येचें मन गेल्याशिवाय रहावयाचें नाहीं. सारांश, रुक्मिणीच्या मनानें श्रीकृष्णाचा ध्यास घेतला यांत आश्चर्य काय ? जयचंदाच्या मुलीप्रमाणें तिनें श्रीकृष्णास या वेळीं निरोप पाठविला नाहीं हें जरी खरें, तरी तिच्या भक्तीनेंच श्रीकृष्णाचें मन तिच्याकडे ओढलें. निमंत्रण नाहीं तरी जबरदस्तीनें मुलगी हरण करण्याचा क्षत्रियांस अधिकार आहे हें मनांत आणून श्रीकृष्ण आपल्या यादवसैन्यानिशीं धांवला. मथुरेच्या रक्षणासाठीं बलरामास ठेवून तो झपाट्यानें प्रवास करून स्वयंवराच्या आदले दिवशीं कुंडिनपुरास पोहोंचला. तेथें पाहतो तों अनेक राजांचीं शिबिरें शहराबाहेर पडलीं आहेत असें दिसलें. या सर्व राजांत श्रीकृष्ण आल्याची बातमी पसरून खळबळ उडाली. भीष्मकानें जरी श्रीकृष्णास बोलाविलें नव्हतें तरी तो आला हें पाहून भीष्मकाचा आप्त नयकुशल क्रथकैशिक राजा यानें श्रीकृष्णाचें अर्घ्यादिकांनीं रीतसर स्वागत केलें व त्यांस आपल्या शिबिरांत उतरवलें. आतां पुढें काय करावें याचा विचार करण्यासाठीं जमलेल्या राजांची व भीष्मकांची बैठक रात्रीं बसली. श्रीकृष्णाच्या पराक्रमाची त्यांस माहिती होतीच. हा स्वयंवर आनंदानें तडीस जात नाहीं असें वाटूं लागलें. कन्याप्राप्तीसाठीं श्रीकृष्ण येथ आला आहे व तो तिला बलात्कारानें नेणार असें जरासंध म्हणाला. स्वयंवरांत हाच मोठा दोष आहे कीं, तेथें संग्राम झाल्याशिवाय रहावयाचा नाहीं असें सुनीथ म्हणाला. पण दंतवक्र म्हणाला, " श्रीकृष्ण आला आहे, तो कन्येसाठींच खरें; पण तोही सुज्ञ व न्यायी आहे, त्यास आपण स्वयंवरांत घेऊं या. कन्येनें त्यास वरलें तर मुळींच हरकत नाहीं." कारण कन्येच्या मताविरुद्ध तिजवर कोणीहि प्राज्ञ मनुष्य हक्क सांगणार नाहीं." याप्रमाणें दंतवक्राचें भाषण ऐकून शाल्व, शिशुपाल इत्यादि राजे क्रोधानें संतापून गेले. "श्रीकृष्ण मूर्धाभिषिक्त राजा नसून त्यास तुम्ही स्वयंवरांत घ्याल तर आम्ही हरकत

करूं. श्रीकृष्ण कितीही पराक्रमी असला तरी त्याच्या भीतीस्तव आम्ही आपल्या बरोबरीनें त्यास घेणार नाहीं. मरण हें केव्हां तरी येणारच आहे, पण आम्ही क्षात्रधर्मानें मरू " असें ते म्हणूं लागले. तेव्हां परशुरामापासून अस्त्रें प्राप्त करून घेतल्यानें उन्मत्त झालेला रुक्मी म्हणाला, " स्वयंवरांत काय किंवा इतर रीतीनें काय मी आपल्या बहिणीस कृष्णास कधींही वरूं देणार नाहीं. " याप्रमाणें भाषणें होतां होतां पहाट झाली. इत्यर्थ कोणताच ठरला नाहीं. दुसरे दिवशीं क्रथकैशिकानें श्रीकृष्णास आपलें राज्य अर्पण करून त्याजला मूर्धाभिषेक केला. भीष्मकानेंही प्रीतीनें किंवा भीतीनें श्रीकृष्णाचें त्याच्या घरीं जाऊन स्वागत केलें. ही बातमी ऐकून जरासंध, शाल्व, शिशुपाल इत्यादि राजे श्रीकृष्णाच्या अभिषेकसमारंभास किंवा स्वागतसमारंभास गेले नाहींत–इतकेंच नव्हे तर रागानें संतप्त होऊन ते कुंडिनपूर सोडून आपआपल्या देशास चालते झाले. अर्थातच रुक्मिणीचा स्वयंवर राहिला. तेव्हां श्रीकृष्णही आपल्या यादवांसह मथुरेस परत जावयास निघाला. त्यानें क्रथकैशिकास त्याचें राज्य परत दिलें व त्याचा मोठ्या प्रेमानें निरोप घेतला. श्रीकृष्णास पोंचवावयास भीष्मक राजा व इतर अनेक राजे जमले होते, त्यांनीं अत्यंत प्रेमानें व आदरानें त्यास बिदा केलें ( हरिवंश अ० ४७–५२ ).

रुक्मिणीच्या स्वयंवराचा याप्रमाणें घोटाळा झालेला जरासंधास सहन झाला नाहीं. " मी हिंदुस्थानचा सार्वभौम असून माझी अवहेलना या गोरानें जागजागीं करावी " हें मनांत येऊन त्याच्या तळपायाची आग मस्तकास गेली. कृष्णाचें जड पारडें कोणी तरी बाहेरील शत्रु आणल्याशिवाय हलकें व्हावयाचें नाहीं, असा विचार करून जरासंधानें ( जयचंदानें शाबुद्दीनास बोलाविलें त्याप्रमाणें ) कालयवनास आपल्या मदतीस बोलाविलें. पश्चिमेकडून कालयवन व पूर्वेकडून जरासंध याप्रमाणें दोहोंकडून मथुरेवर चाल करून मथुरा चिरडून टाकावी असा त्यानें व्यूह रचला. आपल्या तर्फेच्या सौभ देशाच्या शाल्व राजास त्यानें मुद्दाम कालयवनाचें मन वळविण्याकरितां पाठविलें आणि कालयवन व शाल्व हे दोघे मिळून मथुरेवर पश्चिमेकडून चालून आले. इकडे जरासंधही आपलें प्रचंड सैन्य घेऊन ठराविक दिवशीं मथुरेवर पोंचवण्याच्या इराद्यानें निघाला. ही

सैन्याची हालचाल श्रीकृष्णास गुप्त हेरांकडून समजली, तेव्हां त्यास मोठी काळजी उत्पन्न झाली. ज्या मथुरेनें वनमालांनीं सुशोभित केलेल्या पताका उभारून माझें नुकतेंच स्वागत केलें व रस्त्यावर चंदनाचे सडे घालून अगरु, गुग्गुळ, धूप आणि सर्जरस जाळून सुवासानें भरलेल्या रस्त्यावर माझ्या-करितां पायघड्या घातल्या, त्याच मथुरेंत आतां परचक्राच्या रथांच्या पताका फडफडून रस्त्यांत रक्ताचा सडा पडून प्रेतांचे दुर्गंध सुटतील; ही कल्पना येऊन श्रीकृष्णास फार दुःख झालें. डोक्यावर कलश घेतलेल्या स्त्रियांनीं जेथें माझें स्वागत करून " या उदार श्रीकृष्णानें कंसाच्या रिकाम्या पडलेल्या सिंहासनावर आरोहण केलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्यास राजेंद्र-पद मिळालें असूनही उग्रसेनाकडून अर्घ्यपूजा न घेतां मथुरेचा राजा तूंच आहेस, असें त्याचें सांत्वन करून निरपेक्षपणाची कमाल केली " अशी माझी स्तुति केली. याच मथुरेंतील स्त्रियांनीं, " या कृष्णानें जरासंधाचें हाडवैर संपादन करून आमच्यावर हें वारंवार येणारें दुःख आणलें आहे " असें म्हणावें, हें मला अत्यंत लाजिरवाणें आहे असें त्यास वाटलें. काल-यवन व जरासंध हे दोघेही आपल्यास अवध्य आहेत हें जाणून श्रीकृष्णानें या वेळीं त्यांच्या त्रासापासून मथुरेची कायमची सुटका करण्याचें मनांत आणलें. मथुरा सोडून देऊन सर्व यादवांनिशीं आनर्त देशांत जाऊन समुद्र किनाऱ्यावर एक नवीन शहर स्थापन करावें असा आपल्या मनाशीं निश्चय करून त्यानें तो बेत सर्व यादवांपुढें मांडला व जरासंधाच्या व कलयव-नाच्या हालचालीची त्यांस बातमी सांगितली. जरासंधाचें सामर्थ्य कालयव-नाच्या मदतीनें अधिकच दुर्निवार झालें आहे, व कालयवन बहुतेक नजीक येऊन पोंचला आहे असें जाणून सर्व यादवांनीं श्रीकृष्णाची सल्ला आनं-दानें पसंत केली. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला, " यादवहो, आजच दिवस चांगला आहे. आजच्या आज आपण आपलें सैन्य व अनुयायी बरोबर घेऊन येथून निघून जाऊं. " याप्रमाणें श्रीकृष्णाची आज्ञा होतांच वसु-देवप्रभृति सर्व यादव सरदार आपलीं कुटुंबें, सैन्य व द्रव्य घेऊन मथुरेचा त्याग करून दुंदुभींचा निर्घोष करीत निघाले. गजाश्वरथादि वाहनें सज्ज करून त्यांनीं आपल्याबरोबर घेतलीं. निरनिराळ्या तुकड्यांनीं आपआपल्या सैन्यां-सह व संपत्तीसह निघून पश्चिमेकडे प्रयाण केलें. पश्चिम व नैर्ऋत्य या दिशांच्या

अनुरोधानें जातां जातां ते आनर्त* देशांतून समुद्राच्या किनाऱ्यावर पोंचले तेव्हां नारळांचीं, एलांचीं, पुन्नागांचीं, व केतकीचीं वनें पाहून त्यांस फार आनंद झाला. आपण शहर कोठें वसवावें याचा विचार करितां सागरानें चारही बाजूंनीं वेष्टिलेला व रेतड तांबड्या मातीचा एक कुशस्थली नावाचा हवाशीर विस्तीर्ण प्रदेश त्यांस दिसला; तेथें नगर कायम करावें असा विचार करून तेथे श्रीकृष्णानें सर्व यादवांना आपआपल्या सैन्यासह उतरविलें व त्यांनीं तेथें तात्पुरतीं शिबिरें आपल्याकरितां बांधलीं. नंतर चारही बाजूंनीं कोट बांधण्याचें काम श्रीकृष्णाच्या हुकुमानें चालू झालें. याप्रमाणें सर्व यादवांची व त्याजबरोबर जे मथुरेहून लोक आले त्यांची व्यवस्था लावून श्रीकृष्ण कालयवनाचा समाचार घेण्यासाठीं पुन्हां मथुरेकडे परतला ( हरिवंश, ५३–५६ ).

या नवीन उत्पन्न झालेल्या नगररूपी बालवृक्षावर कालयवनरूपी हत्तीचा पाय पडूं नये यासाठीं त्यास मथुरेजवळच गांठण्याच्या इराद्यानें श्रीकृष्ण पुन्हां झपाट्यानें परतला, तो त्यास त्यानें धोलपुराजवळ गांठलें. कालयवनास लढाईचा आव दाखवून श्रीकृष्णानें मागें पाय घेतला, तेव्हां श्रीकृष्णाचा जोरानें पाठलाग करीत कालयवन डोंगरांत शिरला. युद्धपटु श्रीकृष्णानें त्यास धोलपूरच्या डोंगरांत नेऊन त्याचें सैन्य अडचणीच्या जागेंत फसविलें, तरी तो एकटाच निर्भयपणें श्रीकृष्णाचा पाठलाग करीत चालला. तेथें जवळच एका मोठ्या गुहेंत राजर्षि मुचुकुंद त्रेतायुगापासून निजला होता. हा मुचुकुंद इक्ष्वाकु वंशांतील मांधात्याचा पुत्र असून त्यास देवांनीं असुरांविरुद्ध लढण्याकरितां आपल्या मदतीस नेतलें होतें. शेंकडों वर्षें युद्ध चालून मुचुकुंदानें असुरांचा पराभव केला, तेव्हां देवांनीं संतुष्ट होऊन त्यास वर माग असें म्हटलें. "तुझीं बायकापोरें, अमात्य, सेवक इत्यादि सर्व लोक या अवधींत पृथ्वीवर मेले आहेत" असेंही त्यांनीं त्यास सांगितलें; तेव्हां त्या श्रांत व खिन्न झालेल्या राजर्षीनें दीर्घ निद्राच मागितली. "मला जो जागा करील त्याजकडे मीं पाहतांच तो भस्म व्हावा"

* आनर्त अथवा गुजराथ या देशाच्या राजाची कन्या बलरामाची बायको होती. पुढें पान ८३ पहा.

असा देवांपासून वर मागून घेऊन मुचुकुंद तेथें एका गुहेंत निजला होता. श्रीकृष्णास ही सर्व हकीकत नारदापासून माहीत झालेली होती. त्याच गुहेंत प्रवेश करून श्रीकृष्ण बाजूस अंधेरांत मौज पाहत उभा राहिला. थोड्या वेळानें कालयवन तेथें आला व त्यानें "हा गुलाम येथें झोपेचें सोंग घेऊन पडला आहे" असें म्हणत त्या मुचुकुंदास लाथ मारली; त्याबरोबर मुचुकुंद जागा झाला व संतापानें त्यानें कालयवनाकडे पाहिलें, तेव्हां त्याच्या नेत्रांतून निघालेल्या ज्वालेनें कालयवन भस्म झाला, कालयवनाचा मृत्यु मुचुकुंदाच्या हातून होणार होता त्याप्रमाणें युक्तीनें तो घडवून आणून श्रीकृष्णानें मुचुकुंदास दर्शन दिलें. हल्लीं कोण युग चालू आहे, असें त्यानें विचारलें, तेव्हां "हल्लीं द्वापरयुग संपत आलें आहे. कलियुग लागलेंच आहे असें समजा," असें श्रीकृष्णानें त्यास सांगितलें. श्रीकृष्णास नमस्कार करून मुचुकुंद गुहेबाहेर पडला तों त्यास सर्वच गोष्टी चमत्कारिक दिसल्या. लहान लहान माणसें, लहान लहान वृक्ष, लहान लहान गाई—बैल इत्यादि सर्वच जीवसृष्टि अल्प परिमाणाची, अल्प बलाची, अल्प उत्साहाची झालेली पाहून व आपलें राज्यही दुसरें कोणीं घेतलें असेल असें मनांत येऊन राजर्षि मुचुकुंद श्रीकृष्णाच्या अनुमतानें हिमालयांत बदरिकाश्रमीं तपश्चर्या करण्याकरितां निघून गेला. इकडे सेनानायक नाहींसा झाल्यानें कालयवनाचें सैन्य डोंगराच्या अडचणीच्या जागेंत होतें, त्याचा श्रीकृष्णानें सहज पराभव करून त्यांतील हस्त्यश्वरथादि सर्व संपत्ति आपल्या हस्तगत केली व कित्येक यवनवीरही त्यानें आपल्या नोकरीस ठेविले. याप्रमाणें कालयवनाचा कांटा नाहींसा करून श्रीकृष्ण त्या सैन्यानिशीं व संपत्तीनिशीं मथुरेस आला. तेथें उग्रसेनास सर्व हकीकत सांगून व त्याचें सांत्वन करून तो लागलींच तें सैन्य व ती संपत्ति घेऊन द्वारकेस आला. इकडे जरासंधास कालयवनाच्या मृत्यूची व यादवांनीं मथुरेचा त्याग करून समुद्रांत आपल्याकरितां स्वतंत्रपणें द्वारका शहर स्थापन केल्याची हकीकत समजली, तेव्हां तोही आपली मथुरेवरची चाल बंद करून मगध देशास परत गेला (हरिवंश, वि० अ० ५६–५७).



# द्वारकापर्व

कालयवनास ठार मारवून, जरासंधास परतवून व कालयवनाची अगणित संपत्ति घेऊन श्रीकृष्ण द्वारकेस आला, तेव्हां सहजच त्यास निर्भयपणानें द्वारकेची रचना करण्यास कोणतीच हरकत उरली नाहीं. शहराला लागूनच एका प्रशस्त ठिकाणीं त्यानें द्वारकेचा भुईकोट किल्ला बांधण्यास सुरुवात केली. शनिवारच्या दिवशीं रोहिणी नक्षत्रावर प्रातःकाळीं ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन व स्वस्तिवाचन करवून त्यानें किल्ल्याच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ सर्व यादवांसमक्ष वसुदेवाकडून करविला. नंतर देशो-देशींचे उत्तम कारागीर बोलावून त्यांजकडे किल्ला व शहर बांधविण्याचें काम सोंपविलें. थोडक्याच दिवसांत ज्याचें संरक्षण स्त्रियांनीमुद्धां करावें असा एक मजबूत किल्ला त्या कारागिरांनीं बांधून तयार केला.त्या किल्ल्यास चार वेशी ठेविल्या असून त्यांचीं नांवें शुद्धाक्ष, ऐन्द्र, भल्लात व पुष्पदंत अशीं होतीं. किल्ल्याच्या आंत टोलेजंग राजवाडा असून तेथें एक विस्तीर्ण देवालयही श्रीकृष्णानें बांधिलें. त्यांत कुलदेवतेची स्थापना करवून शिवाय ब्रह्मा, वरुण, रुद्र, इंद्र इत्यादि देवतांचीं स्थानें कायम केलीं. शहरांतील जागा दोऱ्या लावून निरनिराळ्या यादव सरदारांस श्रीकृष्णानें वांटून दिल्या, त्या ठिकाणीं त्यांनीं आपआपल्याकरितां सुंदर वाडे बांधविले. शहराच्या मूळच्या लहान टापूंत सर्व लोकांस जागा पुरेनाशी झाली, तेव्हां श्रीकृष्णानें समुद्रापासून बारा योजनें जागा घेऊन ती शहरांत सामील केली. त्यामुळें सर्वांस विपुल जागा मिळून शहराभोंवतीं बागबगीचेही तयार झाले. श्रीकृष्णानें आपल्यासाठींही विस्तीर्ण अन्तःपुर व शालांसह एक भव्य प्रासाद तयार करविला. बलराम, सात्यकि, अक्रूर इत्यादि अनेक सरदारांचेही टोलेजंग

वाडे तयार झाले, सारांश, थोड्याच अवधींत इंद्राच्या अमरावतीप्रमाणें समुद्राकिनाऱ्यावर एक सुंदर व विस्तीर्ण नगर निर्माण झालें. किल्ल्यास धरून सर्व शहराभोंवतीं मजबूत कोट असून तो आंतून दगडाचा होता व त्यास बाहेरून सुवर्णाचा पत्रा लावला होता, यामुळें तो रात्रंदिवस लखलखलख प्रकाशे. कोटाच्या बाहेर पाण्यानें भरलेला रुंद खंदक होता; त्याच्या पोटांत मगरी व लोखंडांचे तीक्ष्ण कांटे भरले असून त्याच्या पृष्ठावर सुंदर कमलें फुललेलीं होतीं. खंदकाच्या बाहेरच्या बाजूस आणखी एक मजबूत धस खंदकांतून काढलेल्या मातीचा होताच. कोटास ठिकाठिकाणीं रत्नांनीं सुशोभित केलेले अनेक दरवाजे असून त्या त्या ठिकाणीं खंदकावरून शहरांत जाण्यास पूल होते. दरवाज्यांच्या आंत रुंद सडका असून प्रत्येक चवाठ्यावर सुंदर कारंजीं उडत होतीं. मोठमोठीं बाजाराचीं ठिकाणें बांधलेलीं असून तीं देशोदेशींहून आलेल्या व्यापाऱ्यांनीं व मालांनीं भरलीं होतीं. चारही बाजूंनीं उंच इमारती असलेले विस्तीर्ण चौक त्या शहरात शेंकडों होते. सर्व शहरांत समुद्रावरून स्वच्छ व थंड वारा वाहत असल्यानें कोठेंही कोंदटपणा किंवा चिवचिवाट नव्हता. शहरांत व बाहेर विपुल व मधुर पाण्याच्या हजारों विहिरी होत्या व त्यामुळें शहरांत व शहराभोंवतीं फुलें व फळें लागलेल्या वृक्षांनीं भरलेले हिरवेगार बागबगीचे होते. याशिवाय भाजीपाल्याच्या वाड्या शहराजवळ किती होत्या त्यांची गणतीच नव्हती. याप्रमाणें सर्व सुखसाधनांनीं समृद्ध झालेल्या त्या सुंदर नगरींत श्रीकृष्णानें आपल्या ज्ञातिबांधवांसह वसति करून चंद्र जसा आकाशास शोभा देतो त्याप्रमाणें त्यानें तीस शोभा आणली. इतकेंच नव्हे, तर श्रीकृष्णाच्या कृपेनें त्या शहरांतील यादव व इतर सर्व लोक संपन्न व सुखी होऊन त्या नगरांत राहण्यास सर्व तऱ्हेनें योग्य झाले. द्वारकेंत मलिन वस्त्राचा किंवा विपन्न मुद्रेचा एकही मनुष्य दिसेनासा झाला. “ मला कांहीं द्या हो ” हा भिक्षेकऱ्यांचा आवाज द्वारकेंत ऐकूं आला नाहीं. असो. अशा त्या सुखी व संपन्न नगरांत श्रीकृष्णानें वसुदेवास राज्याभिषेक करविला. राजास सर्व कामांत सल्लामसलत देण्याकरितां दहा शहाण्या यादवांचें एक मंत्रिमंडळ नेमिलें. बलरामास युवराज नेमून विपृथूस मुख्य प्रधान नेमिलें. अनाधृष्टि व सात्यकि यांस मुख्य व नायब सेनापति नेमिलें. आपला गुरु सांदीपनि

काश्य यास उज्जयिनीहून बोलावून आणून राजपुरोहित केलें. याप्रमाणें स्वार्थरहित बुद्धीनें सर्वांस यथायोग्य अधिकार देऊन श्रीकृष्णानें राज्याची व्यवस्था लाविली, तेव्हां तें यादवांचें राज्य तात्काळ सहजच संपन्न व बलिष्ठ झालें ( हरिवंश, वि० अ० ५८ ).

श्रीकृष्णाचें वय या वेळीं ऐन तारुण्याचें म्हणजे पंचवीस वर्षांचें होऊन तो विवाहास अगदीं योग्य झाला. त्यानें आपल्याकरितां स्वतंत्र गृहही बांधलें होतें, पण तें गृह अद्याप गृहिणीवांचून शून्य दिसत होतें. बलरामाचा विवाह यापूर्वींच मथुरेंत झाला असून त्यास आनर्त देशाच्या रेवत राजाची मुलगी रेवती दिली होती. किंबहुना याच संबंधामुळें श्रीकृष्णानें व यादवांनीं आनर्त देशाजवळ समुद्रकिनाऱ्यावर आपलें शहर वसविले होतें. सौंदर्य, पराक्रम, बुद्धि, सौजन्य, इत्यादि श्रीकृष्णाच्या सद्गुणांस अनुरूप अशी भार्या त्यास कशी मिळते याविषयीं सर्वांस मोठी विवंचना लागली. त्यास सर्वतोपरी योग्य अशी पत्नी म्हणजे एक रुक्मिणी होती. पण हा समानयोग जुळणार कसा ? क्षत्रियाच्या कन्येचा विवाह तीन तऱ्हेनें व्हावयाचा. स्वयंवरानें, दानानें किंवा हरण केल्यानें. रुक्मिणीचा स्वयंवर तर बंदच झाला होता. भीष्मक व त्याचा पुत्र रुक्मी हे जरासंधाच्या पक्षाचे असल्यानें ते रुक्मिणीस श्रीकृष्णास देतील हेंही संभवनीय नव्हतें. राहिलें हरण करणें, त्यांत काय काय अनर्थ ओढवतील याचा भरंवसा नसतो. तशांत अंबेप्रमाणें तिनें आपल्या मनानें पूर्वीं कोणास वरलें असल्यास भीष्माप्रमाणें शूर क्षत्रिय तिला कधींही स्वीकारणार नाहीं हें उघड होतें. अशा सर्व तऱ्हेच्या अडचणींत श्रीकृष्णास रुक्मिणीचा लाभ कसा व्हावा याची सर्वांस काळजी लागली. इतक्यांत जरासंधाच्या आग्रहावरून शिशुपालास रुक्मिणी देण्याचा निश्चय होऊन कुंडिनपुरास लग्नसमारंभ मांडल्याची खबर श्रीकृष्णास लागली. तिथिनिश्चय होऊन जरासंधादि राजे कुंडिनपुरास जमा होऊं लागले. श्रीकृष्णाचें व शिशुपालाचें आतेमामेभावाचें नातें असल्यानें दमघोषाकडून यादवांस कुंकुमपत्रिकाही येऊन पोंचली. अशा स्थितींत काय करावें आणि काय नाहीं हें श्रीकृष्णास सुचेना. त्याचें मन स्वयंवर मोडल्या दिवसापासून रुक्मिणीवर बसलें होतें तें तेथून ढळलें नव्हतें. रुक्मिणीनेंही त्याच दिवशीं मनानें श्रीकृष्णास वरून त्याचाच ध्यास घेतला होता.

विमलचरित कमलनयन श्रीहरीशिवाय मी इतरांची नवरी होणार नाहीं, असें तिनें लज्जा सोडून आईबापांस सांगितलें. पण ज्येष्ठ बंधु रुक्मिच्या हट्टापुढें तिचें ऐकतो कोण ? " मुली स्वतंत्र आहेत काय ? श्रीकृष्ण आमचा कट्टा शत्रु त्यास आम्ही आपली मुलगी काय म्हणून द्यावी ? " इत्यादि रुक्मीच्या भाषणांनीं रुक्मिणीचें श्रीकृष्णावरचें प्रेम व त्यामुळें होणारें दुःख अधिक मात्र वाढलें. प्रेमपुरास व दुःखपुरास जों जों बांध घालावा तों तों तो बळावत जातो. जसजसा लग्नाचा दिवस जवळ येऊं लागला तसतसे रुक्मिणीचे प्राण कासावीस होऊं लागले. श्रीकृष्णाशिवाय इतरांवर माझ्या अक्षता पडल्या तर माझे प्राण जातील असें तिनें आईस बजाविलें. " पण प्राण जावयास काय वाटेवर पडले आहेत " असा हट्टी रुक्मीनें रोकडा जबाब दिला, तेव्हां रुक्मिणीचा उपाय खुंटला. ज्येष्ठ बंधु जर आपल्या बहिणीस विकील तर कोणास शरण जावयाचें असें वाटून तिच्या नेत्रांतून घळघळ अश्रुधारा वाहूं लागल्या. पण क्षणभरानें तिला एक विचार सुचून हिम्मत आली. आईबाप, भाऊबहिणी इत्यादि सर्व नात्यांहून अत्यंत श्रेष्ठ व पवित्र नातें स्त्रियांना पतीचें, त्या पतीलाच शरण जाण्यास काय हरकत आहे ? असें मनांत येऊन तिनें श्रीकृष्णाकडेसच आपलें गाऱ्हाणें गेलें. तिनें आपल्या मनानें वरलेल्या पतीस प्रेमानें, भक्तीनें, विनयानें व अनन्यभावानें ओतप्रोत भरलेलें एक पत्र लिहिलें. * " हे भुवनसुंदरा अच्युता, ऐकणाऱ्याच्या अंगाचा ताप हरण करणारे तुझे गुण, व पाहणाऱ्यांच्या नेत्रांचें साफल्य करणारें तुझें रूप, यांची कीर्ति ऐकून माझें निर्लज्ज मन तुझ्या चरणारविंदांत जाऊन बसलें आहे, तें तेथून हालत नाहीं. हे नृसिंहा,मुकुंदा, वरास अवश्य असणाऱ्या कुल, शील, रूप, विद्या, वय, धन व तेज या गुणांनीं या भूलोकीं तुझ्यासारखा तूंच आहेस; त्या तुला कोणती मोठी झालेली कन्या, मग ती कितीही धैर्य धरणारी व कुलवान् असो, विवाह-

* श्रुत्वा गुणान्भुवनसुंदर शृण्वतां ते, निर्विश्य कर्णविवरैर्हरतोऽङ्गतापम् ।
रूपं दृशां दृशिमतामखिलार्थलाभं त्वय्यच्युताविशति चित्तमपत्रपं मे ॥ पासून,
यस्यांघ्रिपंकजरजःस्नपनं महान्तो, वांछन्त्युमापतिरिवात्मतमोपहत्यै ।
यर्ह्यम्बुजाक्ष न लभेय भवत्प्रसादं जह्यामसून् व्रतकृशाञ्छतजन्माभिःस्यात् । पर्यंत भागवतांतील दशमस्कंध उत्तरार्ध, अध्याय ५२ मधले श्लोक पाहावे.

काली स्वतःस अर्पण करणार नाहीं ! यासाठीं प्रभो, मी तुला आपला पति म्हणून वारिलें असून आपला आत्मा अर्पण केला आहे यांत नवल मानूं नकोस, आणि या वेळेस जें योग्य आहे तें तात्काळ करण्यास राहूं नकोस. नाहीं तर सिंहाचा भाग जसा कोल्हा घेऊन जातो, त्याप्रमाणें हा दुष्ट शिशुपाल मला घेऊन जाईल. जर मी देवांचें, ऋषींचें, गुरूंचें व परमेश्वराचें मनोभावानें पूजन केलें असेल तर तूं माझी या वेळीं उपेक्षा करणार नाहींस तुझ्या बंधूंना मारल्याशिवाय मी तुझें कसें हरण करूं अशी तुला शंका येईल, तर लग्नाच्या आदल्या दिवशीं गिरिजेच्या दर्शनास वधूला नेण्याचा आमच्या कुलांत सांप्रदाय आहे तेथून तूं मला घेऊन जा. याप्रमाणें अंबुजाक्षा श्रीकृष्णा, माझ्यावर जर तूं कृपा करणार नाहींस तर मी आपले प्राण जन्मोजन्मीं व्रतानें कर्षण करून शंभर वेळ जरी वेंचावे लागले तरी वेचून तुझी कृपा संपादन करीन. " असें प्रेमपूर्ण पत्र लिहून तें एका भरंवशाच्या ब्राह्मणाच्या हातीं तिनें ताबडतोब द्वारकेस पाठविलें. श्रीकृष्ण आपल्या गृहांत रुक्मिणीचेंच ध्यान करीत चिंताक्रांत बसला होता, तों कुंडिनपुराहून एक ब्राह्मण आला आहे अशी त्यास वर्दी मिळाली. तेव्हां लागलींच त्यानें त्यास बोलावून सिंहासनावरून उठून विनयानें योग्य स्थानावर बसविलें व कुशल प्रश्न करून कुंडिनपुराकडील लग्नाची हकीकत विचारिली, तेव्हां त्यानें बरोबर आणलेलें पत्र श्रीकृष्णापुढें टाकलें. रुक्मिणीची ती अनन्यगतिक प्रेमपत्रिका वाचीत असतां श्रीकृष्णाचें अन्तःकरण कळवळलें. त्याच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. रुक्मिणीची अनन्यभक्ति पाहून आनंदानें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. " ठीक आहे. या दुःखापासून रुक्मिणीस मी निश्चयानें सोडवतों " असें आश्वासन देऊन श्रीकृष्णानें दारुकास आपला रथ ताबडतोब जोडून आणण्याची आज्ञा केली. शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प व बलाहक असे चार शुभ्रवर्ण अश्व जोडलेला रथ दारुकानें आणिला, तेव्हां श्रीकृष्ण त्या ब्राह्मणासह रथांत बसला आणि कुंडिनपुराकडे तात्काळ रवाना झाला. मी कोठें जातों आहें व कशास हें कोणास सांगण्याचेंही त्यास भान राहिलें नाहीं. रुक्मिणीस त्या दुष्ट शिशुपालाच्या हातून मी केव्हां सोडवून आणीन असें त्यास झालें. त्याच्या ध्यानीं मनीं रुक्मिणीशिवाय दुसरें कांहीं राहिलें नव्हतें. कुंडिनपुराचा एक ब्राह्मण येऊन श्रीकृष्णास घेऊन गेला ही

खबर बलरामास लागली तेव्हां त्याच्या लक्षांत सर्व प्रकार आला; व युद्धाचा दुर्धर प्रसंग लवकरच श्रीकृष्णावर ओढवेल हें लक्षांत आणून यादवांचें सैन्य घेऊन तोही पाठोपाठ निघाला ( भागवत, द० ५२ ).

इकडे कुंडिनपुरास लग्नाची सर्व तयारी झाली. वधूपक्षाकडे लग्नाच्या पूर्वी कुलानुरूप अनेक संस्कार व समारंभ व्हावयाचे असतात ते झाले. शिशुपालाकडील वरपक्षीय मंडळी येऊन त्यांचें सीमान्तपूजन भीष्मकानें थाटानें करून त्यांस जानोशाच्या जागीं उतरविलें. सर्व शहर पताकातोरणांनीं शृंगारलें जाऊन जिकडे तिकडे मंगलकारक चौघडे झडूं लागले. श्रीकृष्ण पूर्वीप्रमाणें येऊन बखेडा घालील या कल्पनेनें शिशुपालाचे शाल्व, जरासंध, दंतवक्र, पौंड्र इत्यादि दोस्तराजे आपआपलीं सैन्यें घेऊन आले. त्यांचेंही भीष्मकानें उत्तम स्वागत करून निरनिराळ्या प्रासादांत त्यांस उतरविलें. शिशुपालाकडील मांडवांतही दमघोषानें वराच्या संबंधाचे समारंभ केले. याप्रमाणें सर्व मंडळी लग्नाच्या अनेक व्यवसायांत व धामधुमींत गुंतून गेली, यामुळें जिच्या सुखाकारितां एवढा समारंभ चालला होता तिच्या मनाची स्थिति काय झाली आहे याजकडे कोणाचेंही लक्ष नव्हतें. आपण पाठविलेला ब्राह्मण अद्याप परत आला नाहीं, हें पाहून रुक्मिणीच्या मनांत अनेक तर्कवितर्क उत्पन्न होऊन तिचें अंतःकरण दुःखसमुद्रांत बुडालें होतें. " ब्राह्मणास रस्त्यांत कांहीं विघ्न तर झालें नाहींना, किंवा माझ्या ठिकाणीं कांहीं न्यूनता पाहून श्रीकृष्णानें माझा अव्हेर तर केला नाहींना ? आई जगदंबे देवी, माझ्यावर तूंच करुणा करशील तर मजवर येऊं पाहणारा हा भयंकर अनर्थ टळेल " असें म्हणत तिनें आपले डोळे मिटले व मनोमय कुलस्वामिनीचा धांवा केला. तिच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या व तिचें मुख चिंतेनें म्लान झालें. क्षणभरानें तिनें डोळे उघडले तों तिच्या समोर पाठविलेला ब्राह्मण उभा असलेला दृष्टीस पडला. त्याची प्रसन्नमुद्रा पाहून हा कार्य सिद्ध करून आला आहे असें वाटून हर्षभरानें ती तटकन् उठली. या वेळेस यास काय बक्षीस द्यावें हें न सुचून तिनें त्यास केवळ नमस्कार घातला. " बाईसाहेब, उठा, तुम्ही काळजी करूं नका; श्रीकृष्णास घेऊन आलों. त्यांनीं तुम्हांस निश्चयानें घेऊन जातों असें वचन दिलें आहे. तर उठा आणि आनंदानें व निर्भयपणानें आपल्या कार्यास लागा. " हे त्याचे

उत्साहजनक शब्द ऐकून रुक्मिणी उठली आणि म्हणाली, " सुदेवा, तुमचे उपकार मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं तुम्हां ब्राह्मणांना काय द्यावें हेंच मला समजत नाहीं. यासाठीं मी तुम्हांस जन्मोजन्मीं नमस्कार करीन." हाच तिचा उपकार पुरे आहे असें मानून सुदेवानें आपल्यास धन्य मानलें. कांहीं वेळानें कुलसांप्रदायाप्रमाणें देवीच्या दर्शनास वधूस नेण्यासाठीं ब्राह्मण व क्षत्रिय सुवासिनी स्त्रिया आल्या. त्यांनीं रुक्मिणीस स्नान घालून तिला विवाहकौतुकसूत्र बांधलें. दोन उंची कोरीं वस्त्रे एक नेसावयास व एक अंगावर घेण्यास तिला दिलीं. उत्तम उत्तम अलंकार घालून तिला भूषित केलें. अगोदरच ती अत्यंत लावण्यवती, त्यात राजवैभवास योग्य अशा विवाहाच्या वस्त्रालंकारांनीं सजवलेली; शिवाय मनानें वरलेल्या पतीचें आज दर्शन होऊन आपण त्याच्या स्वाधीन होणार या कल्पनेने हृदयांत आनंदाचा पूर दाटलेला; मग तिच्या तेजस्वी सुंदर मुखाकडे पाहवेनासें झालें यांत नवल काय ! वृद्ध ब्राह्मणक्षत्रिय सुवासिनींनीं व आई आत्या इत्यादि आप्तांनीं वेष्टिलेली ती सुंदर वधू पायांनीं मंगलगीतांच्या प्रोत्साहनानें देवीच्या दर्शनास निघाली. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस सशस्त्र सैनिक उभे होते. मागें-पुढें नागव्या तलवारी घेतलेले रक्षक चालत होते. बरोबर दोनतीन सख्या नम्र भाषणें करीत हात धरून चालल्या होत्या. मंदिर राजवाड्याजवळच होते. तेथें लवकरच पोंचून, हातपाय धुऊन रुक्मिणी मंदिरांत गेली आणि तिने देवीची यथासांग पूजा केली. नंतर सद्गदित कंठानें " माते, भवानी, इंद्राणी,* नारायणी, मला ईप्सित पति दे " अशी तिनें हात जोडून देवीस प्रार्थना केली. तेव्हां पुजाऱ्यानें तथास्तु म्हटलें व स्त्रियांनीं हळद-कुंकू वस्त्रें, नारळ वाटले. नंतर सर्वांचा आशीर्वाद घेऊन रुक्मिणी, हृदय थरथर कांपत, मुखावर विवर्णाची लहर जात येत, देवळाच्या बाहेर पडून पायऱ्या-पाशीं आली, तों एक मेघासारखा घोष करणारा रथ तेथें धांवत आला. तो कोणीकडून कसा आला याचें कोणास भान राहिलें नाहीं. त्यांत लक्ष-

* हरिवंशात इंद्राणीचें देऊळ होतें असें वर्णन आहे. हरिवंशात ब्राह्मण पाठविल्याची जरी कथा नाहीं तरी स्वयंवर मोडल्यावर रुक्मिणीनें श्रीकृष्णास मी वरीन असा निश्चय केल्याचें वर्णन आहे.

चंद्रकांतीनें शोभणारें श्रीकृष्णाचें मुख पाहतांच रुक्मिणीचें देहभान नाहींसें झालें. पतीचें दर्शन झाल्याबरोबर धांवून येणाऱ्या सुखी लज्जेनें तिला सांवरून धरलें. अवर्णनीय स्मितानें शोभणारें आपलें मुख तिनें खालीं केलें. तिची ती रम्य अवस्था पाहून श्रीकृष्णानें आनंदातिशयानें तिला एकदम रथांत फुलासारखें उचलून किंबहुना ओढून घेतलें. " हा ! हा ! हें काय ! हें काय ! " असा चोहोंकडे कल्लोळ उसळत असतां श्रीकृष्णाचा रथ तेथून झपाट्यानें निघाला, तो पाहतां पाहतां दिसेनासा झाला. हा सर्व प्रकार होत असतां पाहरेकरी व रस्त्यांत उभे असलेले शिपाई मोहानें बेशुद्ध होते असेंच म्हटलें पाहिजे. ते या वेळीं सावध होऊन " धांवा, कृष्णानें रुक्मिणी हरण करून नेली, " असें ओरडत श्रीकृष्णाच्या रथा-मागें धांवले. विजेच्या वेगानें ती बातमी तोंडोतोंडीं चोहोकडे पसरून शिशु-पालाचें तोंड लज्जेनें काळें पडलें आणि जरासंध व रुक्मी यांचें क्रोधानें लाल झालें ( भागवत, द० अ० ५३ ).

ज्याप्रमाणें सिंह कोल्ह्यांमधून आपल्या भागास उचलून घेऊन जातो आणि मग ते कोल्हे त्याच्या मागें कोल्हेकुई करीत धांवतात, किंवा गरुड कावळ्यांमधून आपला भाग घेऊन गेला म्हणजे कावळे त्याच्यामागें कांव कांव करीत उडत जातात, त्याप्रमाणें जरासंध,शाल्व इत्यादि राजे श्रीकृष्णा-मागें धांवले. त्यांस बलराम, अनाधृष्टि, कंक इत्यादि यादव वीरांनीं अडवून धरलें तेव्हां त्यांच्या व यांच्या सैन्याची लढाई चालू झाली. शेवटीं या लढाईत आपल्यास यश येणार नाहीं असें जाणून ते सर्व परत फिरले. धन जर स्वतःच चोरांच्या हातांत जाऊन पडलें, तर तें आपल्या घरीं कसें राहणार असा युक्तिवाद सांगून जरासंधानें शिशुपालाची समजूत काढली व त्यास शांत करून आपल्या देशास पाठवून दिलें. पण रुक्मीचें क्रोधानें ओतप्रोत भरलेलें अन्तःकरण शांत कसें होणार ? त्याचें या युक्ति-वादानें कसें समाधान होणार ? मी एवढा पराक्रमी, माझ्या हातावर तुरी देऊन श्रीकृष्णानें माझ्या ताब्यांतून रुक्मिणीस हरण करून नेलें. त्याजबद्दल त्यास अत्यंत विषाद वाटला.रुक्मिणीस श्रीकृष्णाला न देण्याचा हट्ट त्याचाच होता. तो त्याचा चालला नाहीं, यामुळें तो अतिशयच खवळला. " श्री-कृष्णास मारून रुक्मिणीस परत आणीन तरच मी कुंडिनपुरास तोंड दाख-

वीन " अशी प्रतिज्ञा करून एका जलद चालणाऱ्या रथांत बसून तो धांवला. जरासंधादि राजांचें व बलरामाचें सैन्य झगडत होतें त्यास बाजूस टाकून त्यानें द्वारकेचा रस्ता धरला आणि श्रीकृष्णास नर्मदेवरच गांठलें. " थांब चोरा थांब, " असें ओरडत त्यानें श्रीकृष्णास युद्धास आव्हान केलें; तेव्हां श्रीकृष्णानें रथ थांबवून तो त्याच्या सन्मुख केला. त्या वेळेस रुक्मिणीस ' दे माय धरणी ठाय ' झालें. इकडे पति तरी मरतो, नाहीं तर भाऊ तरी मरतो असा प्रसंग पाहून तिचें तोंड उतरून गेलें ! " रणांत सन्मुख घाव खाऊन मेलेल्या पतीबद्दल किंवा भावाबद्दल क्षत्रियस्त्रिया शोक करीत नाहींत, " हें श्रीकृष्णाचें वाक्य ऐकून तर तिला रडें कोसळलें ! " प्रभो, दोघेही सुरक्षित ठेवणें हा आपल्या पराक्रमाला कांहीं भार नाहीं, " असें तिनें हात जोडून म्हटलें, तेव्हां श्रीकृष्णास सानंद गहिंवर आला. " बरें, तूं म्हणतेस तसें होईल. तुम्ही स्त्रिया आपलेंसें केल्याशिवाय राहणार नाहीं." असें म्हणून तिला रथांत मागें बसवून तो युद्धास पुढें झाला. रुक्मीनेंही धर्मयुद्ध करण्याच्या निश्चयानें त्याजवर असावध प्रहार केला नव्हता. " हां, सावध रहा " असें ओरडून रुक्मीनें द्वैरथ सुरू केलें, व परशुरामापासून मिळविलेल्या अनेक अस्त्रांचा श्रीकृष्णावर एकामागून एक भडिमार केला. श्रीकृष्णानें त्या सर्व अस्त्रांचा प्रतिअस्त्रें टाकून प्रतिकार केला, इतकेंच नव्हे तर घोडे व सारथि बाणांनीं ठार मारून त्याच्या ध्वजाचाही विध्वंस केला. तेव्हां रुक्मी ढालतरवार घेऊन रथांतून उडी टाकून श्रीकृष्णावर धांवला. इतक्यांत श्रीकृष्णानें रुक्मिणीच्या प्रेमानें किंचित् कांपणाऱ्या हातानें धनुष्य ओढून त्याजवर शेवटचा बाण टाकला. त्या बाणानें रुक्मी घायाळ होऊन खालीं पडला व त्यास मूर्च्छा आली. श्रीकृष्णानें रथाखालीं उतरून रुक्मीचे हात त्याच्या उत्तरीयानें बांधून टाकिले, आणि नंतर आपल्या रथांत बसून द्वारकेकडे प्रयाण केलें. रुक्मीचे अनुयायी मागून येऊन तेथें पोंचले, त्यांनीं त्यास दुसऱ्या रथांत घालून कुंडिनपुराकडे चालविलें. रुक्मी रस्त्यांत शुद्धीवर आला, तेव्हां त्यानें तेथेंच मुक्काम केला. कुंडिनपुरांत रुक्मिणीस आणल्याशिवाय तोंड दाखविणार नाहीं ही प्रतिज्ञा त्यानें आमरणान्त सिद्धीस नेण्याचा निश्चय करून तेथेंच भोजकट नांवाचें शहर स्थापन केलें व तेथेंच तो राहूं लागला. इकडे श्रीकृष्ण रुक्मिणीस घेऊन द्वारकेस

आला, तेव्हां द्वारकेंतील लोकांच्या आनंदास पारावार राहिला नाहीं. बलराम व इतर यादव परत येतांच श्रीकृष्णाचा व रुक्मिणीचा यथाविधि विवाह अवर्णनीय थाटानें झाला. शहरवासी लोकांनींही घरोघर गुढ्या, तोरणें व केळींचे खांब लावून विवाहाचा उत्सव परिपूर्ण वैभवानें केला, हें विस्तारानें सांगणें नको ( हरिवंश, वि० अ० ५९–६० ).

रुक्मिणीसारख्या सुंदर, चतुर, सुशील, पतीवर निस्सीम प्रेम करणारी गृहिणी श्रीकृष्णास मिळाल्यानें त्याचा गृहस्थाश्रम योग्य वैभवानें व सौख्यानें चालू झाला. सर्वतोपरी उत्तम गृहस्थाश्रम कसा चालवावा याचें उदाहरण घालून देण्याकरितांच श्रीकृष्णाचें द्वारकेंतील आयुष्य होतें असें म्हटलें असतां चालेल. बाळपण कसें घालवावें आणि सर्वांस प्रिय होऊन शारीरिक शक्ति कशी कमवावी याचें उदाहरण देणारें श्रीकृष्णाचें जसें गोकुळांतील बाल-चरित्र होतें, किंवा पौगंडवय म्हणजे १६ पासून २४ पर्यंत मनुष्यानें विद्या संपादन करून आपल्या पराक्रमानें निर्वाहाचें साधन व स्वातंत्र्य कसें संपादन करावें याचें निदर्शन त्याच्या मथुरेंतील चरित्रावरून जसें होतें त्याप्रमाणें २५ पासून पुढच्या वयांत गृहस्थाश्रमाचा उपभोग मनुष्यानें कसा घ्यावा हें दाखविणारें त्याचें द्वारकेंतील चरित्र रमणीय होतें. त्याचें लग्न २५ व्या वर्षी होऊन त्याची धर्मपत्नी व पट्टराणी रुक्मिणी लग्नांत सुमारें १८ वर्षांची असावी. त्यांचें परस्परांवर निरतिशय प्रेम असून त्यांनीं एकमेकांस सुमनानें वरिलें होतें. तीं दोघेंही समान कुलांतील असून अतिशय सुस्वरूप व पराक्रमी होतीं. साहजिकच त्यांस जें प्रथमापत्य झालें तें सौंदर्याचें व पराक्रमाचें निधान होतें. प्रद्युम्न म्हणजे शंकरानें भस्म केलेल्या मदनाचा अवतार होता. प्रद्युम्नाच्या मागून रुक्मिणीच्या पोटीं श्रीकृष्णास चारुदेष्ण सुदेष्ण, सुषेण, चारुगुप्त, चारुबाहु, चारुविंद, चारु, सुचारु व भद्रचारु असे नऊ सुंदर पुत्र व एक चारुमती नांवाची सुंदर कन्या झाली. या सर्व सुंदर अपत्यांनीं भरलेलें श्रीकृष्णाचें गृह म्हणजे एक आनंदाचें निवास-स्थान होतें. श्रीकृष्णानें रुक्मिणीशिवाय आणखी सात स्त्रिया त्या वेळच्या क्षत्रियांच्या चालीप्रमाणें केल्या हें खरें; परंतु या आठ विवाहित स्त्रियांत रुक्मिणीचाच अधिकार श्रेष्ठ होता व तिजवरच श्रीकृष्णाचें निरतिशय प्रेम होतें. घराची मालकीण ती होती. आल्या–गेल्याचा योग्य पाहुणचार

करून देव, द्विज, आतिथि यांचें पूजन ती करीत असे. सारांश, गृहस्थाश्रमाच्या सर्व सुखांचें व कर्तव्यांचें तंत्र तिच्या आधीन होतें. छांदोग्योपनिषदांत मनुष्यानें जसें आयुष्य घालवावें म्हणून लिहिलें आहे, " आचार्यकुलाद्वेदमधीत्य यथाविधानं गुरोः कर्मातिशेषेणाभिसमावृत्य कुटुंबे शुचौ देशे स्वाध्यायमधीयानो धार्मिकान् विदधदात्मानि सर्वेंद्रियाणि संप्रतिष्ठाप्य अहिंसन् सर्वाणि भूतान्यन्यत्र तीर्थेभ्यः स खल्वेवं वर्तयन् यावदायुषं ब्रह्मलोकमभिसंपद्यते । " ( १५ खं. ) " आचार्यगृहीं वेदाचें अध्ययन करून, गुरूच्या आज्ञेनें अभिसमावर्तन करून, शुद्ध देशांत कुटुंबांत राहून, स्वाध्याय वेद नेहमीं पठण करीत, धर्मकृत्यें संपादीत, इंद्रियांचा आपल्या ठिकाणीं निरोध करीत व अन्यत्र तीर्थेभ्यः कोणतीही हिंसा न करतां, याप्रमाणें जोंपर्यंत आयुष्य आहे तोंपर्यंत जो वर्तेल तो ब्रह्मलोकास जाईल. " अशा प्रकारचें आयुष्य द्वारकेंत श्रीकृष्णानें घालविलें. त्यानें आपलें मध्यम वय कुटुंबाचें सौख्य अनुभवीत व गृहस्थाश्रमाचीं योग्य कर्तव्यें निरपेक्ष, निरभिमान व अहिंसावृत्तीनें बजावीत घालविलें. त्याच्या इतर सात स्त्रियांचीं नांवें सत्यभामा, नग्नजिताची कन्या नाग्नजिती सत्या, शिबि राजाची कन्या सुदत्ता, मद्रराजाची कन्या लक्ष्मणा, जांबवती, मित्रविंदा व कालिंदी अशीं होतीं. त्या सर्वांस त्यानें सारख्या प्रेमानें वागाविलें व त्या सर्वांस त्याजपासून अनेक पुत्र झाले. सत्यभामेला भानु, भीमरथ इत्यादि सहा पुत्र व भानुकन्या वगैरे चार मुली झाल्या. जांबवतीचा पुत्र प्रसिद्ध वीर सांब होता. याशिवाय मित्रविंद वगैरे आणखीही तिला पुत्र होते त्याच्या इतर स्त्रियांनाही पुत्र व कन्या झाल्या. याप्रमाणें संसार योग्य रीतीनें करीत श्रीकृष्णाचा काळ द्वारकेंत आनंदानें जाऊं लागला ( हरिवंश, वि०अ०६० व १०३ ).

श्रीकृष्णाच्या आठ स्त्रियांत रुक्मिणीच्या खालोखाल सत्यभामेवर त्याचें प्रेम असे. तिच्या लग्नाची हकीकत फारच मनोरम आहे. ती हकीकत म्हणजे स्यमंतक मण्याची कथा होय. या मण्यानें कोहिनूर हिऱ्याप्रमाणें मोठमोठ्या भल्यांची अब्रू घेतली; पण श्रीकृष्णाचें वर्तन या हकीकतींत तापलेल्या सोन्याप्रमाणें शुद्ध व प्रज्वलित असेंच आपल्यास दृष्टीस पडतें. सत्राजित् नांवाचा एक यादव सरदार द्वारकेंत रहात असे. त्यानें सूर्याची आराधना करून हा स्यमंतक मणि मिळविला होता. तो अत्यंत तेजस्वी असून

दररोज दोन भार सुवर्ण देत असे. अशा प्रकारचें राजरत्न आपल्याजवळ निदान आपला पिता द्वारकेचा राजा वसुदेव याच्या जवळ असावें असें वाटून श्रीकृष्णानें एकदां तो मणि सत्राजिताजवळ मागितला. बलानें तो हरण करावा असें श्रीकृष्णाच्या मनांत कधींही आलें नाहीं. " याच्ञा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ।" हा न्याय मनांत आणून त्यानें सत्राजिताजवळ याच्ञा केली; पण ती विफल झाली यांत नवल नाहीं. अशा प्रकारचें दिव्य रत्न कोण उगीच देईल ? असो. सत्राजिताचा सख्खा भाऊ प्रसेन एक दिवस तें रत्न गळ्यांत घालून शिकारीस गेला असतां त्यास सिंहानें ठार मारलें. त्या सिंहास अस्वलांचा राजा जांबवान् यानें ठार मारलें. तेव्हां तो मणि जांबवानानें नेला व आपल्या मुलाच्या गळ्यात बांधला. इकडे प्रसेन स्यमंतक मण्यासह नाहींसा झाला हें पाहून सत्राजिताच्या मनांत श्रीकृष्णाविषयीं शंका आली. मणि मागून मिळाला नाहीं म्हणून श्रीकृष्णानें हें पापकृत्य करविलें असें त्याने भर यादवसभेंत बोलून दाखविलें; तेव्हां श्रीकृष्णास फार वाईट वाटलें. आपल्यावर आलेला हा आरोप नाहींसा करण्यासाठीं तो तात्काळ उठला आणि हुशार माग काढणारे बरोबर घेऊन ऋक्षवान् पर्वताच्या अरण्यांत शिरला. प्रसेनाचा माग काढीत काढीत ते त्याच्या प्रेताशीं येऊन पोंचले. पुढें सिंहाचा माग काढता सिंहाचें प्रेत सांपडलें, तरी मणि सांपडला नाहीं. सिंहास अस्वलानें मारलें आहे असें पाहून त्याचा माग काढीत जांबवानाच्या गुहेपाशीं ते पोंचले. तेथें आपल्या लोकांस गुहेच्या तोंडावर ठेवून श्रीकृष्ण गुहेंत शिरला. तों त्यास तो मणि जांबवानाच्या मुलाच्या गळ्यात दृष्टीस पडला. जांबवानानें तो मणि सामोपचारानें दिला नाहीं, तेव्हां त्याचें व श्रीकृष्णाचें एकवीस दिवस युद्ध होऊन शेवटीं अजिंक्य जांबवानास श्रीकृष्णाने जिंकलें. जांबवानानें हा श्रीविष्णूचाच अवतार असला पाहिजे असें जाणून त्यास तो मणि अर्पण केला इतकेंच नव्हे, तर आपली कन्या जांबवती हीही त्यास दिली. याप्रमाणें मणि घेऊन जांबवतीसह श्रीकृष्ण द्वारकेस आला व सत्राजितास सर्व हकीकत सांगून यादवसभेंत सर्वांसमक्ष त्यानें त्यास तो मणि परत दिला. तेव्हां आपण श्रीकृष्णावर व्यर्थ आरोप आणला असें वाटून त्यानें तोंड खालीं घातलें. आपल्या दोषाचें परिमार्जन कसें करावें याजबद्दल त्यास चिंता पडली. शेवटीं त्यानें

श्रीकृष्णास आपली सुंदर कन्या सत्यभामा देऊन आपल्या दोषाचें प्रायश्चित्त घेतलें. तिच्या बरोबर स्यमंतक मणिही आंदण म्हणून तो श्रीकृष्णास देऊं लागला. परंतु श्रीकृष्णानें मण्याचा स्वीकार केला नाहीं. ज्याबद्दल मजवर एवढा आरोप आला तो मला नको असें सांगून त्यानें तो आपला सासरा सत्राजित् याजजवळच राहूं दिला ( हरिवंश, वि० अ० ३८ व भाग० अ० ५७ ).

पण स्यमंतक मण्याचें आख्यान एवढ्यानें संपलें नाहीं. श्रीकृष्णानें ह्या दिव्य मण्याच्या लोभास थोडेंसें तरी गुंतून तो सत्राजिताजवळ मागण्याची प्रथम जी चूक केली, त्या चुकीपासून होणारी अनर्थपरंपरा येथेंच थांबली नाहीं. श्रीकृष्णाचें लग्न सत्यभामेशीं झालें, पण या लग्नामुळें शतधन्वा नांवाच्या भोजसरदारास फार वाईट वाटलें. त्यानें सत्राजितापाशीं तिच्याबद्दल मागणी केली होती. आपली मागणी अव्हेरल्याबद्दल शतधन्वा सत्राजिताचा सूड घेण्यास तयार झाला. या कामांत त्यास अक्रूराची व कृतवर्म्याची सहानुभूति मिळाली. सत्राजितास मारून तो मणि त्याजपासून घ्यावा असा शतधन्व्यानें बेत केला व त्यास अक्रूरानें व कृतवर्म्यानें सहाय्य देण्याचें कबूल केलें. शतधन्व्यास आपला दुष्ट डाव साधण्याची संधि लवकरच मिळाली. श्रीकृष्णाचे आतेबंधु कुंतीचे पुत्र हस्तिनापुरांत द्रोणाच्या शिक्षणाखालीं अस्त्रविद्येंत तरबेज होत होते. मथुरेंतून पांडवांचा प्रथम समाचार श्रीकृष्णाने घेतला, तेव्हांपासून आज पंधरा सोळा वर्षांत आतेमामेभावांच्या भेटी द्वारकेत दोनतीनदां झाल्याही होत्या. सर्व शिष्य तयार झालेले पाहून द्रोणाचार्यानें एक मोठा रंग तयार करवून अंध धृतराष्ट्रास व भीष्म-कृप इत्यादि सरदारास त्यांच्या अस्त्रविद्येच्या शिक्षणाची परीक्षा दिली. त्या वेळीं भीम व अर्जुन यांचें दुर्योधनाशीं भांडण होऊन दुर्योधनास कर्णाचें सहाय्य मिळालें वगैरे हकीकत भारताच्या वाचकांस माहितिच आहे. चुलतबंधूंचें भांडण विकोपास जाऊं नये म्हणून धृतराष्ट्रानें पांडवांस व कुंतीस वारणावतास कांहीं दिवस पाठविलें, व तेथें ते ज्या राजवाड्यांत रहात होते तो वाडा आतून लाखेनें भरवून धृतराष्ट्रानें जाळवला व त्यांत कुंती व पांच पांडव जळून मेले अशी सर्वांची समजूत झाली. ही खबर द्वारकेंत पोंचली तेव्हां बळराम व श्रीकृष्ण दुःखानें ग्रस्त होऊन हस्तिनापुरास दुखवट्यासाठीं

गेले. कपटी धृतराष्ट्राबरोबर त्यांनीं पांडवांची व कुंतीची क्रिया करून त्यास तिलांजलिही दिल्या. इकडे मथुरेंत रामकृष्ण दोघेही नाहींत ही संधि साधून शतधन्व्यानें सत्राजिताचा खून केला, व त्याचा मणि हिरावून नेला. बिचारी सत्यभामा बापाच्या मरणाबद्दल आक्रोश करीत हस्तिनापुरास गेली, व श्रीकृष्णास तिनें तो मजकूर सांगितला. ती हकीकत ऐकून बलराम व श्रीकृष्ण हें एक आणखी दुःख ओढवलें असें म्हणत द्वारकेस आले. व शतधन्व्यास शिक्षा देण्यासाठीं ते त्याजवर धावले. परंतु तो दिवसांत शंभर योजनें जाणाऱ्या एका चपल घोडीवर बसून पळाला. त्यानें श्रीकृष्णाशीं सामना देण्यासाठीं अक्रूराजवळ व कृतवर्म्याजवळ साहाय्य मागितलें. पण रामकृष्णांशीं समोर कोण लढेल असें सांगून त्यांनीं तें आयत्या वेळीं नाकारलें. मात्र शतधन्व्यानें पळ काढण्यापूर्वी स्यमंतक मणि अक्रूराच्या पदरीं बांधला. असो. शतधन्व्याचा पाठलाग करीत रामकृष्ण निघाले ते त्यांनीं त्यास काशीजवळ गांठलें. शेंकडों कोस पळतां पळतां शतधन्व्याच्या खालची घोडी मरून पडली, तेव्हां तो पायींच धावूं लागला. श्रीकृष्णानेंही पादचारी होऊन त्याचा पाठलाग केला व शेवटीं त्यास गांठून त्यानें त्यास ठार मारिलें. याप्रमाणें श्रीकृष्णानें शतधन्व्यास त्याच्या घोर पापाबद्दल देहान्त प्रायश्चित दिलें. पण त्याच्याजवळ स्यमंतक मणि सांपडला नाहीं. श्रीकृष्ण बलरामाजवळ येऊन त्यास ही हकीकत सांगूं लागला, तेव्हां बलरामदादा त्याजवर विनाकारण रागावले. " स्यमंतक मणि तुझ्या मनांतून गिळंकृत करावयाचा आहे. बरें आहे. मी स्यमंतक मणि पाहिल्याशिवाय द्वारकेचें तोंड पाहणार नाहीं. " असें म्हणून बलरामदादा मिथिला नगरींत शिरले. तेव्हां श्रीकृष्णास दुःखानें द्वारकेस एकटेंच परत यावें लागलें. मिथिलेच्या राजानें बलरामास सत्कारानें ठेवून घेतलें; इतकेंच नव्हे तर दुर्योधनानें ही भावाभावांची दुही साधून बलरामापासून गदायुद्धाची कला या वेळीं संपादन केली. इकडे श्रीकृष्णास बलरामावांचून द्वारकेंत चैन पडेना. स्यमंतक मणि कोणाजवळ असावा याचा त्यानें बारकाईनें शोध चालविला. अक्रूराजवळ तो मणि होता. त्यास रोज सुवर्ण मिळत होतें. त्याचा त्यानें नेहमीं दानधर्म करावा किंवा तो पैसा त्यानें यज्ञांत लावावा. त्याप्रमाणें अक्रूरानें अतोनात धर्म सुरू केला, तेव्हां त्यास पूर्वी लोक दानपति म्हणतच होते,

ते आता यज्ञपति म्हणूं लागले. अक्रूराजवळ इतकें द्रव्य कोठून येतें, याचा श्रीकृष्ण विचार करूं लागला, तेव्हां त्याजवळ स्यमंतक मणि असावा असा त्यास संशय आला व तो त्यानें सभेंत बोलूनही दाखविला. तेव्हां श्रीकृष्ण आपल्यावर चाल करील हें मनात येऊन अक्रूर पळून काशीस आपल्या मामाकडे गेला. अक्रूराचा बाप श्वफल्क यास काशीराजानें गांदिनी नांवाची आपली कन्या दिली होती, तिच्यापासून अक्रूर व आणखी पुष्कळ मुलगे त्यास झाले होते. अक्रूर स्यमंतक मण्यासह काशीस गेला तेव्हां काशींत पर्जन्य पडून दुष्काळ नाहींसा झाला, व सर्व प्रकारचें सुख तेथें नांदूं लागलें. इकडे द्वारकेकडे पर्जन्य कमी होऊन दुष्काळ पडूं लागला. तेव्हां श्रीकृष्णास आणखी दुःख झालें. वास्तविक पाहतां स्यमंतक मण्यावर त्याच्यापासून झालेल्या सत्यभामेच्या मुलाचा हक्क होता.तो हक्क बजावण्यासाठीं अक्रूरावर स्वारी करून त्याजपासून तो मणि हिरावून घेण्याचें त्यास सामर्थ्यही होतें. पण घरांतील विरोधापासून होणारी दुही टाळण्यासाठीं त्यानें स्वार्थाचाही त्याग करून स्यमंतक मण्यावरचा आपल्या मुलाचा हक्क सोडला. ' यादवसभेंत स्यमंतक मणि दाखव म्हणजे बलरामाचें समाधान होईल, मग तो मणि तूं आपल्याजवळच ठेव, ' असें अक्रूरास सांगून पाठवून त्यानें त्याचें समाधान केलें. मग अक्रूर व बलराम दोघेही द्वारकेंत येऊन, सर्वांसमक्ष अक्रूरानें तो मणि सभेंत बाहेर काढला व श्रीकृष्णानें कबूल केल्याप्रमाणें तो मणि अक्रूरासच दिला. असो; असें हें विलक्षण रत्न भल्याभल्यांची अब्रू घेऊन शेवटीं दानशूर अक्रूराजवळच राहिलें ( हरिवंश, वि० अ० ३९ ).

स्यमंतक मण्याच्या भानगडींत श्रीकृष्णास जांबवती व सत्यभामा या दोन स्त्रिया मिळाल्या. त्याची चौथी स्त्री नाग्नजिती सत्या ही कोसल देशाच्या नग्नजित् राजाची मुलगी असून ती वीर्यशुल्का होती; म्हणजे जो कोणी सात मस्त बैल बांधील त्यास ती द्यावयाची असा तिच्या बापानें पण लावला होता. तो पण कोणास जिंकतां येत नाहीं, हें ऐकून श्रीकृष्णानें तो पण आपल्या सामर्थ्यानें जिंकला, तेव्हां नग्नजितानें त्यास आपली मुलगी आनंदानें दिली. त्याची पांचवी स्त्री मित्रविंदा ही अवंतीच्या राजाची मुलगी असून ती श्रीकृष्णाची आतेबहीणच होती. तिचे बंधु प्रसिद्ध विंद आणि अनुविंद हे दुर्योधनाच्या पक्षाचे होते. मित्रविंदेनें श्रीकृष्णास स्वयंवरांत वरलें,

तेव्हां श्रीकृष्णानें विंदानुविंदास जिंकून तिला आणिलें. त्याची सहावी स्त्री प्रत्यक्ष कालिंदी म्हणजे मनुष्यरूप धारण करणारी यमुनाच होती. त्याची सातवी स्त्री लक्ष्मणा ही मद्रराजाची मुलगी असून तिनें श्रीकृष्णास स्वयंवरांत वरलें होतें. आठवी स्त्री शैब्या अथवा कैकयी हीही त्याच्या आत्येची मुलगी असून केकयराजानें तिला श्रीकृष्णाला प्रेमानें अर्पण केलें. याप्रमाणें श्रीकृष्णाच्या आठ मुख्य स्त्रिया अथवा महिषी होत्या ( भागवत, द० अ० ५८ ).

याशिवाय त्यास सोळा हजार एकशें उपस्त्रिया होत्या, असें वर्णन आहे. ही संख्या केवळ अनेक एवढ्याच अर्थाची द्योतक आहे हें उघड आहे. या सर्व स्त्रिया त्यास एके ठिकाणीं व एका पराक्रमानें मिळाल्या या गोष्टीवरूनही हीच गोष्ट सिद्ध होते. प्राग्जोतिषाचा म्हणजे आसामाचा राजा नरकासुर राक्षस महादुष्ट व उन्मत्त होता. त्याने सर्व पृथ्वीवरच्या गंधर्वअप्सरांच्या, राक्षसांच्या व मनुष्यांच्या सुंदर सुंदर मुली हरण करून एका पर्वतावर कैदेंत ठेविल्या होत्या. रावणानें जशा तिन्ही लोकातील एक हजार सुंदर स्त्रिया हरण करून आपल्या अंतःपुरांत टाकिल्या होत्या, किंवा मेक्सिको देशाचा नरमांसभक्षक ऐतिहासिक राजा माटेझूमा यानें, धाय धाय रडणाऱ्या आईबापांपासून एक हजार तरुण मुली बलात्कारानें हरण करून आपल्या जनानखान्यांत अडकाविल्या होत्या, त्याचप्रमाणें या नरकासुरानें नानादेशांच्या व नानाजातींच्या मुली हरण करून आपल्या राज्यांत जमा केल्या होत्या. त्या गरीब मुलींस सोडविण्याचा श्रीकृष्णानें विचार केला. इतक्यांत नरकासुरानें अदितीचीं कुंडलें बलात्कारानें हरण केलीं आहेत असें त्यास इंद्रानें कळविल्यावरून त्यानें नरकासुराचें पारिपत्य करण्याचा निश्चय केला. सत्यभामेस बरोबर घेऊन त्यानें प्राग्ज्योतिषावर स्वारी केली. मुरु, निसुंद, हयग्रीव इत्यादि नरकासुराच्या सेनापतींस ठार मारून शेवटीं नरकासुराचाही त्यानें युद्धांत वध केला. नंतर त्या सर्व मुलींस त्यानें कैदेंतून सोडविलें, तेव्हां त्यांनीं आपण होऊन श्रीकृष्णास मनोभावानें वरिलें. नरकासुरानें त्रिभुवनांतील रत्नेंही बलात्कारानें हरण केलीं होतीं. तींही श्रीकृष्णानें हस्तगत केलीं. पांढऱ्या रंगाचे व चार दातांचे हत्ती येथें मिळाले, त्यांसह त्या सर्व कन्यांस व रत्नांच्या संपत्तीस त्यानें द्वारकेस पाठविलें. नरकासुराची आई भूमि हिच्या विनंतीवरून त्याच्या भगदत्त नांवाच्या पुत्रास

अभय देऊन व तेथील गादीवर बसवून नंतर श्रीकृष्ण अदितीचीं कुंडलें घेऊन स्वर्गास गेला व तेथें अदितीस तीं कुंडलें त्यानें परत दिलीं, तेव्हां अदितीस फारच आनंद झाला. तिनें श्रीकृष्णाच्या इंद्रतुल्य पराक्रमाची तारीफ करून त्यास व सत्यभामेस आशीर्वाद दिला. असो. अदितीची व इंद्राचीही भेट घेऊन श्रीकृष्ण स्वर्गातून निघाला, तेव्हां पारिजाताचा एक वृक्ष नंदनवनांतून उपटून त्यानें आपल्या बरोबर घेतला आणि तो द्वारकेंत आणून सत्यभामेच्या मंदिरांत लावला (हरिवंश, वि० अ० ६३ व ६४).

श्रीकृष्ण लढाईतून सुरक्षित परत येवो असा नवस करून पतिपरायणा रुक्मिणी इतके दिवस उपवास करीत होती तें ऐकून श्रीकृष्णास अतिशय प्रेमपूर्ण समाधान वाटलें. त्यानें रुक्मिणीच्या उपवासाचें पारणें मोठ्या थाटानें फेडलें. रैवत पर्वतावर सर्व लहानथोर आप्तांस व सच्छील वेदविद् ब्राह्मणांस बोलावून श्रीकृष्णानें पारण्याचा मोठा उत्सव केला, व प्राग्ज्योतिषाहून आणलेल्या संपत्तीपैकीं दिव्यदिव्य रत्नें सर्वांस देऊन आभारी केलें. रुक्मिणीनें केलेल्या व्रताच्या पारण्याचा हा अद्वितीय समारंभ पाहून सत्यभामेस ईर्ष्या उत्पन्न झाली. तिनें नारदाच्या सांगण्यावरून पुण्यक नांवाचें व्रत केलें. या पुण्यक व्रताचा विधि त्यांनींच तिला सांगितला. त्याप्रमाणें तिनें स्नान--उपवास इत्यादि विधि करून व महेश्वराचें पूजन करून पारण्याच्या दिवशीं नारदास पक्वान्नांनीं जेवू घातलें. नंतर पारिजात वृक्षाशीं श्रीकृष्णास सुतानें बांधून तो वृक्ष श्रीकृष्णास नारदास तिनें दान केला. मग नारदांनीं थट्टेनें म्हटले, "श्रीकृष्णा, तूं आतां माझा आहेस, मला वाटेल त्या ठिकाणीं मी नेईन; तूं माझ्याबरोबर चल." असें म्हणून थट्टेखोर नारद श्रीकृष्णास घेऊन जाऊं लागले, तेव्हां सत्यभामेचा जीव कंठांत आला. थोडीशी मौज करून शेवटीं नारद म्हणाले, "बरें तर श्रीकृष्णा, मी तुझा मोबदला घेऊन तुला सत्यभामेसच देतों." मग एका सवत्स कपिला गायीचें उदक भामेकडून सोडवून नारदांनीं श्रीकृष्णास तिच्या स्वाधीन केलें. त्या वेळीं तिनें आनंदातिशयानें अनेक सुवर्णराशि ब्राह्मणांस दिल्या. याप्रमाणें सत्यभामेकडून पुण्यक व्रत करवून व सर्व द्वारकेस पारिजाताच्या पुष्पांचा व मधुर सुवासाचा एक वर्षपर्यंत लाभ देऊन श्रीकृष्णानें तो वृक्ष नारदा-

बरोबर स्वर्गलोकीं परत पाठवून दिला* ( हरिवंश, वि० अ० ६५ व ७२ ).

श्रीकृष्णाच्या परत येण्याचा आनंद सर्वांस अतिशय वाटला. याचें एक कारण त्याच्या पश्चात् झालेली द्वारकेची दुर्दशा हें होय. श्रीकृष्ण द्वारकेंत नाहीं ही संधि साधून शिशुपालानें आपला अनेक दिवसांचा रोष द्वारकेवर काढला. त्यानें द्वारकेवर चाल करून ती हस्तगत करण्याचा यत्न केला, परंतु तो सफळ झाला नाहीं. परंतु त्यानें जातां जातां द्वारकेस आग लावून दिली. त्यानें टाकलेल्या अग्नीमुळें द्वारकेचा बराच भाग जळून गेला. श्रीकृष्णानें परत आल्यावर आपण निराश न होतां. द्वारकेची पुनर्रचना अधिक विस्तृत रीतीनें व वैभवानें केली. प्रत्यक्ष विश्वकर्म्याचें सहाय्य घेऊन त्यानें द्वारकेस या वेळीं वैकुंठाप्रमाणें बनविलें. सभोंवतीं अत्यंत सुंदर बगीचे निर्माण केले. सर्व शहराच्या आंत चार उभ्या व चार आडव्या अशा विस्तीर्ण रस्त्यांची आंखणी करून सोळा मोठमोठाले चौक पाडले व ते सर्व तऱ्हेनें सुशोभित केले. मोठमोठाले प्रासाद नवीन निर्माण करून त्यांस सुवर्ण, मौक्तिक, वैडूर्य, स्फटिक इत्यादि रत्नांनीं सुशोभित केले. सोन्याच्या कळसांनीं सुशोभित केलेलीं त्यांचीं शिखरें मेरूच्या शिखराप्रमाणें दिसूं लागलीं. श्रीकृष्णानें आपल्यासाठीं एका चार योजन लांब रुंद अशा जागेंत धनाढ्य प्रासाद बांधविला. त्यांत तरतीं उपवनें, कृत्रिम क्रीडापर्वत व रत्नखचित पायऱ्यांच्या पुष्करणी अनेक होत्या. त्याच्या अष्टनायिकांस राहण्याकरितां त्यांत निरनिराळे प्रासाद होते. ब्राह्मणांच्या सत्काराकरितां व पूजेकरितां एक स्वतंत्र दिव्यसभा होती. त्यांतील बागेंत सर्व ऋतूंत येणारीं सुवासिक फुलें व स्वादिष्ट फळें लागलेलीं झाडें असून त्यांजवर नानाप्रकारचे मधुर शब्द करणारे पक्षी होते. याप्रमाणें आपल्याकरितां नवीन मंदिर बांधवून त्यानें त्या वाड्यांत आपल्या मुलाबाळांसह व स्त्रियांसह प्रवेश केला. नरकासुरानें बंदींत टाकलेल्या स्त्रिया बंधमुक्त करून आणल्या होत्या, त्यांस रहावयास आपल्या वाड्यांत त्यानें एक उत्तम जागा दिली व त्यांस वस्त्रा-

*रुक्मिणीच्या व सत्यभामेच्या सवतीमत्सराच्या अनेक ग्राम्य कथा नाटककारांनीं व कथेकऱ्यांनीं या पायावर बनविल्या आहेत, त्या अर्थात् त्याज्य आहेत हें सांगणें नको.

लंकारांनीं व दासदासींनीं संतुष्ट करून आपल्या ज्ञातिबांधवांच्या परवानगीनें त्यांशीं विवाह केला. वसुदेव, देवकी, रोहिणी, आहुक व रेवती यांनींही त्या स्त्रियांचा चांगला सत्कार केला. असो. श्रीकृष्णाच्या सर्व स्त्रियांत सत्यभामा ही श्रेष्ठ भाग्याची होती, पण रुक्मिणी ही सद्गुणसंपन्न ज्येष्ठपत्नी असून घराची मालकीण होती ( हरिवंश, वि० अ० ९८–९९ ).

* पुरुषयज्ञ कल्पिला तर त्याचीं प्रथमचीं चोवीस वर्षें प्रातःसवन होत; व पुढचीं चव्वेचाळीस वर्षें माध्यंदिनसवन होतं. चोवीस वर्षें म्हणजे आपला प्रातःकाळ असें जो समजेल व पुढची चव्वेचाळीस वर्षें माध्यंदिनसवन् समजून योग्य रीतीनें घालवील त्याचा सायंकाळ आणखी अठ्ठेचाळीस वर्षें जाईल यांत संशय नाहीं. पंचविसाव्या वर्षी लग्न करणाऱ्यांनीं, पुढचीं चव्वेचाळीस वर्षें गृहस्थाश्रमांत नियमानें राहून आनंदानें काढावींत. या मध्यवयाच्या चव्वेचाळीस वर्षांपैकीं पहिला भाग ऐन तारुण्याचा असतो. ऐन तारुण्यांत यथायोग्य रीतीनें संसारसुखाचा अनुभव घेणें हें वावगें नाहीं, इतकेंच नव्हे तर श्रेयस्कर आहे. यथाशास्त्र वर्तन करून व यथान्याय द्रव्य मिळवून गृहस्थाश्रमाचा उपभोग घेणें हें मोक्षप्रदही आहे. कारण या दोन अटीच तलवारीच्या धारेप्रमाणें कठिण आहेत. शास्त्रानुसार वागण्यास व न्यायानें द्रव्यार्जन करण्यास, जितका मनोनिग्रह इतर आश्रमांस जरूर आहे, तितकाच गृहस्थाश्रमास जरूर आहे; आणि म्हणूनच गृहस्थाश्रम इतर आश्रमांइतकाच वंद्य आहे. किंबहुना इतरांहून तो श्रेष्ठ आहे; कारण या आश्रमांत इतरांचा परामर्श घेतां येतो व स्वतः सुख भोगून इतरांस देतां येतें. असो. श्रीकृष्णानें द्वारकेंत उत्तम रीतीनें गृहस्थाश्रम पाळून सर्वांस सुखी केलें. आपल्या स्त्रियांचे सर्व मनोरथ पूर्ण करून त्यांजकडून नानाप्रकारचीं व्रतें करविलीं मधून मधून त्यांस राग आणून कांहींसें चिडवावें, नंतर आपणच त्यांचा कोप शांत करावा. खरें प्रेम करणाऱ्या

* "पुरुषो वाव यज्ञस्तस्य यानि चतुर्विंशति वर्षाणि तत्प्रातःसवनं चतुर्विंशत्यक्षरा गायत्री गायत्रं प्रातःसवनम्। अथ यानि चतुश्चत्वारिंशद्वर्षाणि तन्माध्यंदिनꣳसवनं चतुश्चत्वारिꣳशदक्षरा त्रिष्टुप् त्रैष्टुभं माध्यंदिनꣳसवनम् । अथ यान्यष्टाचत्वारिंशद्वर्षाणि तत्तृतीयꣳसवनं अष्टाचत्वारिꣳशदक्षरा जगती जागतं तृतीयꣳ सवनम्।" ( छां० प्रपा० २ खं० १६ ).

स्वस्त्रीशीं नर्म भाषणें करीत दिवसाचा कांहीं काळ घालविणें हाच गृहस्थाश्रमांत परम लाभ आहे. श्रीकृष्णानें स्त्रियांकडूनच व्रतें करविलीं नाहींत, तर स्वतःही त्यांच्याकरितां व्रतें व तपें केलीं. जांबवतीस पुत्र होत नव्हता, तेव्हां श्रीकृष्णानें तिच्याकरितां हिमालयावर जाऊन एक वर्ष तपश्चर्या करून महादेवास प्रसन्न केलें. तिजला पुत्र होऊन त्याचें नांव सांब ठेवले. श्रीकृष्णानें आपल्या स्त्रियांस जसें सुख दिलें तसेंच त्यानें आपल्या आप्तांसही दिलें. वसुदेवाकडून त्यानें नानाप्रकारचे अश्वमेधासहित यज्ञ कराविले व ब्राह्मणांस इष्टभोजनें व दक्षिणा दिल्या. आपल्या भावाबंदांस व त्यांच्या मुलांस वैभवास चढवून त्यांस यथायोग्य अधिकार दिले. याशिवाय प्रत्येक उत्सव त्यानें बांधवांसह थाटानें साजरा करावा. कित्येक वर्षांनीं समुद्रयात्रा आली. तेव्हां श्रीकृष्णाच्या आज्ञेने सर्व यादवांनीं स्त्रियांसह समुद्रावर जाऊन जलक्रीडा केली. स्त्रियांनीं कमरइतक्या खोल पाण्यांत पोहून आपल्या पतीवर पाणी उडाविलें. सायंकाळीं उत्तम उत्तम पक्वान्नांचीं भोजनें समुद्रतीरीं केलीं व रात्रौ गाणें करून अप्सरांचें नृत्य कराविलें. श्रीकृष्णास व बलरामास लहानपणापासून गाण्याचा छंद होता; त्यांनीं या वेळीं अप्रतिम छालिक्य गान यादवांना शिकविलें. या गाण्यांत सर्वांनीं मिळून गावयाचें असतें. श्रीकृष्ण, बलराम, प्रद्युम्न, सांब इत्यादि यादव वीर या गाण्यांत प्रवीण असत. छालिक्यांत सर्व गानविद्या अंतर्भूत होत होती. हें छालिक्य गान स्वबुद्धीनें जाणून श्रीकृष्णानें यादवांना साध्य करून दिलें होतें. त्या छालिक्य गानानें त्या दोघां यादवांनीं सर्वांस तल्लीन करून सोडलें. याप्रमाणें गृहस्थाश्रमाचा योग्य उपभोग घेत श्रीकृष्णाचीं मध्यवयाच्या पूर्वार्धाचीं वर्षें द्वारकेंत आनंदानें गेलीं ( हरिवंश, वि० अ० ८९ ).

द्रौपदीचा स्वयंवर मांडला, त्या वेळेस श्रीकृष्णाचें वय ४५–४६ वर्षांचें होतें. या स्वयंवरास द्रुपदाकडून यादवांस निमंत्रण आल्यावरून श्रीकृष्ण आपल्या पुत्रांस घेऊन स्वयंवरास गेला. त्याचा ज्येष्ठ पुत्र प्रद्युम्न हा या वेळीं एकवीस बावीस वर्षांचा असून पराक्रमी व सुंदर होता. त्याजला द्रौपदी मिळाल्यास पहावी या उद्देशानें श्रीकृष्ण पांचाल देशाच्या कांपिल्य नगरास गेला. या वेळेस पांडव जिवंत असते तर द्रौपदीस अर्जुनच वर योग्य होता असें त्यांस वाटून खेदही झाला. त्याबरोबर आणखी यादववीर

स्वयंवर पाहण्यास व आपल्या पराक्रमाची परीक्षा देण्यास निघाले. बलराम आपल्या दोघां पुत्रांसह ( निशठ आणि उल्मुक ) बरोबर होता. बल-रामानंतर रोहिणीच्या पोटीं वसुदेवास सारण इत्यादि आणखी पुत्र झाले होते तेही बरोबर होते. देवकीला श्रीकृष्णाच्या पाठीवर एक गद नांवाचा पुत्र झाला होता तोही होता. या गदावरून श्रीकृष्णास गदाग्रज म्हणत. याशिवाय अक्रूर, सात्यकि, उद्धव, कृतवर्मा, पृथु, विपृथु, कंक, शंकु, विदू-रथ इत्यादि यादव-भोज वीर स्वयंवरास गेले होते. या स्वयंवरास भरतखंडातील बहुतेक मोठमोठे राजे आले होते. भारतीय युद्धाच्या वेळीं हजर असलेले बहुतेक राजे द्रौपदीस्वयंवरास हजर होते. दुर्योधन आपल्या बंधूंसह व कर्णासह आला होता. गांधार देशाचे शकुनि, सौबल, बृहद्बल इत्यादि राजे होते. तसेंच पंचनदांतील मणिमान्, दंडधार, सहदेव, जय-त्सेन, व मेघसंधि होते. विराट देशाचा राजा शंख आला होता. वार्धक्षेमि, सुशर्मा, सेनाबिंदु, अंशुमान्, चेकितान, जरासंध, विदंड, पौंड्रक, वासुदेव, भगदत्त, मद्रराज, शल्य, रुक्मांगद, रुक्मरथ, सोमदत्त, भूरि, भूरिश्रवा आणि शल, कांबोजचा सुदक्षिण, दृढधन्वा, पौरव, बृहद्बल, सुषेण, शिबि, औशीनर, भगीरथ, बृहत्क्षत्र, सैंधव, जयद्रथ, बृहद्रथ, बाल्हिक, उलूक, कैतव, चित्रांगद, वत्सराज, मतिमान्, चेदिपति, शिशुपाल इत्यादि राजे द्रौपदीच्या सौंदर्याची कीर्ति ऐकून ह्या समारंभास आले होते. पण द्रुप-दानें मांडलेला पण कोणाही क्षत्रियास जिंकतां आला नाहीं. श्रीकृष्ण व सात्यकि, समर्थ असून उठले नाहींत. कर्ण उठला, पण तो अधिरथि सूत असून पक्का क्षत्रिय नसल्यामुळे द्रौपदीनें त्यास धनुष्यास हात लावूं दिला नाहीं. शेवटीं ब्राह्मणवेषानें आलेल्या अर्जुनाने पण जिंकला आणि द्रौपदीनें त्यास आनंदाने माळ घातली. अर्जुनास पाहतांच श्रीकृष्णानें त्यास ओळ-खिलें. पांची पांडव जिवंत आहेत हें पाहून त्यांस पराकाष्ठेचा आनंद झाला अर्जुन द्रौपदीला घेऊन आपल्या भावासह गरीब स्थितींतल्या आपल्या बिऱ्हाडीं आला, तेव्हां पाठोपाठ श्रीकृष्णही तेथें गेला, व त्यानें पृथेच्या पायांवर डोकें ठेविलें. पांडवांचें समाधान करून द्रौपदीस आपली बहीण मानिलें. याप्रमाणें हकीकत झाली, तेव्हां वारणावतांत पांडव व कुंती जळाली नसून सुरक्षित आहेत, ही बातमी चोंहीकडे तात्काळ पसरली. द्रुपदासही

आपणास हवे होते तेंच जांवई मिळाल्यानें मोठा आनंद झाला. कांपिल्य-पुरास पांची पांडवांचीं एका द्रौपदीशीं लग्नें थाटानें झालीं; तेव्हां श्रीकृष्ण व बलराम यांनीं आपल्या वैभवानुरूप आपल्या आतेभावांस अहेर व देणग्या दिल्या ( भारत, आ० अ० १८६, १८९, १९९ ).

पांडव जिवंत असून त्यांस द्रुपदाची कन्या मिळाली व श्रीकृष्ण—बल-रामांनीं त्यांचा यथायोग्य सत्कार केला, ही बातमी अंध धृतराष्ट्रास समजली. तेव्हां त्या लोभी आंधळ्याचें धाबें दणाणलें. बहुधा यादव व पांचाळ यांचें साहाय्य घेऊन पांडव आपला हक्क मागण्याकरितां कुरुदेशावर चाल करून येतील अशी त्यांस धास्ती पडली. किंबहुना आपण त्यांस कपटानें कसें जाळलें याचाही परिस्फोट होईल असें त्यास वाटलें. शेवटीं दुसरें कपटनाटक करून पांडव जिवंत असल्याबद्दल त्यानें मोठा आनंद प्रदर्शित केला. विदु-रास पाठवून पांडवांस व कुंतीस श्रीकृष्णासह त्यानें प्रेमानें हस्तिनापुरास नेलें. " सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः । " या न्यायानें त्यानें पांडवांस व दुर्योधनास समजावून पांडवांस अर्धें राज्य दिलें. त्यांतही त्या लोभी म्हाताऱ्यानें यमुनेकडचा जंगलांनीं भरलेला मुलूख पांडवांस देऊन हस्तिना-पूरचा गंगेकांठचा मुलूख आपल्यास म्हणजे आपला पुत्र दुर्योधन यास ठेविला. पांडवांनीं शांततापिय होऊन तेंही कबूल करून पश्चिम कुरूंचें राज्य यमु-नेच्या कांठीं स्थापिलें. श्रीकृष्णाच्या सल्ल्याने यमुनेच्या कांठीं मूळच्या खांडव-प्रस्थ गांवाशेजारींच इंद्रप्रस्थ नांवाचें नवीन शहर वसवून त्या राजधानींत पांडव नीतीनें व पराक्रमानें राज्य करूं लागले. तेव्हां थोड्याच दिवसांत पांडवांचें राज्य भरभराटीस आलें. याप्रमाणें पांडवांची म्हणजे आपल्या आते-भावांची व्यवस्था लावून श्रीकृष्ण द्वारकेस परत आला. श्रीकृष्णाविषयींचें पांडवांचें प्रेम या दिवसापासून वाढतच गेलें. श्रीकृष्णाचा अद्भुत पराक्रम, त्याची लोकोत्तर बुद्धिमत्ता, त्याचें अप्रतिम सौंदर्य इत्यादि गुणामुळें त्याज-वर लोकांची देवनिर्विशेष भक्ति जडलीच होती. हा प्रत्यक्ष श्रीविष्णूचा अवतार आहे असें लोक मानीत. त्याप्रमाणें पांडवही मानूं लागले यांत नवल नाहीं. त्यांतल्यात्यांत अर्जुनाचें श्रीकृष्णाशीं अधिक सख्य जडलें. रंगानें काळासांवळा, रूपानें मनोहर व पराक्रमाने इंद्रासमान अशा त्या अर्जुनाचें सहजच श्रीकृष्णाशीं सख्य व प्रेम जुळलें. त्यांची जोडी म्हणजे

नरनारायणाची जोडी होती. अर्जुन श्रीकृष्णाचा प्रत्येक बाबतींत शिष्य झाला. इतर पांडवांचेंही प्रेम श्रीकृष्णावर कमी नव्हतें. धर्मराज तर राज्याच्या प्रत्येक बाबतींत त्याचा सल्ला घेऊं लागला. पण सर्वांहून अधिक भक्ति श्रीकृष्णावर द्रौपदीची जडली. स्वयंवर झाल्या दिवशींच तिला त्यानें बहीण म्हटलें तें त्याचें प्रेम तिच्या गुणांनीं व भक्तीनें दिवसेंदिवस वाढतच गेलें. सारांश, पांडवांच्या कुटुंबांत श्रीकृष्णाची भक्ति कायम झाली ती परस्परांच्या निर्व्याज आचरणानें शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वाढत गेली ( भारत, आ० अ० २००–२०७ ).

द्रौपदीस्वयंवराचे वेळीं अर्जुनाचें वय २६–२७ वर्षांचें असावें. त्यानंतर दोन वर्षांनीं इंद्रप्रस्थाची स्थापना झाली, म्हणजे इ० स० पूर्वी ३१४० वे वर्षी हें अर्वाचीन कालांतही प्रख्यात असलेलें शहर स्थापन झालें. इंद्रप्रस्थांत पाच पांडव आपल्या एका प्रिय भार्येसह आनंदानें राज्य करीत असतां एके प्रसंगीं अर्जुनास पाचां नवऱ्यानीं आपसात ठरविलेला नियम ब्राह्मण–कार्याकरिता दुर्दैवानें मोडावा लागला, व त्यास धर्मराज व द्रौपदी एकांतांत बसले असतां तेथें जावें लागलें. त्यामुळें ठरलेल्या प्रायश्चित्तानुरूप अर्जुन बारा वर्षांच्या तीर्थयात्रेस गेला. तीर्थयात्रेस जातांना त्याचें वय सरासरी ३६ वर्षांचे असावें. तीर्थयात्रा संपतां संपतां अर्जुन द्वारकेस आला. द्वारकेजवळच सोमनाथाचें व प्रभासपट्टणाचे प्रसिद्ध तीर्थ होते. तेथील यात्रा करून अर्जुन द्वारकेस श्रीकृष्णास भेटण्यास आला, तेव्हा त्याच्या सन्मानाकरिता श्रीकृष्णानें रैवत पर्वतावर मोठा उत्सव केला. या उत्सवांत सुभद्रा अर्जुनाच्या दृष्टीस पडली. सुभद्रा ही रोहिणीची शेवटची मुलगी असून बलरामाची सख्खी बहीण व श्रीकृष्णाची सावत्र बहीण होती. तिचें वय या वेळीं सरासरी सोळा सतरा वर्षांचें असावें. तिला दुर्योधनास देण्याविषयीं बलरामाचा बेत चालला होता. तिचें रूप पाहताच अर्जुन मोहित झाला. त्याची भाळावलेली वृत्ति पाहून श्रीकृष्णानें त्यास सुभद्रेस बलात्कारानें हरण करून नेण्याची सल्ला दिली. अर्जुनावर श्रीकृष्णाचें अत्यंत प्रेम असून त्यास सुभद्रा मिळाल्यास फारच उत्तम होईल असें त्यास वाटलें. पण बलरामदादा ऐकतील किंवा नाहीं याचा भरंवसा नव्हता. शिवाय सुभद्रेचें मन कोणास पसंत करील–दुर्योधनास किंवा अर्जुनास–

याचाही त्यास अदमास होईना. कारण दुर्योधन स्वतः राजा असून अर्जुन फक्त राजाचा भाऊ होता. असो. एकंदर विचार करून श्रीकृष्णानें अर्जुनास सुभद्रेचें हरण करण्याविषयीं सल्ला दिली. त्याप्रमाणें त्यानें मृगयेस जाण्याचें निमित्त केलें, व तात्काळ तिचें हरण केलें. तिला रथांत घालून त्यानें स्वदेशाकडे चालविलें. बलरामास सुभद्रा नेल्याची हकीकत कळली तेव्हां सर्व यादवसैन्यास निघण्याविषयीं त्यानें आज्ञा केली; पण श्रीकृष्ण बरोबर निघेना, तेव्हां त्यास खरें इंगित कळलें. शेवटीं बलरामानें सुभद्रेसह अर्जुनास सामोपचारानें परतवून द्वारकेस त्यांचा विवाह मोठ्या थाटानें लाविला. या विवाहानें अर्जुनाचा व श्रीकृष्णाचा संबंध आणखी दृढ झाला. आतेभाऊ, प्रिय शिष्य, मानलेला मेहुणा व प्रत्यक्ष मेहुणा अशीं चार नातीं एके ठिकाणीं झालीं ( भारत, आ० २१९–२२० ).

श्रीकृष्णाचा व दुर्योधनाचा संबंध असा जुळणार होता, तो जरी जुळला नाहीं तरी अन्य रीतीनें त्याचें व दुर्योधनाचें नातें लवकरच जुळलें. श्रीकृष्णाच्या प्रथम पुत्राचा म्हणजे प्रद्युम्नाचा विवाह रुक्मीच्या मुलीशीं स्वयंवरानें झाला हें पूर्वी सांगितलेंच आहे. श्रीकृष्णाचा जांबवतीच्या पोटीं झालेला पुत्र सांब हाही मोठा पराक्रमी असून बलरामाच्या शिक्षणाखालीं शस्त्रविद्येंत तयार झाला होता. त्यानें हस्तिनापुरास जाऊन दुर्योधनाची स्वयंवरास योग्य झालेली कन्या लक्ष्मणा हरण केली. तेव्हां दुर्योधनास राग येऊन त्यानें व त्याच्या कर्ण वगैरे अनुयायांनीं सांबास जिंकून व पकडून अटकेंत ठेविलें. ही गोष्ट द्वारकेस कळली, तेव्हां बलरामदादा श्रीकृष्णाकरितां धांवले. दुर्योधन आपला शिष्य आहे, तो आपलें वचन मान्य करून लक्ष्मणा सांबासच देईल अशी त्यास खात्री होती. बलराम येतांच सर्व कौरवांनीं त्याचा सत्कार करून त्यास सभेंत बसविलें व त्याची मधुपर्कानें पूजा केली; पण त्यानें जेव्हां लग्नाची गोष्ट काढली तेव्हां मानी दुर्योधनानें ती मनावर घेतली नाहीं. " यादव म्हणजे गवळी, राज्याचे अधिकारी नव्हत; चामर, व्यजन, शंख, श्वेत छत्र, किरीट, सिंहासन आणि शय्या हीं राजचिन्हें केवळ आमच्या उपेक्षेनें ते वापरतात.* त्यांस आम्ही

*चामरव्यजने शंखमातपत्रं च पांडुरम् । किरीटमासनं शय्यां भुंजंत्यस्मदुपेक्षया ॥ भा० द० ६८।२६

आपली मुलगी देणार नाहीं. पृथा आपल्या कुळांत घेतली म्हणून काय जोडा डोक्यावर येऊन बसेल ? " इत्यादि निर्भर्त्सनायुक्त उद्गार त्यानें काढले, तेव्हां बलरामास अतिशय राग आला. त्यानें लागलेंच उत्तर केलें, " आम्ही राजचिन्हें वापरतों तीं तुमच्या प्रसादानें नसून आपल्या पराक्रमानें वापरतों, याचा तुम्हांस आतांच प्रत्यय दाखवितों. " असें म्हणून बलरामानें शहराबाहेर येऊन आपल्या नांगरानें सबंध हस्तिनापूर उचकलें. सर्व शहर उलथें होऊन गंगेंत पडतें कीं काय अशी सर्वांस भीति वाटूं लागली. तें बलरामाचें अद्भुत पराक्रमाचें कृत्य पाहून दुर्योधनासह कौरवमंडळी बलरामास शरण गेली. व त्यांनीं सांबास मुक्त करून त्यास लक्ष्मणाही अर्पण केली. विवाहविधि आटोपून लक्ष्मणा व सांब यांस घेऊन बलरामदादा द्वारकेस आले. तेव्हां श्रीकृष्णास मोठा आनंद झाला. या संबंधामुळें दुर्योधन श्रीकृष्णाचा व्याही झाला. असो. हस्तिनापूर याप्रमाणें उचकलें गेलें, तें तसेंच गंगेच्या किनारीं कित्येक वर्षें कलतें राहिलें* ( भागवत, द० अ० ६८ ). असो.

सुभद्रेचा विवाह झाल्यावर कांहीं काळानें श्रीकृष्ण इंद्रप्रस्थास सुभद्रेस माहेरीं आणण्याकरितां गेला. तेव्हां सुभद्रा अभिमन्यूच्या वेळीं गरोदर होती. श्रीकृष्णाचा पांडवांनीं नेहमींप्रमाणें सत्कार केला. अर्जुन व श्रीकृष्ण यांचा नेहमीं एकांत होत असे. एके दिवशीं यमुनेवर दोघेही एकांतांत बसले असतां अग्नीनें मनुष्यरूप धारण करून खांडववनानें माझी भूक शांत करा अशी त्यांस विनंति केली. इंद्रप्रस्थाच्या पश्चिमेस खांडववन दाट वाढलें होतें. तेथें नेहमीं पर्जन्य पडे, यामुळें तें इंद्राच्या संरक्षणाखालीं असून अग्नीच्या भक्षत्वापासून नेहमीं वांचलेलें असे. या अरण्यांत हिंस्र पशु व रानटी लोक रहात असून त्यांजपासून राज्यास त्रासही होत असे. तेव्हां कृष्णार्जुनांनीं अग्नीस खांडववन देण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें त्या दोघां वीरांनीं वनाच्या दोहों बाजूंस राहून तें अरण्य पेटवून दिलें. कोणीही प्राणी किंवा जनावर त्यांतून निसटूं शकले नाहीं. मयासुर या वनांत रहात असे, त्यास मात्र श्रीकृष्णानें जीवदान दिलें, व त्यास सुरक्षित बाहेर जाऊं दिलें.

---

* हें पुढें जनमेजयानंतर पांचव्या पिढीला गंगेंत उलथून पडलें व समूळ नाहींसें झालें.

तक्षक नांवाचा नाग त्या वनांत होता, तो बाहेरदेशीं गेला असल्यानें वांचला. त्याचा भाऊ अश्वसेन मात्र युक्तीनें जिवंत निसटला. ते दोघे यापुढें पांडवांचे व पांडवांच्या वंशाचे कट्टे शत्रु बनले. असो. खांडववन जाळून टाकून एक मोठा मुलूख पांडवांच्या राज्यांत वसाहतीस व शेतीस मोकळा झाला, तेव्हां त्यांच्या राज्याची अधिक भरभराट झाली. मयासुरानें कृतज्ञतेनें एक दिव्य सभा पांडवांकरितां इंद्रप्रस्थांत बांधून दिली. तिचे सहस्र स्तंभ स्फाटिकाचे असून फारच शोभायमान दिसत होते. सभेच्या पुढें एक स्फटिकशिलांची व इंद्रनीळ मण्यांची निरनिराळ्या रत्नांनीं सुशोभित केलेली सुवर्णकमलांनीं भरलेली पुष्करणी त्यानें तयार केली. त्या सभेंत त्यानें निरनिराळ्या प्रकारच्या कारागिरींच्या मौजाही केल्या. पाणी असेल तेथें जमीन दिसावी, जमीन असेल तेथें पाणी दिसावें, दरवाजा असेल तेथें भिंत दिसावी, भिंत असेल तेथें दरवाजा दिसावा, अशीं कित्येक आश्चर्याचीं कामें त्यानें त्या सभेंत तयार केलीं. या सभेमुळें इंद्रप्रस्थाची कीर्ति भरतखंडांत दुमदुमून गेली, व पांडवांच्या पराक्रमाविषयीं चोंहोंकडे ख्याति पसरली ( भारत, आ० अ० २२२–२२७ ).

असो. याप्रमाणें श्रीकृष्णाचें मध्यम वय संपूर्ण द्वारकेंत गेलें. त्याचा नित्यक्रम येणेंप्रमाणें होता:—वंदिजनांनीं त्यास स्तवन करून पहाटेस ब्राह्ममुहूर्तावर जागें केलें म्हणजे त्यानें नेत्रांस पाणी लावून थोडा वेळ परमात्म्याचें ध्यान करावें. नंतर नित्यविधि आटोपून स्नान करून स्वच्छ वस्त्रें नेसून संध्या करावी व अग्नीस होम द्यावा. नंतर वाग्यत होऊन गायत्रीजप करावा. नंतर उदयास येणाऱ्या सूर्याचें उपस्थान करावें. नंतर देव, पितृ, ऋषि यांचें तर्पण करून, देवांचें, ब्राह्मणांचें व आपल्या वृद्ध, संबंधी पुरुषांचें दर्शन व पूजन करावें. शिंगांस सोनें बांधलेल्या व खुरांना रुप्यानें मढविलेल्या सवत्स गाईचें दान ब्राह्मणास यथाविधि रोज द्यावें. नंतर आपल्या स्वतःस अनुलेपन, वस्त्रें व भूषणें यांनीं अलंकृत करून तुपांत व आरशांत आपलें प्रतिबिंब पाहून बाहेर पडून ब्राह्मण, पौर, सेवक, अंतःपुरजन इत्यादिकांस जें कोणास सांगावयाचें असेल तें ऐकून किंवा मागावयाचें असेल तें देऊन, मित्र, कारभारी व बायका यांशीं भाषणें करून व आलेल्या ब्राह्मणादिकांस विडे देऊन विदा करावें. नंतर दारुकानें शैब्य, सुग्रीव, बलाहक, मेघपुष्प

हे चार सुंदर घोडे जोडलेला रथ आणून दरवाज्याशीं उभा केलेला असे. त्यांत सात्यकि किंवा उद्धव यांस हातांत हात घालून बरोबर घेऊन बसावें व यादवसभेंत जावें. नाचगाणें चाललेल्या त्या दिव्य सुधर्मा—राजसभेंत सर्व यादवांसह उत्तम आसनांवर बसून नानाप्रकारच्या राजकीय कामासंबंधीं गोष्टी बोलून व सर्वांशीं हंसून खेळून नर्म भाषणें करून दोन प्रहरानंतर घरीं परत यावें. भोजनोत्तर विश्रांति घेऊन नंतर उद्धवाबरोबर किंवा एकाद्या प्रिय पत्नीबरोबर सोंगट्यांचा एक डाव खेळावा. सायंकाळीं निरनिराळ्या प्रकारची शस्त्रविद्या जागृत ठेवावी; कधीं असिचर्म, कधीं धनुष्यबाण, कधीं अश्वचर्या, गजचर्या, रथचर्या, यासंबंधीं व्यायाम करावा. सायंकाळ झाल्यावर पुन्हां सायंसंध्या करून भोजनोत्तर द्विजमुख्याशीं संभाषण करावें; इतिहास—पुराण श्रवण करावें; विग्रह, संधि इत्यादिकांचा विचार बलरामासह करावा; धर्मार्थकामांचा विचार कारभाऱ्यांशीं व स्त्रियांशीं करावा; मुला—मुलींचे विवाहाचे, मौंजीबंधनाचे, यज्ञांचे व व्रतांचे संबंधानें व्यवस्था लावावी. नंतर द्वितीय प्रहरांत निजावयास जावें. याप्रमाणें व्यवस्थित रीतीनें धर्मानुसार गृहस्थाश्रमाचे पवित्र सद्धर्म पाळीत, सुख अनुभवीत व लोकांस वर्तनाचा धडा शिकवीत श्रीकृष्णाचा काळ द्वारकेंत ६२—६७ वर्षेंपर्यंत गेला ( भागवत, द० अ० ६९—७० ).



# राजसूयपर्व

“ [ १ ] परित्राणाय साधूनां [ २ ] विनाशाय च दुष्कृताम् [ ३ ] धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे । ” या वचनांत सांगितल्याप्रमाणें अवतारकृत्य पूर्णतेनें करण्याची वेळ हळूहळू जवळ आली. आपल्यावरील उन्मत्त क्षत्रियांचा भार हलका करण्याविषयीं पृथ्वीनें श्रीविष्णूस पूर्वीं प्रार्थना केल्याप्रमाणें क्षत्रियांच्या हातून त्यांच्याच विनाशासाठीं अनन्वित पापेंही घडूं लागलीं. मध्य देशांतून यादवांनीं श्रीकृष्णासह पाय काढल्यापासून जरासंधास कोणताच शत्रु मध्यदेशांत न उरल्यामुळें त्यानें शेंकडों राजे जिंकून कैदेंत टाकिले, व शेवटीं त्यांचा पुरुषमेध करण्याचा त्यानें विचार चालू केला. अशा स्थितींत जरासंधाचा बंदोबस्त करण्याविषयीं कित्येक शरणार्थी राजांकडून द्वारकेस दूत आले. जरासंधाचा निकाल कसा लावावा या विचारांत श्रीकृष्ण यादवसभेंत बसला असतां इंद्रप्रस्थाहून धर्मराजाचा दूत इंद्रसेन श्रीकृष्णाकडे आला. मयानें बांधलेल्या दिव्य सभेच्या प्रतिष्ठेचा समारंभ आटोपून श्रीकृष्ण इंद्रप्रस्थाहून नुकताच द्वारकेस आला होता, तो पुन्हां धर्मराजाचें बोलावणें आलेलें पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें. “ धर्मराजानें आपल्यास लवकर बोलावलें आहे” हें दूताचें वाक्य ऐकून श्रीकृष्ण ताबडतोब निघाला. त्यानें या वेळीं आपल्या आठही स्त्रियांस इंद्रप्रस्थ दाखविण्याच्या हेतूनें बरोबर घेतलें. आनर्त, सौवीर, मरु हे देश ओलांडून, विनशन तीर्थावरून, पर्वत, नद्या, शहरें, गांवें, मागें टाकीत, दृशद्वती व नंतर सरस्वती या दोन मोठ्या नद्या उतरून, मत्स्य देशांतून श्रीकृष्ण इंद्रप्रस्थास पोंचला. श्रीकृष्ण आपल्या भार्यांसह येत आहे ही आनंदाची बातमी धर्मराजास समजतांच तो आपल्या भावांस घेऊन शहराबाहेर श्रीकृष्णास राजवैभवानिशीं सामोरा आला. श्रीकृष्णास पाहतांच धर्मराजानें त्यास प्रेमभरानें आलिंगन

दिलें व इतर पांडवांनीं त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. धर्मराजाबरोबर आलेल्या वृद्ध लोकांस व ब्राह्मणास नमस्कार करून श्रीकृष्ण शहरांत जावयास पांडवांसह समारंभानें निघाला. सर्व शहर पताका–तोरणांनीं शृंगारिलें होतें; व राजमार्ग चंदनोदकानें शीतल व धूलिरहित केले होते. ठिकठिकाणीं निरनिराळ्या श्रेणींचे सन्मान्य लोक पानसुपारी व हारतुरे घेऊन श्रीकृष्णाचा सत्कार करण्यासाठीं उभे होते. श्रीकृष्णास व त्याच्या स्त्रियांस पाहण्यासाठीं रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या वाड्यांच्या माडींतील खिडक्यांतून नगरवासी स्त्रिया उत्सुकतेनें उभ्या होत्या व श्रीकृष्णावर व त्याच्या स्त्रियांवर सुवर्णपुष्पांचा वर्षाव करीत होत्या. मृदंग, पणव, शंख, पटह, इत्यादि मंगलवाद्यें घरोघरीं वाजत होतीं व वारस्त्रिया जागजागीं गात व नाचत होत्या. देवळांदेवळांशीं ब्राह्मण उभे राहून श्रीकृष्णास आशीर्वाद देत होते. याप्रमाणें थाटानें स्वारी पांडवांच्या राजवाड्यापाशीं पोंचली, तेव्हां श्रीकृष्णास व त्याच्या स्त्रियांस पाहण्यासाठीं अन्तःपुरांतील स्त्रियांची गर्दी जमली. राजमंदिरांत शिरून प्रथम श्रीकृष्णानें पृथेच्या पायांवर डोकें ठेविलें व नंतर त्याच्या आठही स्त्रियांनीं तिला नमस्कार केले. पांडवांची पट्टमहिषी द्रौपदी हिनें रुक्मिणी, सत्यभामा, मित्रविंदा, सत्या, कालिंदी, जांबवती, कैकेयी व भद्रा या आठही श्रीकृष्णपत्नींचें मोठ्या सन्मानानें स्वागत केलें व त्यांस उत्तम उत्तम वस्त्रें अहेर करून हारांनीं भूषित केलें. श्रीकृष्णाच्या येण्यानें त्या वेळेपासून जो उत्सव पांडवांच्या राजमंदिरांत सुरू झाला व जो आनंद त्या ठिकाणीं पसरला त्याचें वर्णन करणें शक्य नाहीं (भागवत, द० ७१ भारत सभा० अ० १३).

दहापांच दिवस आनंदांत व उत्सवांत गेल्यावर एके दिवशीं धर्मराजानें सभेंत श्रीकृष्णास म्हटलें, “मधुसूदना, तुझ्या कृपेनें हें पांडवांचें राज्य उत्कर्षास पावून आज या वैभवास पोंचले आहे. कलागत लावणाऱ्या नारदऋषींनीं नुकताच येऊन मला राजसूय यज्ञ करण्याविषयीं आग्रह केला. माझे बंधु व इष्टमित्र यांस हा बेत पसंत पडला असून तेही मला हाच आग्रह करीत आहेत. पण, श्रीकृष्णा, माझे दोष व माझ्या स्थितींतील वैगुण्य मला कोणीही सांगणार नाहीं. यासाठीं मी तुला मुद्दाम बोलाविलें आहे. माझी योग्यता राजसूय करण्याची आहे काय ? हा क्रतुश्रेष्ठ पांडवांच्या

हातून निर्विघ्न पार पडेल असें तुला वाटतें काय ? दिग्विजय करणें या माझ्या पराक्रमी बंधूंस शक्य आहे काय ? खरें असेल तें मात्र तूं सांग. कारण तूं आम्हांस वडील असून सर्वदर्शी व बुद्धिमान् आहेस. " हें भाषण ऐकून श्रीकृष्ण किंचित् विचार करून म्हणाला, " धर्मा, हा श्रेष्ठ यज्ञ करण्यास तूं आपल्या गुणांनीं सर्वतोपरी योग्य आहेस. पण मला एक अडचण दिसते आहे ती मी तुला सांगतों. तुला ठाऊकच आहे, कीं या भरतखंडांत चंद्रवंशी व सूर्यवंशी क्षात्रिय कुलें एकंदर एकशेंएक आहेत. यांत सध्यां भोजकुल सर्वांत बालिष्ठ व अधिक पसरलेलें आहे. परशुरामानें जिंकलेल्या व त्याच्या कत्तलींतून वांचलेल्या क्षात्रियांनीं तेव्हांपासून कोणातरी आपल्यापैकीं एकास सार्वभौम मानून त्याच्या आज्ञेंत सर्वांनीं चालावें असा नियम केला आहे, तोही तुला माहीत आहे. त्याप्रमाणें हल्लीं भोजकुल बलिष्ठ असल्यानें त्या कुलापैकीं मगधदेशाचा राजा जरासंध हा सर्वांनीं सम्राट् मानलेला आहे. चेदिपति शिशुपाल हा त्याचा सेनापति असून विदर्भाचा भीष्मक, पौंड्रकपति वासुदेव, करुपपति दंतवक्र, इत्यादि राजे त्याचे आज्ञाधारक आहेत.पश्चिमेकडचेही बहुतेक राजे जरासंधासच अनुकूल आहेत. मध्यदेशांत फक्त कुंतिभोज पुरुजित् हा तुझा मामा असून तुझ्या बाजूला आहे, इतर सर्व राजे मध्यस्थ किंवा जरासंधास अनुकूल असेच आहेत. जरासंधाचें सैन्य इतकें प्रचंड आहे, कीं जरी आम्ही त्याचा कित्येक वेळां मोड केला, तरी आम्हांस त्याच्या भयानें अखेर द्वारका सोडावीच लागली. जरासंधाच्या त्रासानें आम्हीं समुद्राच्या पाण्यांत आश्रय घेतला आहे. आमच्या भावाबंदांची द्वारकेंत अठरा हजार कुळें आहेत; आहुकाचे शंभर पुत्र चारुदेष्ण, चक्रदेव, सात्यकी, मी, बलदेव, सांब व प्रद्युम्न इतके आम्ही महारथी आहोंत. कृतवर्मा, अनाधृष्टि, समीक, समितिंजय, कंक, शंकू, कुंति, अंधक, भोजाचे दोघे पुत्र व वृद्ध राजा वसुदेव इतके आणखी दहा वीर आहेत. तत्रापि आम्हांस मध्यदेशांत परत जातां येत नाहीं. मध्यदेशाची आठवण करीत द्वारकेंतच रहावें लागत आहे. सारांश, जरासंध अत्यंत बलिष्ठ असून तो जिवंत आहे तोंपर्यंत दिग्विजय करणें तुला शक्य नाहीं. अर्थात् राजसूय क्रतु तुला साध्य होणार नाहीं. असो. असें जरी आहे तरी जरासंधाचा वध करणें शक्य आहे. तो आपल्या पातकांनींच या

वेळीं मृत्यूच्या सामीप आला आहे. त्यानें शेंकडों राजे जिंकून कैदेंत टाकले आहेत इतकेंच नव्हे, तर त्यांचा पुरुषमेध करून महादेवास संतुष्ट करण्याचा विचार चालू आहे. या वेळीं त्यास ठार मारल्यास त्याचा कांटा नाहींसा होईल, आणि शिवाय त्यानें बंदींत टाकलेले सर्व राजे तुझे साहाय्यकर्ते होतील. जरासंधावर सैन्यानिशीं स्वारी करणें शक्य नाहीं. त्याच्या जवळ अगणित सैन्य असून रणांगणांत त्यास जिंकणें दुरापास्त आहे. पण द्वंद्व-युद्धांत त्यास अर्जुन किंवा भीम सहज मारूं शकेल. मी या दोघांस घेऊन गुप्तवेषानें राजगृहास जातों. त्याचा अवमान करून त्याजपाशीं द्वंद्वयुद्ध मागितलें असतां तो दर्पानें, अवमानानें व लोभानें कधींही द्वंद्वयुद्ध नाकारणार नाहीं. बहुधा या भीमाशींच तो बाहुयुद्ध कबूल करील आणि भीम त्यास द्वंद्वयुद्धांत ठार मारील अशी मला खात्री आहे. तर या दोघांस बरोबर घेऊन जाण्याची मला तूं तात्काळ परवानगी दे. ही गोष्ट अधिक बभ्रा न करितां तावडतोब केली पाहिजे. यासाठीं आम्हांस जाण्याची परवानगी देण्यास तूं क्षणभर विलंब करूं नकोस.'' हें श्रीकृष्णाचें सविस्तर भाषण ऐकून धर्मराजानें तात्काळ परवानगी दिली. "हे माझे प्राणाहूनही प्रियबंधु तुझ्या स्वाधीन आहेत. तूं जेथें जाशील तेथें जयच आहे. तुझी इच्छा किंबहुना आज्ञा मला शिरसावंद्य आहे.'' असें म्हणून धर्म-राजानें त्या तिघांस लागलीच मगधाकडे रवाना केलें (भारत, स० अ० १३).

तीन अग्नींप्रमाणें देदीप्यमान असणारे ते तिघे वीर झपाट्यानें कुरु-क्षेत्रांतून पूर्वेकडे चालले. कुरुजंगलांतून मधोमध जाणाऱ्या गंगेस उतरून, कमळें फुललेलीं अनेक सरोवरें पहात, कालकूट पर्वत ओलांडून, गंडका, महाशोण व सदानीरा या नद्या उतरून ते कोसल देशांत पोंचले. तेथेंही शरयू महानदी उतरून मिथिला देशांत पोंचून माला व चर्मण्वती नद्या उतरून नंतर ते दक्षिणेकडे फिरले. अनेक मोठमोठ्या नद्या मिळाल्यानें अत्यंत विस्तीर्ण पात्र झालेली गंगानदी त्यांस पुन्हां लागली. ती उत्तीर्ण होऊन शोणनदीवर येऊन तीही उतरून गोधनानें भरलेल्या, आम्र, पलाश इत्यादि शुभवृक्षांनीं मंडित झालेल्या व पाण्यावर नेहमीं परत असलेल्या मगध देशांत ते आले. तेथें गोरथ पर्वताजवळ वसलेलें राजगृह त्यांच्या नजरेस

पडलें. त्यांनीं ब्राह्मणाचा वेष घेतला असून कुशतृणांचीं वल्कलें परिधान केलीं होतीं, व त्यांच्या हातांत केवळ कमंडलु होते. शहराच्या दरवाजांतून आंत न शिरतां जेथें जरासंधाचा बाप बृहद्रथ यानें मास खाणाऱ्या मत्त वृषभास मारून त्याच्या कातड्याच्या तीन भेरी करवल्या होत्या व तेथें एक मंदिर बांधलें होतें, त्या मंदिरांत जाऊन त्या भेरी फोडून मंदिराच्या प्राकारावर असलेलें शृंग त्यांनीं ढांसळून दिलें. नंतर प्राकारावरूनच त्यास लागलेल्या शहराच्या कोटावरून शहरांत शिरून ते राजवाड्याकडे चालले. हत्तीसारखे मजबूत व शालवृक्षासारखे उंच असे ते तिघे स्वच्छ पांढरीं वल्कलें नेसलेले ब्राह्मण पाहून शहरांतील लोकांस मोठें आश्चर्य वाटलें.भयाचा लेशही ज्यांच्या अंतःकरणांत शिरलेला दिसत नाहीं, असे तेजस्वी ब्राह्मण पाहून त्यांस राजवाड्यांत शिरण्यास कोणींच हरकत केली नाहीं. ते जरा-संधापाशीं पोंचले, तेव्हां त्यानें आदरानें उठून त्यांस पाद्यमधुपर्कानें सत्कार पुढें केला, पण तो त्यांनीं घेतला नाहीं. " तुम्ही पूजा—सत्कार कां घेत नाहीं ? " असा जरासंधानें प्रश्न केला, तेव्हां भीमार्जुन कांहींच बोलले नाहींत, पण महामति श्रीकृष्णानें उत्तर केलें, " हे बोलण्याकरितां आले नाहींत. किंबहुना यानीं न बोलण्याचें व्रत घेतलें आहे. " हें उत्तर ऐकून जरासंध चपापला. धनुष्याच्या ओढण्यानें घट्टे पडलेले त्यांचे पुष्ट भुजदंड पाहून, त्यांच्या कपाळाचें गंध व गळ्यांतल्या पुष्पमाळा आलक्षून व त्यांनीं केलेल्या अपमानास्पद कृत्यांची सेवकांकडून हकीकत ताबडतोब कानांवर आली ती मनांत आणून तो म्हणाला, " तुम्ही कोण आहां ? तुमचें तेज तर क्षात्र दिसतें ! तुम्ही ब्राह्मण स्नातक असाल तर हें गळ्यांत हार व अनुलेपन कां ? चैत्याचें शृंग मोडून अक्रारानें तुम्हीं शहरांत प्रवेश कां केला आणि माझे जवळ येऊन ब्राह्मणांस योग्य असा केलेला माझा सत्कार तुम्ही घेत नाहीं हें काय ? " श्रीकृष्णानें उत्तर केलें, " जरासंधा, आम्ही स्नातक वेष घेतलेले क्षत्रिय आहोत. पुष्पांत नेहमीं लक्ष्मी वसते म्हणून आम्हीं पुष्पें धारण केलीं आहेत. शत्रूच्या घरांत द्वारानें शिरूं नये, मित्राच्या घरांत द्वारानें शिरावें म्हणून आम्हीं अक्रारानें प्रवेश केला आहे. आमचें कार्य झाल्यावांचून आम्हांस शत्रूपासून पूजा घेणें योग्य नाहीं, म्हणून आम्ही तुझी पूजा घेत नाहीं. " हीं खडखडीत उत्तरें ऐकून जरासंधानें त्यांस

निरखून पाहिलें. त्या तिघांस त्यानें ओळखिलें तथापि त्यानें पुन्हां प्रश्न केला, "तुमचें माझें वैर असल्याचें मला स्मरत नाहीं. मीं तुमची कोणतीही आगळिक केली नसतां तुम्ही शत्रु म्हणून माझ्यापाशीं येतां हें आश्चर्य आहे ! " श्रीकृष्ण म्हणाला, " जरासंधा, एका राजानें दुसऱ्या राजास विनाकारण जिंकून त्यास आणखी महादेवास बळी देण्याचा विचार करावा हें महत्पातक आहे. हें पातक निवारण्याचें आमच्यांत सामर्थ्य असून आम्ही तें निवारण केलें नाहीं तर तें आम्हास लागेल. आम्ही ज्ञातीच्या रक्षणासाठीं ज्ञातीच्या विनंतीवरून, ज्ञातीचा क्षय करूं इच्छिणाऱ्या तुला ठार मारण्यासाठीं येथें आलों आहों. मी हृषीकेश शौरी आहें. हे दोघे पांडव भीमार्जुन आहेत. आम्ही तुला युद्धास आव्हान करतों. आम्हांपैकीं वाटेल त्याशीं वाटेल त्या प्रकारानें युद्ध कर. नाहीं तर जे क्षत्रिय तूं कैदेंत टाकले आहेस त्या सर्वांस सोडून दे. " हें ऐकून जरासंधानें दर्पानें, क्रोधानें व त्वेषानें "असें आहे काय ? ठीक आहे. तूं तर माझ्या समोरून पळाला आहेस; हा अर्जुन अशक्त आहे; ह्या भीमाशीं मी बाहुयुद्ध करतों; माझ्याशीं लढण्यास हाच योग्य आहे. " असें म्हणून भीमाशीं बाहुयुद्ध करण्याची तयारी केली. त्यानें अंगास रोचना लावली; पोटांत थकवा येऊं न देणारीं औषधें घेतलीं; गळ्यांत माला धारण केली; पुरोहितानें दिलेला आशीर्वाद ग्रहण केला; आणि तो वेला उल्लंघून जाणाऱ्या समुद्राप्रमाणें गर्जना करीत आखाड्यांत उतरला. इकडे भीमही श्रीकृष्णास नमस्कार करून त्यांच्या समोर झाला. नंतर त्या दोघां बलिश्रेष्ठांनीं बाहू थोपटून एकमेकांच्या हातांस स्पर्श करून परस्परांचें वंदन केलें; आणि मग पुन्हां आपल्या वज्रप्राय दंडाचा भयंकर आस्फोट करून ते श्रेष्ठ मल्ल परस्परांशीं भिडले. एकमेकांस पकडीत, चित्रहस्तक इत्यादि पेच करीत व मधून मधून एकमेकांस आपल्या लोखंडी मनगटांनीं व तळहातांनीं प्रहार करीत ते त्वेषानें, क्रोधानें व सर्व सामर्थ्यानें लढूं लागले. त्यांचें तें भयंकर युद्ध पाहण्यास हजारों पुरवासी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य जमा झाले. कार्तिक महिन्याच्या पहिले दिवशीं त्यांचे युद्ध सुरूं झालें, तें रात्रंदिवस आहाराशिवाय १४ दिवस चाललें. शेवटीं जरासंध थकला. जरासंधाचें वय या वेळीं सुमारें ऐंशीं वर्षांचें असून भीमाचें पन्नासाचे सुमार होते, ही गोष्ट मनांत आणली म्हणजे जरासंध थकला यांत आश्चर्य नाहीं. पूर्वकाळीं

भरतखंडांत आयुष्य दीर्घ असून शक्तीही प्रचंड होती. याची साक्ष शिकंदरच्या बरोबर आलेले अरायनप्रभृति ग्रंथकार देतात. त्यांनी एकशेंवीस वर्षांचीं अनेक सशक्त माणसें त्या वेळीं हिंदुस्थानांत पाहिलीं होतीं. मग त्याच्याही अडीच तीन हजार वर्षांपूर्वी जरासंघासारखे ऐंशीच्या वर्षीही मल्ल युद्ध खेळणारे आर्य हिंदुस्थानांत होते यांत नवल नाहीं. असो. जरासंघास थकवा येऊन तो परतला हें पाहतांच श्रीकृष्ण म्हणाला, " भीमा, थकलेला शत्रु वारंवार मिळत नाहीं, पाहातोस काय ? जरासंघ जरेनें सांधला आहे. त्याच्या चिरफळ्या करून टाकल्याशिवाय तो मरावयाचा नाहीं. " हें ऐकतांच भीमानें जरासंधास ओढून खालीं टाकलें, व त्याच्या एका पायावर आपले पाय देऊन दुसरा पाय दोन्ही हातांनीं जोरानें उचकून त्यास उभा चिरला. त्या वेळच्या दोघांच्या भयंकर गर्जनांनीं गर्भिणी स्त्रियांचे गर्भही गळून पडले. असो. याप्रमाणें जरासंधास ठार मारून त्याचें प्रेत तेथेंच टाकून ते तिघे वरि उठले. त्यांच्या क्रोधयुक्त मुद्रेकडे कोणाच्यानें पहावत नव्हतें. श्रीकृष्णानें तात्काळ स्वतः जाऊन जरासंधाचा रथ जोडून आणला व नंतर कैदेंत टाकलेल्या सर्व क्षत्रिय राजांस त्याने बंदींतून मोकळें केलें. मग जरासंधाच्या पुत्राच्या स्वाधीन सर्व राज्य करून व भीमार्जुनांस रथांत बसवून तो धर्म, वैल व जय या तिहींचा पूर्ण अधिपति श्रीकृष्ण राजगृहांतून बाहेर पडला आणि त्वेरेनें इंद्रप्रस्थास येऊन पोंचला. त्या तिघांस सुखरूप व कृतकार्य आलेले पाहतांच धर्मराजास जो आनंद झाला तो कोठवर वर्णन करावा ! " कृष्णा तुझ्या सल्ल्यानें व सामर्थ्यानें हा जगताचा काटा तूं काढून टाकलास " असा श्रीकृष्णाचा त्यानें सवास्तव स्तव केला, व त्याचें मनःपूर्वक पूजन केले. " आतां तुम्हीं दिग्विजय करण्यास बिनधास्त निघा, " असें पांडवांस सांगून गर्भवती सुभद्रेस बरोबर घेऊन श्रीकृष्ण आपल्या स्त्रियांसह द्वारकेस परत आला ( भारत, स० २०–२४ )

श्रीकृष्णानें पांडवांस घेऊन राजगृहास एकाएकीं जाऊन जरासंधास भीमाकडून द्वंद्वयुद्धांत ठार मारविलें ही बातमी भरतखंडांतील प्रत्येक राजधानींत पोंचली, तेव्हां निरानिराळ्या राजांची चित्तवृत्ति निरानिराळ्या तऱ्हेनें श्रीकृष्णाविषयीं क्षुब्ध झाली. कित्येकांस त्याच्या अचिंत्य पराक्रमाचें व बुद्धिमत्तेचें आश्चर्य वाटून हा खरोखर श्रीविष्णूचा अवतार आहे असें वाटलें.

तर दुसऱ्या कित्येकांस हें याचें बंड वाढत चाललें असें वाटून विषाद उत्पन्न झाला. त्यांत पौंड्रक वासुदेवास तर या वार्तेनें फारच राग आला. त्याचेंही नांव वासुदेव ( वसुदेवपुत्र ) असून तो श्रीकृष्णाच्या मत्सरानें पुष्कळ दिवसांपासून ग्रस्त होता. तो आपल्यास अत्यंत पराक्रमी व शहाणा समजत असे, इतकेंच नव्हे, तर तो आपल्यास सत्पुरुष मानून श्रीकृष्णाच्या वाढत्या कीर्तीचा हेवा करी. एकादा थोर साधुपुरुष उत्पन्न होऊन त्याची कीर्ति पसरत चालली म्हणजे बहुधा त्यास प्रतिस्पर्धी उत्पन्न व्हावयाचा असा मनुष्यस्वभावाचा नियमच आहे. महंमदालाही एक प्रतिमहंमद उत्पन्न झाला होता. बुद्धाला प्रतिबुद्ध व ख्रिस्ताला प्रतिख्रिस्त निघाले होते. फार लांब कशाला शिरडीकर सांईमहाराजांप्रमाणेच एक कोपरगांवकर सांइमहाराजही तयार झाले होते, हें पुष्कळांस ठाऊक असेलच. असो. मी देवाचा अवतार आहें असें पौंड्रक वासुदेवही म्हणे व तोही श्रीकृष्णाप्रमाणें वनमाला धारण करून पीतवस्त्र नेसे. तसेंच चक्र, गदा, शार्ङ्ग, शंख हीं आयुधेंही तो बाळगी व श्रीकृष्णाप्रमाणें तोही आपल्या रथावर गरुडाचा ध्वज लावी. त्यानें या वेळीं श्रीकृष्णास मुद्दाम दूत पाठविला व युद्धास आव्हान केलें. " कृष्णा, जरासंधास असावध एकटाच गांठून त्वां भीमाकडून ठार मारविलेंस यांत तूं मोठा पराक्रम केला नाहींस. असो. मी श्रीविष्णूचा अवतार आहे असें तूं लोकांस खोटें सांगतोस आणि अशा कृत्यांनीं आपली थोरवी वाढवूं पाहतोस, पण हें ठीक नाहीं. माझीं चिन्हें धारण करून तूं लोकांस भ्रमांत पाडतोस हें योग्य आहे काय ? हीं सर्व चिन्हें सोडून देऊन देवाचा अवतार तूं नसून मी आहें असें कबूल कर, नाहीं तर माझ्याशीं लढावयास ये. " असा पौंड्रकाचा वेडसर निरोप दूतानें श्रीकृष्णास यादवसभेंत सांगितला तेव्हां तेथें बसलेले यादव हंसले. " माझीं चिन्हें तूंच वृथा धारण केलीं आहेस तीं तुझ्याकडून रणांगणावर मी टाकवितों. " असें उत्तर पाठवून श्रीकृष्णानें यादवांसह पौंड्रक वासुदेवावर तात्काळ स्वारी केली. तोही आपल्या फौजेसह पुंड्रदेशाहून निघून काशीजवळ आला व तेथें त्याचा मित्र काशीचा राजा आपल्या फौजेसह त्यास मिळाला. यादवांचें व त्यांचें काशीजवळ घनघोर युद्ध झालें. शेवटीं पौंड्रक वासुदेवाचा श्रीकृष्णानें पराभव करून त्याचें शिर सुदर्शन चक्रानें उडाविलें. काशीराजासही संग्रामांत जिंकून

श्रीकृष्णानें बाणानें ठार मारलें. याप्रमाणें मत्सरी पौंड्रक वासुदेव व त्याचा मित्र काशीचा राजा यांस ठार मारून श्रीकृष्ण यादवांसह द्वारकेस परत आला, तेव्हा द्वारकेच्या लोकांनीं श्रीकृष्णाचा मोठा जयजयकार केला. श्रीकृष्ण खरोखर श्रीविष्णूचा अवतार आहे अशी लोकांची पूर्ण खातरी होऊन त्याजवरील लोकांची भक्ति अतिशय वाढली; व सिद्ध, चारण, गंधर्व, मनुष्य, श्रीकृष्णाचें यश गाऊं लागले ( भागवत, द० अ० ६६ ).

इकडे युधिष्ठिरानें आपल्या चार बंधूंस चारी दिशा जिंकावयाकरितां रवाना केलें. उत्तर दिशेस अर्जुनाची रवानगी केली, भीमाची पूर्वेस, सहदेवाची दाक्षिणेस व नकुलाची पश्चिमेस. त्यांनीं आपआपल्या दिशेचे राजे जिंकून त्यास धर्मराजाच्या सार्वभौमत्वास अनुकूल केलें; व त्या राजांनींही करभार घेऊन राजसूय यज्ञास येण्याचें मान्य केलें. कित्येकांनीं हें पांडवांचे वर्चस्व आनंदानें स्वीकृत केलें तर कित्येकांस समरांत जिंकून कबूल करवावें लागलें. सहदेव दाक्षिण दिशा जिंकीत द्वारकेशीं आला, तेव्हां श्रीकृष्ण-बलरामांनीं त्याचें स्वागत करून पांडवाचे साम्राज्य शिरसावंद्य केलें व त्यास धर्मराजाच्या यज्ञासाठीं रत्नादि संपत्ति अर्पण केली. याप्रमाणें चारी बंधूंनीं चारी दिशा जिंकून स्वाधीन केल्या व इंद्रप्रस्थास द्रव्याच्या राशि आणिल्या. तेव्हां धर्मराजानें राजसूय यज्ञाचा निश्चय ठरवून श्रीकृष्णास बोलावणें पाठविलें. अन्य सर्व कामें टाकून श्रीकृष्ण धनाच्या राशि घेऊन इंद्रप्रस्थास पोंचला; त्या वेळीं सूर्य जसा सूर्यरहित देशांत आला म्हणजे आनंद होतो, त्याप्रमाणें इंद्रप्रस्थ नगरास अत्यानंद झाला. श्रीकृष्णानें धर्मराजास म्हटलें, " धर्मा, तूं राजसूय यज्ञ खुशाल कर. मी तूं सांगशील तें काम करण्यास तयार आहें, तर मला यज्ञांतील काम सांग. " हें ऐकून धर्मराजानें त्याची स्तुति केली व कामें करण्यास लोक पुष्कळ आहेत, तूं आमच्यावर केवळ प्रसन्न ऐस म्हणजे आमचीं सर्व कार्यें संपन्न होतील, असें त्यास सांगितलें. नंतर धर्मराजानें व द्रौपदीनें यज्ञाची दीक्षा घेतली. द्वैपायन व्यासांच्या निमंत्रणावरून मोठमोठाले वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण यज्ञाकरितां आले होते. व्यासमहर्षि स्वतः ब्रह्मा झाले, याज्ञवल्क्य अध्वर्यु झाले, धनंजय सामगान करणारा झाला, पैल धौम्यासह होता झाला. योग्य मुहूर्तावर पुण्याहवाचन करून त्यांनीं यज्ञभूमि आंखली व निरनिराळीं यज्ञायतनें तयार करविलीं.

दीक्षा घेतलेला धर्मराज यज्ञमंडपांत येऊन राहिला. सर्व राजे करभार घेऊन आले, त्यांचा सत्कार करून उंच व शुभ्र कैलास शिखरासारख्या सर्व सामग्रीनें भरलेल्या, निरनिराळ्या, नवीन तयार केलेल्या मंदिरांत त्यास उतरविलें. नकुलानें स्वतः हस्तिनापुरास जाऊन भीष्मास व धृतराष्ट्रास पुत्रांसह इंद्रप्रस्थीं आणिलें, व त्यांसही निरनिराळ्या दिव्य मंदिरांत उतरविलें. नंतर त्यांस यज्ञकृत्यांतील योग्य अधिकार वांटून दिले. सर्वांच्या मेजवानीची देखरेख व तयारी करण्याच्या कामावर दुःशासनाची नेमणूक केली. ब्राह्मणांचा सत्कार करण्याकडे अश्वत्थाम्याची योजना केली. भीष्मद्रोणांनीं यज्ञांत बसून कृताकृत पहावें. कृपानें सोन्याची व रत्नांची परीक्षा करावी व दक्षिणा वांटावी. विदुरानें जमाखर्च ठेवावा दुर्योधनानें राजे लोकाकडचा करभार व नजरनजराणा घ्यावा. याप्रमाणें आपल्या बंधुवर्गास धर्मानें कामें सांगितलीं, तेव्हां श्रीकृष्णानें स्वतः होऊन ब्राह्मणांचें पूजन करतांना चरणक्षालन करण्याचें काम आपल्याकडे घेतलें. याप्रमाणें ह्या महान् महान् विभूति त्या यज्ञायतनात काम करूं लागल्या, तेव्हां श्रीचें माहेरघर बनलेलें तें यज्ञसदन फारच शोभूं लागलें. हजारों क्षत्रिय, वैश्य, शूद्र तो यज्ञ पाहण्यास जमा झाले. यज्ञांतील सुस्वर वेदघोष, ब्राह्मणभोजनांतील ‘ आणा ! ’ ‘ वाढा ! ’ इत्यादिसारख्या आरोळ्या, हजारों दक्षिणा रोज वांटल्या जात त्या वेळचे ब्राह्मणांचे आशीर्वाद, क्षत्रिय, वैश्य वगैरे लोकांस नित्य होणाऱ्या मेजवानींतील नृत्याचा व गाण्याचा सुस्वर ध्वनि इत्यादि निरनिराळ्या शब्दांनीं तें विस्तीर्ण यज्ञायतन एक महिनापर्यंत रात्रंदिवस दुमदुमलें होतें. त्या यज्ञसमारंभांत देव हवींनीं, ब्राह्मण दक्षिणांनीं, राजे लोक अनुपम सत्कारांनीं आणि इतर जन सुमृष्ट पक्वान्नांनीं आकंठ तृप्त झाले ( भारत, स० २५–३५ ).

याप्रमाणें सर्व तऱ्हेनें आनंदमय झालेल्या त्या यज्ञाचा शेवटही आनंदमय व्हावयास पाहिजे होता. पण राजसूय यज्ञ निर्विघ्न सिद्धीस जात नाहीं ही ठरलेली गोष्ट. नारदानें कलहाचें बीज पेरण्याकरितांच हा यज्ञ करण्याचा उपदेश धर्मराजास केला होता. यज्ञ यथाविधि आटोपून अवभृथ स्नानाची वेळ आली तेव्हां अगोदर, अर्घाहरण म्हणजे आलेल्या मोठमोठ्या व्यक्तींचें पूजन करण्याचा समारंभ सुरू झाला. जमलेल्या मंडळींत अग्रपूजा कोणाची

करावयाची असा प्रश्न धर्मराजानें कृताकृत, सूक्तासूक्त पाहण्यावर नेमिलेल्या भीष्मास केला तेव्हां त्यानें जमलेल्या सर्व लोकांत गोविंद श्रेष्ठ असून त्यासच अग्रपूजेचा मान शोभतो असें उत्तर दिलें. साहजिकच धर्मराजास व सर्व पांडवांस तें वचन अत्यंत मान्य झालें. सहदेवानें लागलीच श्रीकृष्णास प्रथम अर्घ्य देऊन त्याची पूजा केली व ती त्यानें प्रेमानें व संतोषानें ग्रहण केली. पण हा श्रीकृष्णाचा अग्र सन्मान शिशुपालास खपला नाहीं. रागानें लाल होऊन तो राजसभेंत उठला आणि म्हणाला, " पांडवहो, तुम्ही मला मूर्ख दिसतां ! तुम्हांला सूक्ष्म धर्म बिलकूल समजत नाहीं. येथें येवढे राजे व मोठमोठाले ब्राह्मण बसले असून तुम्हीं श्रीकृष्णास प्रथम मान दिला याचें कारण काय ? हा थेरडा भीष्महीं अक्कलशून्य झालेला दिसतो. हा केवळ पांडवांना प्रिय असेंच बोलतो. अरे मूर्खांनो, वृद्ध म्हणून तुम्ही कृष्णाची पूजा केली असेल तर येथें त्याचा बाप वसुदेव हजर आहे, त्याची पूजा करावयास पाहिजे होती. आचार्य समजून तुम्ही त्याची पूजा करीत असाल तर येथें द्रोणाचार्य असून तुम्ही त्यांचा कसा अपमान करतां ? वेदवित् समजून श्रीकृष्णाची पूजा करीत असाल तर प्रत्यक्ष व्यास महर्षि सर्व वेद जाणणारे येथें आहेत. राजा म्हणून तुम्ही पूजा करीत असाल तर राजश्रेष्ठ दुर्योधन, दुराधर्ष, भीष्मक, कृतलक्षण, पांड्य, तसेंच रुक्मी, शाल्व, शल्य इत्यादि महान् महान् राजे येथें असतां तुम्ही त्यांस मागें टाकून कृष्णाची काय म्हणून प्रथम पूजा केलीत ? हा आचार्य नव्हे, ऋत्विक् नव्हे, राजा नव्हे, याची पूजा केवळ तुमचा हा प्रिय आहे, म्हणून तुम्हीं केलीत. पण याची पूजा तुम्हांस प्रथम करावयाची होती, तर आम्हांस येथें कशासाठीं बोलाविलें ? आम्हीं भीतीनें, लोभानें किंवा तुमच्या समजविण्यानें तुम्हांला करभार दिला नाहीं; तर केवळ हा धर्मराज, धर्मशील आहे, यास सार्वभौम मानणें योग्य आहे, असें वाटून दिला. ते तुम्हीं असा मूर्खपणा करतां ? पण हे मूर्ख पांडव राहोत, कृष्णा, तुला तरी अग्रपूजा घेण्याला लाज कशी वाटली नाहीं ? अरे, येथें इतके सन्मान्य लोक बसले असतां तूंच यांत श्रेष्ठ ? क्लीबाला स्त्री किंवा आंधळ्याला आरसा, त्याप्रमाणें अराजाला तुला ही राजाची पूजा व्यर्थ आहे ! हा युधिष्ठिर पाहिला, हा भीष्म पाहिला, हा कृष्णही पाहिला; सगळे एका माळेचे मणि आहेत ! " हें शिशुपालाचें

भयंकर भाषण ऐकून सर्व राजसभा सुन्न झाली. परंतु भीष्मानें यत्किंचित्ही मनाचा समतोलपणा जाऊं न देतां उत्तर केलें, " जो क्षत्रिय दुसऱ्याला जिंकून त्याला सोडून देतो तो त्याचा गुरु होय. या सभेत एकही राजा मला असा दिसत नाहीं, ज्यास श्रीकृष्णानें जिंकलें नाहीं किंवा जिंकणार नाहीं. हा अच्युत आम्हांसच पूज्यतम नाहीं, तर तिन्ही लोकांत पूज्यतम आहे. ज्ञानवृद्धत्वानें ब्राह्मण सर्वांत पूज्य होतो, बलवृद्धत्वानें क्षत्रिय सर्वांत पूज्य होतो, आणि वैश्य धनवृद्धत्वानें होतो. केवळ शूद्रांत वयोवृद्धत्वानें मनुष्य पूज्य असतो. हा श्रीकृष्ण सर्वांत वयोवृद्ध नाहीं, पण हा ज्ञानवृद्ध, बलवृद्ध आणि धनवृद्ध आहे. सारांश, सर्व द्विजांत तो श्रेष्ठतम आहे. वेद-वेदांगविद् व सत्त्वबलसंपन्न असा हा श्रीकृष्ण सर्वांचा आचार्य, पिता, गुरु आहे. तेव्हां राजेहो, आम्हीं जी याची अग्रपूजा केली, त्याजबद्दल तुम्ही सर्व आम्हांस क्षमा करा. हा शिशुपाल पोर आहे. श्रीकृष्णाची केवळ मूर्ख-पणानें जेथें तेथें निंदा करतो. याचें म्हणणें तुम्ही मनावर घेऊं नका. " हें भीष्माचें भाषण ऐकून शिशुपाल चवताळून पुन्हां उठला आणि म्हणाला, "थेरड्या, कुलकलंका भीष्मा ! उगीच गवताचा राक्षस बनवून लोकांस भेव-डावतोस, तुला लाज कशी वाटत नाहीं ? नावेला नाव बांधावी किंवा अंध-ळ्याच्या मागें अंधळे लावावे, त्याप्रमाणें भीष्मा, तूं अंधळ्यांचा अंधळा म्होरक्या आहेस. कृष्णाची खोटी स्तुति करतांना तुझी जीभ कशी झडली नाहीं ? धर्म तूं कधीं ऐकला नाहीस असें वाटतें. तो माझ्यापासून ऐक. गाय, स्त्री, ब्राह्मण, आपला अन्नदाता यांजवर शस्त्र चालवूं नये, असा धर्म आहे. या कृष्णानें या सर्वांवर शस्त्र चालविलें आहे व त्यांस ठार मारलें आहे. असा हा अधर्माचरण करणारा असून तुम्ही याला जगताचा प्रभु, श्रीविष्णूचा अवतार मानतां, तेव्हां तुम्ही अंधळे नव्हे काय ? किंवा आप-ल्याच ज्ञातीचा क्षय करणाऱ्या हंसाप्रमाणें भीष्मा, तुझें हें कृत्य नसेल ना ? कांहीं असो. सर्व ज्ञातींनीं मिळून तुला या वेळीं जाळून टाकलें पाहिजे, किंवा दगडांनीं ठेंचून मारलें पाहिजे ! " हे शब्द ऐकून मात्र भीष्मास राग आला व त्यानें उत्तर केलें, "मी इच्छामरणी आहें. या राजे लोकांच्या हातून माझा केसही वांकडा व्हावयाचा नाहीं. मी सर्वांस तृणासमान मानतों." ही भीष्माची गर्वोक्ति ऐकून राजे लोकांत चळवळ उडाली. कोणास आनंद

वाटला तर कोणी क्रोधानें " धिक् धिक् " असें ओरडूं लागले. तेव्हां भीष्म पुनः म्हणाला, " उत्तर-प्रत्युत्तरांचा कधीं अंत होत नाहीं. हा माधव आम्हीं येथें सर्वांच्या अगोदर पूजिला आहे. ज्यास हें मान्य नसेल त्यानें माधवाशीं युद्धास उभें रहावें. " शिशुपाल तात्काळ उठून उभा राहिला आणि म्हणाला, " कृष्णा, तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध खेळून मी आज या पांडवांसह तुला क्षयास नेतों. तूं लहानपणीं अनेक अद्भुत पराक्रम केलेस असें लोक म्हणतात व तुझे भक्त तुझें स्तोम माजवितात; तर तें मी आज फोल करून दाखवितों. आपल्या मामास तूं कपटानें ठार मारलेंस, त्याचें प्रायश्चित्त मी तुला आज देतों. " असें म्हणून क्रोधानें तो त्याजवर शस्त्र चालविणार, तोंच श्रीकृष्णानें चक्र फेंकून शिशुपालाचें शिर तोडून टाकिलें. तें श्रीकृष्णाचें अद्भुत कृत्य पाहून सर्व राजसभा स्तिमित झाली. कोणींही तेथें अधिक शब्द उच्चारिला नाहीं. परंतु कित्येकांनीं रागानें हातावर हात पिळले व कित्येकांनीं दांतांनीं ओंठ चावले. परंतु इतर लोकांनीं अंतःकरणांत श्रीकृष्णाची प्रशंसा केली, व महर्षि ब्राह्मणांनीं उघडपणें आनंद मानून दुष्ट शिशुपालाचा वध केल्याबद्दल श्रीकृष्णाचा स्तव केला (भारत,स० ३६–४५).

राजसूयांत आलेलें विघ्न याप्रमाणें श्रीकृष्णानें धाडसानें, पराक्रमानें व आपल्या नेहमींच्या शीघ्रतेनें निवारण केलें; तेव्हां यज्ञाचा शेवटचा कार्य-भाग मोठ्या थाटानें सिद्धीस गेला. युधिष्ठिरानें सर्व राजांसह व ब्राह्मणांसह अवभृथ स्नान केल्यावर त्यास सर्व राजांनीं साम्राज्यपदाचा अभिषेक केला व त्यास अनेक मौल्यवान् नजराणे अर्पण केले. नंतर सर्व राजे युधिष्ठिराचा निरोप घेऊन स्वदेशीं जाऊं लागले, तेव्हां युधिष्ठिरानें त्यांचा यथायोग्य परत सत्कार करून त्यास सन्मानानें रवाना केलें. पांडवांनीं गोविंदासही प्रेमपुरःसर निरोप दिला व त्यास अनेक बहुमोल रत्नें नजर केलीं. सर्व तऱ्हेनें पांडवांचा भार श्रीकृष्णानें उचलला होता, याजबद्दल पांडवांस अत्यंत कृतज्ञता वाटे यांत नवल काय ? असो. राजसूय यज्ञ याप्रमाणें सिद्धीस गेला, परंतु त्यानें भावि कलहाचें बीज चांगलेंच पेरलें. अनेक राजे लोक अंतर्यामीं श्रीकृष्णावर व पांडवांवर जळफळत परत गेले. दोन राजांच्या अंतःकरणांत जो द्वेषाग्नि व मत्सराग्नि पेटला तो अनिवार होता. श्रीकृष्णाच्या कट्ट्या शत्रूंपैकीं शाल्व अद्याप शिल्लक राहिला होता. कंस, कालयवन,

जरासंध, पौंड्रक—वासुदेव, शिशुपाल यांस स्वतः किंवा दुसऱ्याकडून ठार मारवून त्यानें आपला दिव्य प्रभाव जगतांत व्यक्त केला होता. फक्त शाल्व व रुक्मी हे त्याचे शत्रु बाकी होते. पण त्यांपैकीं रुक्मी श्रीकृष्णाचा मेहुणा असल्यानें दोहोंपक्षीं शांति होती. रुक्मी स्वतः होऊन श्रीकृष्णाची आगळीक करीत नव्हता व श्रीकृष्णही रुक्मिणीच्या प्रेमामुळें त्याजवर तलवार चालविण्यास तयार नव्हता. पण शाल्वाचा क्रोध व द्वेष कमी होण्यास कोणतेंच कारण नव्हते. त्याच्या समोर झालेल्या शिशुपालाच्या वधानें त्याचा क्रोध भडकला, अर्जुनप्रभृति पांडव, भीष्मप्रभृति कौरव व श्रीकृष्णप्रभृति यादव या तिहींच्या एकवटलेल्या तेजापुढें त्या वेळेस त्यास कांहीं करतां आलें नाहीं हें उघड आहे. पण स्वदेशीं परत आल्यावर श्रीकृष्णाचा सूड कसा उगवावा याचा त्यास निदिध्यास लागला. रात्रंदिवस तोच विचार त्याच्या मनांत घडपडूं लागला. शेवटीं शंकराच्या कृपेशिवाय हें दुष्कर कार्य साध्य होणार नाहीं असें वाटून त्यानें शंकराची आराधना सुरू केली. इकडे दुर्योधनाचीही पांडवांविषयीं अशीच स्थिति झाली. त्याचें व पांडवांचें लहानपणापासून वैर होतें. चुलतभावांचें वैर म्हणजे केवळ वेड्या कुत्र्याचें विष; तें कधींही बरें होणारें नसून उलट दिवसेंदिवस वाढतच जाणारें असतें. भ्रातृव्य(चुलतभाऊ ) हा शब्द वेदांत शत्रूचाच वाचक आला आहे. असो. भ्रातृव्य पांडवांचा नाश करण्यासाठीं दुर्योधनानें लहानपणापासून अनेक प्रयत्न केले, तरी त्यांचें वैभव वृद्धिंगत होत गेलें; तें इतकें कीं, शेवटीं ते हिंदुस्थानचे सम्राट् झाले. राजसूय यज्ञांत राजेलोकांकडून येणारा करभार घेण्याकडे त्याची योजना होती. तो अपार करभार पाहून त्यास आनंद होण्याच्या ऐवजीं पदोपदीं दुःख मात्र झालें. शेवटीं ज्या वेळेस युधिष्ठिरास सम्राट् म्हणून सर्व राजांनीं नम्रतेनें वंदन केलें, व कोणीं छत्र, कोणीं चामर, कोणीं ताम्बूलकरंडक याप्रमाणें धारण करून सम्राटाचें दास्य पत्करलें, त्या वेळेस युधिष्ठिराचें व द्रौपदीचें तें अपरिमित ऐश्वर्य पाहून त्याच्या पोटांत मत्सराची आग पेटली ! जर्मनांच्या राज्यांत सम्राट् निवडण्याची व त्याचीं दास्यचिन्हें निरनिराळ्या राजांनीं धरण्याची चाल होती, त्याच प्रकारची चाल या वेळीं हिंदुस्थानांत होती असे दिसतें. जर्मन क्षत्रिय व भारतवर्षीय क्षत्रिय यांचें पुष्कळ अंशीं सादृश्य आहे. ते दोघेही पराक्रमी असून धर्मनिष्ठ

होते व दोघांसही मद्य व द्यूत यांचें व्यसन होतें. असो. धर्मराजाचें साम्राज्यवैभव पाहून दुर्योधनास वैषम्य वाटलें, त्यांत त्यांची मयसभा पाहून अधिक भर पडली. अशा प्रकारची दिव्य सभा हिंदुस्थानांत दुसरे कोठेंच नव्हती. याशिवाय ती सभा पाहतांना, पाणी आहे तेथें जमीन दिसल्यामुळें दुर्योधनाचे ओचे भिजले व जमीन होती तेथें पाण्याचा भास झाल्यानें त्यानें आपले ओचे वर घेतले, तेव्हां त्यास भीम हंसला. या अपमानानें तो मानी राजा फारच चिडला. हस्तिनापुरास परत आल्यावर त्यास मत्सरानें व द्वेषानें इतकें ग्रासिलें कीं, तो दिवसेंदिवस कृश होत चालला. पुत्रप्रिय अंध धृतराष्ट्रानें त्याच्या अंगावरून प्रेमानें एके दिवशीं सहज हात फिरविला, तेव्हां त्यास मोठें आश्चर्य वाटलें. सर्व सुखें अनुकूल असून तुझी अशी स्थिति कां असें त्यानें विचारलें, तेव्हां दुर्योधनानें उत्तर केलें, "पांडवांची संपत्ति व त्यांचें ऐश्वर्य मला दुःसह झालें आहे. त्यांचा राजसूय यज्ञ पाहून आल्यापासून उठतां बसतां माझ्यापुढें त्यांचें ऐश्वर्य उभें आहे.माझी स्थिति त्यांच्या मानानें केवल कंगालपणाची ! मला वाटतें, तुम्हीं भावाच्या पोरांस घरांत घेऊन वाढविलें त्याचा हा परिणाम आहे ! " हें ऐकून धृतराष्ट्रास वाईट वाटलें. दुर्योधन, शकुनि व कर्ण यांनीं पांडवांची संपत्ति हरण करण्याची त्यास एक दुष्ट युक्ति सुचविली, ती त्या लोभी म्हाताऱ्यानें तात्काळ पसंत केली. युद्धास कोणी आव्हान केलें तर तें नाकारणें जसें त्या वेळचे क्षत्रिय अयशस्कर मानीत तसेंच द्यूताचें आव्हान नाकारणें हेंही क्षत्रियास हीनता आणणारें आहे असें त्यांस वाटे. भोळ्या धर्मराजास द्यूतास बोलावून कपटाचे फांसे करून त्याची संपत्ति हरण करावी हा बेत त्या चांडाळचौकडीने केला. लागलींच पांडवांच्या सभेसारखी एक दिव्य सभा बांधण्याविषयीं धृतराष्ट्रानें हुकूम केला. वर्षभरांत सभा तयार करवून पांडवांस हस्तिनापुरास सभा पाहण्यास आपल्या सुनांसह येण्याविषयीं त्यानें बोलावणें केलें. भावी परिणाम वाईट आहे असें दिसत असूनही क्षत्रियाच्या यशास बट्टा लागूं नये यासाठीं " आहूतोऽहं न निवर्ते कदाचित् " असें म्हणत, व धृतराष्ट्राच्या प्रेमावर विश्वास ठेवीत धर्म आपल्या बंधूंसह व पांचांची एक भार्या सती द्रौपदी व चारांच्या सुभद्रादि इतर पत्न्या व राजमाता कुंती यांसह आपल्या चुलतभावांस भेटण्यास हस्तिनापुरास गेला ( भारत, स०अ०६० ).

भावांनीं भावांचें व जावांनीं जावांचें आदरानें व प्रेमानें स्वागत केल्यावर व दोनचार दिवस आनंदांत व मेजवानींत गेल्यावर कौरवसभेंत एके दिवशीं शकुनि युधिष्ठिरास म्हणाला, " धर्मा, आजच्या आनंदाच्या प्रसंगीं फांशांनीं खेळूं या. बाकी तुला हरकत वाटत असेल तर नको खेळूं. " धर्मानें उत्तर केलें, " शकुनि, फांशांनीं खेळणें मोठें पातक आहे, शिवाय यापासून अनेक अनर्थ उत्पन्न होतात. " शकुनि म्हणाला, " शहाण्यांनीं वेड्यांस लुबाडावें, सशक्तांनीं अशक्तांस लुटावें, हें जर पातक नाहीं, तर द्यूतांत कुशल असलेल्यांनीं अकुशलांना जिंकावें यांत पातक कोणतें ? तुम्हीं दिग्विजयांत अशक्त राजांस जिंकलें यांत तरी न्याय होता काय ? बाकी माझा तुला आग्रह नाहीं. " हें शकुनीचें खोंचदार उत्तर ऐकून धर्मराज म्हणाला, " बरें आहे. शकुनि, टाक फांसे, जें दैवीं असेल तें होईल. " ह्याप्रमाणें उत्तरें प्रत्युत्तरें होऊन द्यूत सुरू झालें. धर्मराज डावावर डाव हारूं लागला तों तों फांशांचें भूत त्याच्या माथ्यावर चढूं लागलें. हजार रुपये हारले, लाख हारले, कोट हारले, रथसंपत्ति हरली, अश्व-गज संपत्ति हरली, शेवटीं राज्य हरलें ! नंतर धर्मराजानें आपले भाऊ एकामागून एक पणास लावून हारले. शेवटीं स्वतः दास होण्याचा पण लावून स्वतःस हारविलें. अंध धृतराष्ट्र मोठ्या उत्सुकतेनें वारंवार " काय जिंकलें ! काय जिंकलें ! " असें विचारी व " अमुक जिंकलें, अमुक जिंकलें " असें त्यास लोक सांगत, तेव्हां त्यास आनंदाच्या उकळ्या फुटत. पण इतर सभ्यांच्या हृदयांत तेच शब्द भाल्याप्रमाणें टोंचत. शेवटीं शकुनि म्हणाला, " धर्मा, अजून एक पण बाकी आहे, आणि हा पण जिंकलास तर सर्व माघारें देतों. आपल्या बायकोस पणास लाव. " तेव्हां सर्व सभेंत ' धिक् धिक् ' असा शब्द निघाला ! पण वारंवार पराजयानें उत्पन्न झालेल्या उद्वेगानें अंध झालेला धर्मराज म्हणाला, " शकुनि, एक आणखी पण तुझ्या म्हणण्याप्रमाणें बायकोचा लावतों. कृश नव्हे, आणि लठ्ठही नव्हे, ठेंगणी नव्हे आणि उंचही नव्हे, शरदृतूंतील कमलाप्रमाणें जिचे डोळे विशाल आहेत व शरदृतूंतील कमलपुष्पाप्रमाणें जिच्या अंगास सुगंध आहे, जी माझ्या मागून झोंपीं जाते, आणि माझ्या अगोदर उठते, जी लहान नोकरापासून तों कुलगुरु धौम्यापर्यंत सर्वांस सारखें पाहते, सारांश, या संसारांत

जशी बायको असावी असें मनुष्यास वाटतें, तशी असलेली माझी प्रिय भार्या सती द्रौपदी मी पणास लावतों. " टाक फांसा." लागलीच शकुनीनें फासा टाकला आणि " जिंकला जिंकला " म्हणून आरोळी ठोकली, त्या वेळेस चांडाळ–चौकडीनें आनंदानें टाळ्या पिटल्या व इतर सभाजनांनी कानांत बोटें घातलीं. उन्मत्त दुर्योधन प्रातिकामी दूतास म्हणाला, " प्रातिकामी, जा, द्रौपदीस सर्व हकीकत सांग आणि तूं दुर्योधनाची दासी झाली आहेस, त्यानें तुला सभेंत बोलाविलें आहे असें सांग. " दूत अंतः-पुरांत जाऊन परत आला, आणि " जर धर्मराज द्यूतांत प्रथम दास झाला तर त्यास मला पणास लावावयाचा अधिकार राहिला काय ? " असा द्रौप-दीचा प्रश्न त्यानें सभेस विचारला. दुर्योधनानें दुःशासनास म्हटलें, " हा दूत सांगकाम्या आहे. " दुःशासन तात्काळ अंतःपुरांत गेला व द्रौपदीस सभेंत येण्याविषयीं आग्रह करूं लागला. " मी रजस्वला आहें ! मी एक-वस्त्रा आहें ! " इत्यादि तिनें पुष्कळ हरकती घेतल्या, पण तो दुष्ट कसचा मानणार ? शेवटीं त्याचा दुष्ट विचार पाहून द्रौपदीनें गांधारीच्या महालाकडे धांव घेतली; पण दुःशासनानें दोनचार पावलांतच तिच्या केसांस धरलें !

" एकवस्त्रा असलीस काय आणि विवस्त्रा असलीस काय, तूं आतां दासी आहेस, तुला सभेंत नेण्यास हरकत नाहीं " असें म्हणत तिला त्यानें सभेंत केस धरून खेचाटीत आणलें. तिची ती अनन्वित दुर्दशा पाहून सभें-तील लोकांनीं माना खालीं घातल्या ! धर्मराजानेंही तोंड खालीं घातलें ! क्रोधी भीम मात्र संतापानें लाल होऊन उठला आणि म्हणाला, ' जुवे-बाज हजारों पाहिले, पण आपल्या बायकोचा पण लावणारा हाच पाहिला ! याचे हे फांसे धरणारे हात जाळून टाकतों ! " पण अर्जुनानें भीमास काकुळतीनें म्हटलें, " भीमा, आजवर गुरूची तूं कधींही अमर्यादा केली नाहींस, तें तुझें सत्त्व तूं आज हरणार काय ? " हा प्रश्न ऐकून भीमही खालीं बसला. तेव्हां द्रौपदी निराश होऊन सभ्यांस म्हणाली, " महाराज, मी दासी आहें काय याचें मला उत्तर द्या. राजसभेंत बसून जो धर्मशास्त्राप्रमाणें आर्तांच्या प्रश्नास जबाब देत नाहीं तो अधःपातास जातो, यासाठीं माझ्या प्रश्नाचा योग्य जबाब तुम्हांस दिला पाहिजे. " तेव्हां भीष्मानें उत्तर केलें, " धर्मराजानें प्रथम स्वतः दास होऊन नंतर तुझा पण लाविला हें पाहतां,

व अन्यपक्षीं नवऱ्याच्या बायकोवरील सत्तेचा विचार करतां तूं दासी झाली आहेस कीं नाहीं याचा निर्णय करणें कठिण आहे. " हें भीष्माचें मुग्ध उत्तर ऐकून दुर्योधनास अत्यंत आनंद झाला. ज्या धर्मराज-द्रौपदीस त्यानें साम्राज्याच्या अभिषेकाच्या वेळीं वैभवाच्या शिखरावर बसलेलें पाहिलें होतें त्या चुलत भावास व भावजयीस दास्यरूपी दैन्याच्या रसातळास पोंचलेले पाहून त्याच्या नेत्रांचें पारणें फिटलें. त्यानें लागलींच दुःशासनास म्हटलें, " पांडवांचीं व द्रौपदीचीं वस्त्रें हरण कर. हे सर्व दास झाले आहेत. " पांडवांनीं आपलीं मौल्यवान् वस्त्रें टाकून दिलीं व ते सभेंत उघडे बसले, पण द्रौपदी आपलें मौल्यवान् वस्त्र कसें टाकणार ? ती वागुरेंत सांपडलेल्या हरिणीप्रमाणें कासावीस झाली व दुःशासनाकडे काकुळतीनें पाहूं लागली ! पण दुःशासनास तिची कींव यत्किंचितही आली नाहीं. त्यानें तिच्या वस्त्रास हात घातला. द्रौपदीनें पांडवांकडे पाहिले, पण त्यांनीं आपलीं मुखे खालीं केलीं होतीं ! अशा स्थितींत तिचा कोणी वाली उरला नाहीं ! विवस्त्र होण्याच्या भीतीनें ओणवी झालेली महासती द्रौपदी आपलें मुख हातांनीं आच्छादन करून गद्गदस्वरानें रुदन करीत जगताचा वाली प्रभु श्रीकृष्णाचा धांवा करून म्हणाली, " हे द्वारकावासी गोविंदा ! हे गोपीप्रिया श्रीकृष्णा ! कौरवांनीं माझा छळ मांडला आहे तें, सर्वज्ञा केशवा ! तुला कळलें नाहीं काय ? हे अनाथाच्या नाथा ! हे रमानाथा ! हे व्रजाच्या नाथा ! हे दुःख-नाशना जनार्दना ! कौरवांच्या अन्यायसमुद्रांत बुडणाऱ्या या द्रौपदीला हात दे ! हे कृष्णा, हे महायोगिन् श्रीकृष्णा, हे विश्वात्म्या, हे विश्वभावना गोविंदा ! मी तुला शरण आल्यें आहें ! कौरवरूपीकर्दमांत फसलेल्या या गाईचें रक्षण कर ! " *याप्रमाणें अनन्य भावानें द्रौपदीनें रुदन करीत श्रीकृष्णाचा धांवा केला, तेव्हां तो जगताचा प्रभु गहिंवरला. तो कृपासागर कृपेनें उचंबळून गेला आणि द्रौपदीचें वस्त्र दुःशासनानें ओढलें, तों धर्म-

* महाभारतांतलि द्रौपदीचा धावा लहान असून गोड आहे. तो पूर्वी प्रातःस्मरणांत लोक म्हणत असत, तो येथें देण्यासारखा आहे.

गोविंद द्वारकावासिन् कृष्ण गोपीजनप्रिय । कौरवैः परिभूतां मां किं न जानासि केशव । हे नाथ हे रमानाथ व्रजनाथार्तिनाशन । कौरवार्णवमग्नां मामुद्धरस्व जनार्दन । कृष्ण कृष्ण महायोगिन् विश्वात्मन् विश्वभावन । प्रपन्नां पाहि गोविंद कुरुमध्येऽवसीदतीम् ॥

स्वरूपी श्रीकृष्णानें तिला दुसरें नेसविलें. लुगड्यावर लुगडें ओढून दुःशासन थकला तरी द्रौपदी महावस्त्र नेसलेलीच ! शेवटीं दुःशासन लज्जेनें व थकव्यानें खालीं बसला, त्या वेळीं सभ्य जनांनीं त्याचा धिक्कार केला, व द्रौपदीचा " धन्य ! धन्य ! द्रौपदी महासती ! " असा स्तव केला. अंध धृतराष्ट्रास तो भयंकर प्रकार दिसला नाहीं. पण त्याचें अंतःकरण या धन्यवादानें कळवळलें. विदुरानें त्यास वस्तुस्थिति समजाविली; तेव्हां तो म्हणाला " सुनबाई, महासाध्वी द्रौपदी, तुझ्या अलौकिक धर्मपरतेनें तूं या आमच्या कुळास भूषण झाली आहेस. मी तुजवर या वेळीं प्रसन्न आहें. तुला हवें असेल तें माग. " तेव्हां द्रौपदीनें " माझे पति दास्यांतून मुक्त होऊन मला मिळावे " असा वर मागितला व तो धृतराष्ट्रानें दिला. " आणखी माग " असें धृतराष्ट्र म्हणाला, तेव्हां तिनें पतींचें राज्य परत मागितलें. धृतराष्ट्रानें तेंही दिलें व तो युधिष्ठिरास म्हणाला, " धर्मा, तुझें कल्याण असो. तूं आपल्या पतिव्रता भार्येसह व आपल्या भावांसह आपल्या राजधानीस परत जा आणि आपलें राज्य सांभाळ. माझ्याकडे पाहून दुर्योधनाचे अवगुण विसर आणि गुण तेवढे लक्षांत ठेव, व झालेल्या गोष्टीबद्दल त्यास क्षमा कर. सज्जन मृदूवर शस्त्रपात करीत नाहींत, तीक्ष्णावर करतात हें लक्षांत ठेव. " हें ऐकून युधिष्ठिर आपल्या बंधूंसह उठला व तेथून निघून मातेपाशीं जाऊन तिला व इतर स्त्रियांस घेऊन इंद्रप्रस्थास जाण्यास निघाला. इकडे अंध धृतराष्ट्रास दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनि या चांडाळचौकडीनें पुन्हां घेरलें. " सापाच्या शेपटीवर पाय देऊन तुम्ही त्यास जाऊं देतां हें काय ? यांत आमचा सर्वस्वीं नाश होईल. अर्जुन गांडीव धनुष्यास दोरी चढवून टणत्कार करीत रथांत बसला असें सांगतात. भीम तर क्रोधानें डोक्याभोंवतीं सारखी गदा फिरवीत आहे. तर पुढची भयंकर आपत्ति टाळावयाची असेल तर धर्मास पुन्हा द्यूतास बोलवा. आम्ही एकच पण लावतों. तो त्यानें जिंकला तर आम्ही बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगूं. आम्हीं पण जिंकला तर पांडवांनीं वनवासास जावें. तर मेहरबानी करून धर्मास परत बोलवा. " इत्यादि पोरांच्या काकुळतीवरून म्हाताऱ्यानें पुन्हा धर्मराजास बोलावणें पाठविलें. रथांत पाय टाकतां टाकतां धर्मराज पुन्हा परतला आणि तो पुन्हा पण हरला. शेवटीं धर्मराज व चारही

पांडव वल्कलें नेसून वनवासास निघाले ! सती द्रौपदीनें त्यांस सोडलें नाहीं. तीही वल्कलें नेसून त्याजबरोबर निघाली ! वृद्ध कुंती निरुपायानें विदुराच्या घरीं राहिली, व पांडवांच्या इतर स्त्रिया सुभद्रेसह आपआपल्या माहेरीं दुःख करीत निघून गेल्या ! ( भारत, स. ).

पांडवांवर याप्रमाणें कहर गुजरत असतां तिकडे श्रीकृष्णावर व द्वारकेवरही कहर कोसळत होता. शाल्वानें शंकरास प्रसन्न करून त्याजपासून द्वारकेवर स्वारी करण्यासाठीं एक प्रचंड विमान मागून घेतलें. द्वारकेच्या चारी बाजूंनीं मजबूत कोट असल्यानें व समुद्रानें वेष्टिलेल्या बेटांत द्वारकेची स्थापना असल्यानें द्वारकेवर हल्ला करणें इंग्लंडवर स्वारी करण्यासारखेंच कठिण, बहुतेक अशक्य होतें. अशा स्थितींत ज्याप्रमाणें जर्मन लोकांनीं विमानांची फौज तयार करण्याची कल्पना हल्लीं काढली आहे, त्याप्रमाणें शाल्वानें विमानांतून द्वारकेवर हल्ला करण्याची युक्ति योजिली.* ‘ सौभ ’ अथवा एक प्रशस्त विमान तयार करून त्यांत सर्व शस्त्रांची सामुग्री भरून त्यानें द्वारकेवर स्वारी केली. द्वारकेच्या भोंवतीं त्यानें आपलें सैन्य लावून देऊन शिवाय त्यानें सौभामधून द्वारकेवर दगड, बाण, शतघ्नी वगैरे टाकण्यास सुरवात केली. तेव्हां द्वारकेच्या लोकांस ‘ त्राहि त्राहि ’ झालें. श्रीकृष्ण या वेळीं बलरामासह आनर्तदेशास गेला होता. परंतु प्रद्युम्नानें वेढ्याचा प्रतिकार चांगला केला. त्यानें सर्व युद्धाचीं यंत्रें सज्ज केलीं. शहरांत येण्याचे रस्ते तोडून टाकिले. खंदकामध्यें तीक्ष्ण खिळे उभे केले. खंदकावरील व समुद्रावरील नावा बंद केल्या. कोणीही मुद्रेशिवाय शहराच्या आंत बाहेर येऊं जाऊं नये असा निर्बंध केला. सेनेंतील प्रत्येक शिपायाला त्याचा भरपूर पगार देऊन त्यास सर्व आयुधें दिलीं व परित्राणही दिलें. नंतर ठिकठिकाणीं शिपायाचे पहारे ठेविले. शहराच्या मध्यभागीं एक गुल्म स्थापन केला. तसेंच निरनिराळ्या भागांतून लहान गुल्म स्थापन केले. दरवाजांवरून शतघ्नी लाविल्या. याप्रमाणें व्यवस्था करून कोणींही सुरा पिऊं नये अशी

* ‘ सौभ ’ काल्पनिक मानलें तरी एअरशिपमधून वरतून किल्ल्यावर हल्ला करण्याची कल्पना पूर्वीचीच आहे, हें पाहून There is nothing new under the sun. पृथ्वीवर नवें कांहीं नाहीं, या इंग्रजी म्हणीची सत्यता दिसून येते.

दवंडी पिटवली. प्रद्युम्नानें शाल्वाच्या वेढ्याचा असा प्रतिकार करून त्यानें सौभावर अस्त्रें सोडण्यास सुरवात केली. वरतून दगडांचा व बाणांचा वर्षाव होई तितक्यांचा त्यानें आपल्या अस्त्रानें प्रतिकार केला. शेवटीं सौभपति शाल्व निरुपाय होऊन वेढा उठवून आपल्या देशास परत गेला. श्रीकृष्ण द्वारकेस परत आला, तेव्हां द्वारकेची दुर्दशा झालेली पाहून त्यास अतिशय क्रोध आला व त्यानें तात्काळ शाल्वाचा पाठलाग केला. मोठें सैन्य घेऊन श्रीकृष्ण शाल्वाच्या देशावर चाल करून गेला व अनेक देश ओलांडून त्यानें अखेरीस मार्तिकावत गांठलें. पण शाल्व आपली राजधानी सोडून सौभांत बसून समुद्राकडे पळाला. श्रीकृष्णानें तिकडेही त्याचा पाठलाग करून त्यास समुद्रकिनाऱ्यावर गाठलें. सौभांतून शाल्वानें श्रीकृष्णावर अनेक शस्त्रें टाकिलीं, परंतु श्रीकृष्णानें तेवढ्यांचा प्रतिकार करून शेवटीं आपल्या सुदर्शनानें सौभाचे दोन तुकडे केले. तेव्हां शाल्व जमिनीवर आला. श्रीकृष्णानें पुन्हां शस्त्र फेंकून शाल्वाचें शिर उडविलें. याप्रमाणें श्रीकृष्णाच्या शत्रूंपैकीं शाल्व हा एकटा शिल्लक राहिला होता, त्याचा श्रीकृष्णानें नाश केला, आणि तो द्वारकेस परत आला (भारत व०).

श्रीकृष्ण द्वारकेस परत आल्यावर त्यास पांडव द्यूतांत हरल्याची दुःखकारक हकीकत समजली. इतक्यांत सुभद्राही अभिमन्यूस घेऊन माहेरीं आली. तिच्या मुखांतून पांडवांचा व विशेषतः द्रौपदीचा झालेला छळ ऐकून त्यास अतिशय वाईट वाटलें. पांडवांस वनवासांत भेटून त्यांचें सांत्वन करण्यासाठीं श्रीकृष्ण तात्काळ निघाला. त्याजबरोबर वसुदेव, बलराम इत्यादि यादवही निघाले. पूर्वकाळीं प्रत्येक दोन राज्यांमध्यें सरहद्द अरण्याची असावयाचीच असा नियम होता. हीं अरण्यें कोणत्याही राज्याच्या मालकीचीं नसून त्यांत पाहिजे त्यास राहण्यास व फिरण्यास मोकळीक असे. अशा अरण्यांत वनवासास गेलेले क्षत्रिय, मेध्य, वन्य पशु मारून आपला चारितार्थ चालवीत. योगी व ब्राह्मण वन्य फलमूलें खाऊन रहात व धनगर लोक आपलीं गुरें चारीत इकडे तिकडे फिरत. अशा एका अरण्यांत पांडव द्रौपदीसह जाऊन राहिले होते; तेथें श्रीकृष्ण, बलराम, वसुदेव, सात्यकि इत्यादि यादव त्यांस जाऊन भेटले. परस्परांच्या भेटी होऊन दुःख करीत सर्वजण युधिष्ठिराभोंवतीं बसले असतां द्रौपदी श्रीकृष्णास शरण येऊन म्हणाली, "कृष्णा, तूं

प्रत्यक्ष श्रीविष्णूचा अवतार आहेस. तूं सत्य आहेस, तूं यज्ञ आहेस, तूं प्रजापति आहेस. तूंच ही चराचर सृष्टि उत्पन्न केली आहेस. तूंच इचें धारण करतोस. तूं प्रभु, तूं विभु, तूं लोकपाल आहेस. मनुष्याचें मर्त्यत्व तूंच आहेस, देवांचें अमरत्वही तूंच आहेस, त्या तुला देवा, मी आपलें दुःख निवेदन करतें! पांडवांची भार्या, आणि श्रीकृष्णा, तुझी प्रिय सखी, ती मी या केसांनीं धरून फरफटत सभेंत ओढली गेल्यें! स्त्रीधर्मात असतां, एकवस्त्र नेसलेलें असतां, मला कौरवांच्या सभेंत ओढून दुःशासनानें न्यावें काय? माझी ती अनान्वित दुर्दशा पाहून सभेंत बसलेले धृतराष्ट्राचे पुत्र खदखदां हांसले. पांडव, पांचाल आणि वृष्णि, जिवंत असतां माझा दासीभावानें उपभोग घेण्याची त्या दुर्योधनाची दुष्ट इच्छा होती. मी धृतराष्ट्राची आणि भीष्माची स्नुषा असतां मला त्यानें जबरदस्तीनें दासी केलें! कृष्णा, मी आपल्या पतींनाच दोष देतें. त्या दुष्ट धार्तराष्ट्रास कशास देऊं? माझे पति जिवंत आणि समोर असतांना त्यांनीं माझी ही दुर्दशा मुकाट्यानें पहावी ना? अगदीं गरीब किंवा अशक्त पति असला तरी तो सुद्धां आपल्या बायकोचें रक्षण करतो; मग हे समर्थ असून यांनीं माझी उपेक्षा केली! माझेकडे यांनीं पाहिलें सुद्धां नाहीं! माझ्या या पांच पतींपासून झालेल्या पांच पुत्रांकडे पाहून तरी माझी यांनीं कींव करायची होती! हा दुष्ट दुर्योधन अजून जिवंत आहे. तेव्हां भीमाच्या सामर्थ्यालाही धिक्कार असो! अर्जुनाच्या पौरुषालाही धिक्कार असो! मी पांच समर्थ पांडवांची प्रिय पत्नी! द्रुपदाची कन्या! पांडूची सून! त्या राजसूय यज्ञांत पुण्यजलानें सिंचित केलेल्या या माझ्या केसांना धरून दुःशासनानें मला फरफर ओढीत सभेंत नेलें!" असें म्हणतां म्हणतां द्रौपदी हातांनीं मुख झांकून रडूं लागली. तिचें रडणें अनावर होऊन तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा तिच्या स्तनावर टपटप पडूं लागल्या, व तिचा उरोभाग थरथर कांपूं लागला. शेवटीं ती रडत रडतच म्हणाली, "मला पतिही नाहींत, मला पुत्रही नाहींत, मला बंधु नाहींत, मला बापही नाहीं, कृष्णा, मला तूंही नाहींस! त्या क्षुद्रांनीं माझी अशी दुर्दशा केलेली तुम्ही सारे गिळून बसलां तेव्हां मी आणखी काय म्हणूं!" असें म्हणून आपलें मुख आच्छादन करून तिनें मुक्तकंठ रडण्यास प्रारंभ केला. तेव्हां श्रीकृष्ण तिचें सांत्वन करून म्हणाला, "द्रौपदी! ज्यांवर तूं योग्य

कारणास्तव इतकी क्रुद्ध झाली आहेस, त्यांच्या स्त्रिया याप्रमाणें रडरड रडतील. कृष्णे, त्यांचे पति अर्जुनाच्या बाणांनीं विद्ध होऊन समरांगणांत गतप्राण होऊन पडतील, हा तूं निश्चय समज! मी प्रतिज्ञा करून तुला सत्य सांगतों, तूं सर्व राजांची महाराज्ञी होशील. हें आकाश कोसळेल! हा हिमालय वितळून जाईल! ही पृथ्वी शकलें होऊन पडेल! किंबहुना समुद्रही कोरडा पडेल! पण माझी प्रतिज्ञा खोटी होणार नाहीं!" हें ऐकून द्रौपदीनें आपला मध्यम पति अर्जुन याजकडे तिर्यक् दृष्टीनें पाहिलें; तेव्हां अर्जुनानेंही तिचें समाधान करून म्हटलें, "शुभदर्शने द्रौपदी! नको रडूं! जें मधुसूदन बोलला आहे तें तसेंच होईल, मिथ्या कधीं होणार नाहीं." शेवटीं श्रीकृष्ण म्हणाला, "मी द्वारकेंत असतों तर हें निंद्य द्यूतच होऊं दिलें नसतें. पण मी शाल्वावर स्वारी करण्यासाठीं द्वारकेपासून फार दूर गेलों होतों. मला ही खबर द्वारकेंत पोंचती तर मी तावडतोब येऊन, भीष्म, द्रोण व धृतराष्ट्र यांची समजूत घातली असती. स्त्रिया, फांसे, मृगया आणि मद्य हीं राजांचीं चार भयंकर व्यसनें आहेत. प्रत्येक शास्त्र जाणणारानें यांजविषयीं राजास नेहमीं बोध करावा. विशेषतः द्यूताबद्दल त्यानें जरूर बोध करावा. कारण यांत वर्षानुवर्षें मिळविलेली संपत्ति एका दिवसांत नाहींशी होते, आणि तीही भोग घेतल्याशिवाय नाहींशी होते. शिवाय परस्पर शिव्यागाळी आणि निंदा हीं तर ठेवलेलींच. ह्या सर्व गोष्टी मीं कौरवांस समजाविल्या असत्या, आणि दुर्योधनास द्यूतापासून परावृत्त केलें असतें, आणि एवढें करूनही तो न ऐकता तर त्यास तात्काळ बांधून टाकिलें असतें. असो. आमच्या नशिबीं हें तुमचें दुःख पाहावयाचें होतें. ही तुमची दुर्दशा पाहून पाषाणासही दया येईल. तुम्ही ती कशी सहन कराल याचें मला गूढ पडलें आहे. तथापि धर्मराज आपल्या धर्मपरायणतेनें या संकटांतूनही पार पडेल; आणि तेरा वर्षांनंतर बहुधा ते दुष्ट तुम्हांस राज्य देणार नाहींत, तेव्हां माझें सर्व सामर्थ्य प्रकट करून मी त्या दुष्टांचा नाश तुमचेच हातून करवीन. तुम्ही शांतपणानें आणि धैर्यानें हे दुःखाचे दिवस काढा!" याप्रमाणें पांडवांचें व द्रौपदीचें सांत्वन करून श्रीकृष्ण व इतर यादव द्वारकेस परत आले (भारत, व०).

वनवासाचीं बारा वर्षें, अज्ञातवासाचें एक वर्ष अशीं तेरा वर्षें जशीं

पांडवांची दुःखांत गेलीं तशीं श्रीकृष्णाचींही गेलीं. त्याचें वय राजसूय यज्ञाच्या वेळीं फार तर ६९ वर्षांचें असून कौरवांच्या द्यूताचे वेळीं सत्तर वर्षांचें होतें. मध्यम वयाचा म्हणजे गृहस्थाश्रमाचा काळ पूर्वोक्त छांदोग्यांतील उताऱ्याप्रमाणें ६८ वर्षांचा असून त्यानंतर तृतीय सवनाचा म्हणजे उत्तर-वयाचा काळ लागतो. या काळांत मनुष्यानें गृहस्थाश्रमांतून मन काढून उपनिषदांकडे लावावें, धर्म—अर्थ—काम या त्रिवर्गास मागें टाकून मोक्षाकडे वळावें, असें धर्मशास्त्र आहे. पुत्राला पुत्र झाल्यानंतर अरण्याचा आश्रय करावा, असें मनूचें वचन आहे. श्रीकृष्णाचा नातु अनिरुद्ध या वेळीं मोठाच झाला होता. पांडवाच्या दुर्दशेनें श्रीकृष्णास उद्वेगही झाला. सारांश, इत-उत्तर संसारांत मन न घालतां मोक्षाकडे श्रीकृष्णानें लक्ष लाविलें. औपनिषद् तत्त्वांचें श्रवण, मनन सुरू करून त्यानें घोर आंगिरसापासून आत्मविद्या ग्रहण केली ( छांदोग्य॰ प्रपा॰ ३ ). निरानिराळ्या मतांचें व तत्त्वांचें संपूर्ण आकलन केलें. विद्वान् व ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणांचें पूजन करून त्यांजपासून मोक्षविद्या श्रवण करण्यांत त्यानें हा काळ घालविला. लहानपणीं मल्लश्रेष्ठ व तरुणपणीं धनुर्धरश्रेष्ठ, अशी त्याची कीर्ति होती; ती आतां योगिश्रेष्ठ अशी त्याची कीर्ति पसरली. जगताला मोक्षमार्ग उत्तम रीतीनें समजावून धर्मसंस्थापना अद्याप करावयाची होती. यासाठीं श्रीकृष्णानें हीं तेरा वर्षें द्वारकेंत राहून तपश्चरणांत व वैराग्यांत काढलीं. पांडवांनीं अज्ञातवासांतून प्रकट होऊन विराटाच्या राज्यावर आलेल्या कौरवांच्या स्वारीचा प्रतिकार केला. तेव्हां विराट संतुष्ट होऊन आपली सुंदर कन्या उत्तरा अर्जुनास देऊं लागला; परंतु ती माझी शिष्य असून मला मुलीसारखी आहे, माझा पुत्र अभिमन्यु आहे, त्यासाठीं मी तिचा स्वीकार करतों, असें त्यानें म्हटलें. अर्थातच विराटनगरास श्रीकृष्ण आनंदानें यादवांसह सुभद्रेस व अभिमन्यूस घेऊन गेला. अभिमन्यूचें वय या वेळीं सोळा वर्षांचें होतें. त्याचा जन्म राजसूयापूर्वी दिग्विजयाच्या वेळीं द्वारकेंत झाला होता. द्यूतानंतर जो द्वारकेंत आईबरोबर तीन वर्षांचा असतां आला तो तेरा वर्षें तेथेंच होता. श्रीकृष्णानें त्यास स्वतः धनुर्विद्या शिकविली होती. अर्जुनाचा पुत्र आणि श्रीकृष्णाचा शिष्य, मग तो महाधनुर्धर बनला यांत आश्चर्य काय? विराटाच्या नगरींत अभिमन्यूचा व उत्तरेचा विवाह झाल्यावर पांडवांनीं दुर्यो-

धनाकडे आपलें राज्य परत मागण्याविषयीं दूत पाठविले तुम्ही तेरा वर्षें पुरीं होण्यापूर्वी प्रगट झालां, तेव्हां तुम्ही पुन्हां तेरा वर्षें वनवास व अज्ञातवास करा, असा त्यानें भीष्मांच्या मताच्या विरुद्ध जबाब पाठविला. शेवटीं पूर्वी भाकित केल्याप्रमाणें गोष्ट लढाईवर आली आणि विराट व द्रुपद यांच्या सैन्यासह पांडव उपप्लव्य नांवाचें कौरवांच्या राज्याच्या सीमेवर शहर होतें तेथें तळ देऊन बसले. येथून त्यांनीं सर्व राजांना निरोप पाठवून मदत मागितली. अर्थात् दुर्योधनानेंही आपले दूत प्रत्येक राजाकडे पाठवून व आपली बाजू समजावून आपल्याकडे त्यांस मदतीस बोलाविलें. हा साम्राज्याचा तंटा साहजिकच सर्व हिंदुस्थानास व्यापून गेला, आणि निरनिराळे राजे आपापल्या ओढ्याप्रमाणें पांडवांस किंवा कौरवांस येऊन मिळाले. द्वारकेंत मदत मागण्याकरितां अर्जुन स्वतः धांवला. तें ऐकून दुर्योधनही स्वतः द्वारकेस गेला. दोघांनीं श्रीकृष्णास एकाच वेळीं गांठलें. श्रीकृष्ण निजला होता त्याच्या डोक्याशीं दुर्योधन मानानें बसला. अर्जुन शिष्य होता, तो सहजच पायांशीं बसला. श्रीकृष्ण थोड्या वेळाने उठून बसला, तों प्रथम त्यास अर्जुन दिसला. अर्जुनानें हात जोडून आपला हेतु सांगितला. इतक्यांत दुर्योधन दिसला; त्यानेंही आपला भाव सांगितला. तेव्हां श्रीकृष्णानें उत्तर केलें, " तुम्ही दोघे माझे संबंधी सारखेच आहां, ( अर्जुन मेहुणा तर दुर्योधन व्याही होता ) आणि मला सारखेच मान्य आहां. पण मी आतां म्हातारा ८३ वर्षांचा झालों आहें. माझ्यानें लढवत नाहीं. युक्तीच्या चार गोष्टी पाहिजे असल्यास सांगेन. मला एकानें घ्यावें आणि माझें सैन्य दुसऱ्यानें घ्यावें. अर्जुन लहान आहे, तेव्हां प्रथम मागण्याचा हक्क त्याचा आहे. बोल अर्जुना, तुला काय पाहिजे ? " अर्जुनानें तात्काळ श्रीकृष्णासच पसंत केलें. दुर्योधनास श्रीकृष्ण नकोच होता, तेव्हां त्याला सैन्य मिळालें. याप्रमाणें ते दोघेही संतुष्ट झाले. नंतर दुर्योधन बळरामाकडे गेला. त्यानें श्रीकृष्ण अर्जुनाकडे गेला हें ऐकून दुर्योधनाकडेच जाण्याचें त्याच्या मनांत होतें, तरी तें बाजूस ठेविलें आणि " मी कोणाकडेच येऊं शकत नाहीं, मला तीर्थयात्रेला जावयाचें आहे " असें सांगितलें. बाकी यादववीर दोहों बाजूंत वांटले गेले. सात्यकि अथवा युयुधान अर्जुनाचा शिष्य होता तो अर्जुनाकडे गेला; व कृतवर्मा हार्दिक्य हा पहिल्यापासून श्रीकृष्णाच्या विरुद्धच होता;

स्यमंतक मण्याच्या वेळेस त्यानें शतधन्व्यास श्रीकृष्णाविरुद्ध साहाय्य केलें होतें; तो भोज, अंधक, कुकुर इत्यादि सेना घेऊन दुर्योधनाकडे गेला. याप्रमाणें इतर राजेही कोणी इकडे तर कोणी तिकडे येऊन, पांडवांकडे सात अक्षौहिणी सैन्य जमा झालें व दुर्योधनाकडे अकरा अक्षौहिणी सैन्य जमा झालें. * दुर्योधनानें तेरा वर्षांच्या अवधींत भावी युद्धास अनुलक्षूनच पुष्कळांस प्रसन्न केलें होतें. असो. हिंदुस्थानचे सर्व राजे दोन्ही पक्षांत वाटले जाऊन हस्तिनापुरांत व उपप्लव्यांत सैन्यांसह आले,तेव्हां दाक्षिणात्य

| पांडवांकडे | | कौरवांकडे | |
|---|---|---|---|
| १ युयुधान, सात्यकि, यादवांसह अक्षौ० | १ | १ भगदत्त, प्राग्ज्योतिषपति, (चीन, किरात वगैरे पिंवळ्या लोकांसह ) अक्षौहिणी | १ |
| १ विराट, मत्स्यांसह. | १ | १ भूरिश्रवा, पंजाबी. | १ |
| १ द्रुपद, पांचालांसह. | १ | १ शल्य, मद्रांसह. | १ |
| १ शिशुपालपुत्र, चेदींसह.. ( शिशुपाल व पांडव मावसभाऊ होते. ) | १ | १ कृतवर्मा भोजादिकांसह. | १ |
| १ जयसेन जरासंधपुत्र, मगधांसह, ( जरासंधास मारल्यावर जरासंधाची मुलगी सहदेवानें केली होती. ) | १ | १ जयद्रथ सिंधुसौवीरांसह. | १ |
| १ पांड्य, समुद्रवासीयांसह. | १ | १ सुदक्षिण, ( कांबोज, यवन, अफगाण इत्यादि दाढीवाल्यांसह. ) | १ |
| १ धृष्टकेतु, चेकितान, पुरुजित्, कुंतिभोज इत्यादि इतर मिळून. | १ | १ नील, माहिष्मति ( दाक्षिणात्यांसह. ) | १ |
| | | १ विंद, अनुविंद, आवंत्य ( मालवांसह. ) | १ |
| | | १ कैकय बंधु पांच पंजाबी. | १ |
| | | १ इतर राजे. | १ |
| | | स्वतः कौरव | १ |
| | ७ | | ११ |

* दोन्ही पक्षांकडे फौजा जमा झाल्या त्यांचा तपशील वरीलप्रमाणें:—

रुक्मी कृष्णाचा मेहुणा कोणीकडेसच झाला नाहीं. तो गर्विष्ठ राजा उपप्लव्यास येऊन पांडवांस म्हणाला, " तुम्ही भितां कां, मी एकटाच दुर्योधनाचा समाचार घेतों. " तेव्हां पांडवांनीं " आम्ही कोणासच भीत नाहीं, तुम्ही खुशाल दुर्योधनाकडे जावें " असें त्यास सांगितलें. तो दुर्योधनाकडे गेला पण त्यासही त्यानें आपल्या उन्मत्तपणानें चिडविल्यामुळें त्यानेंही त्याची मदत नाकारली. तेव्हां तो स्वदेशीं परत गेला. असो. याप्रमाणें भरतखंडांतील बहुतेक सर्व क्षत्रिय आपापल्या फौजा घेऊन भिन्न भिन्न पक्षांस मिळून लढाईस सिद्ध झाले ( भारत, उद्यो० ).

प्रत्यक्ष लढाई सुरू करण्यापूर्वी शिष्टसांप्रदायास अनुसरून सामानें तंट्याचा निकाल लावण्याविषयीं धर्मप्रिय व दयाशील धर्मराजानें पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. धृतराष्ट्रानें धर्मराजाकडे संजयाबरोबर " तूं धर्मशील आहेस तर व्यर्थ प्राणहानि कां करतोस ? " असा कपटाचा निरोप पाठविला, तेव्हां त्याजला धर्मराजानें नम्रतेचें उत्तर दिलें, " आम्ही सर्वथैव तुझ्या हातांत आहों, तूं आमचा सर्वांचा पिता असून स्वामी आहेस. दुर्योधनानें व दुःशासनानें जें जें निंद्य कर्म केलें तें तें आम्ही विसरलों आहों. तूंच आम्हांस राज्य वांटून दिलें आहेस आणि आतां आमचें राज्य आम्हांस परत देण्यास तूंच समर्थ आहेस. काका, शमासाठीं मी इतकेंही कबूल करतों कीं, आम्हां पांच भावांस पांच गांवें कुशस्थली, वृकस्थली, माकंदी, वारणावत आणि कोणतें तरी आणखी पांचवें तूं देशील त्यांत मी संतुष्ट आहें. यापेक्षां मी जास्त काय सांगूं ? माझें बोलणें अन्यायाचें असेल तर या धर्मश्रेष्ठ वासुदेवानें सांगावें. " तेव्हां श्रीकृष्णानें संजयास सांगितलें, " हा भयंकर भावी अनर्थ न व्हावा या हेतूनें मी स्वतः येऊन कौरवसभेंत धृतराष्ट्राची व दुर्योधनाची समजूत करण्याचा यत्न करतों. " संजय परत गेल्यावर श्रीकृष्णानें, दुष्टांची समजूत करणें कठिण आहे हें जाणत असूनही, ज्याप्रमाणें मृत्यु स्वतः मारीत नाहीं, तर कोणत्या तरी रोगास पुढें करून मारतो, त्याप्रमाणें दुष्टांच्या संहारापूर्वी त्यांचा पूर्ण अपराध त्यांच्या पदरांत घालण्याकरितां, स्वतः हस्तिनापुरास जाण्याचा निश्चय केला ( भारत, उ० ).

☆

# भगवद्गीतापर्व

शरदृतु संपून हेमंत लागण्याच्या सुमारास, कार्तिक महिन्यांत, सर्व देशांत तृणाची व धान्याची समृद्धि झाली असतां, रेवती नक्षत्रावर, प्रातः—कालीं सूर्याचे मृदु किरण चोहोंकडे पसरूं लागले. अशा शुभ वेळीं, मैत्र मुहूर्तानें श्रीकृष्ण कौरवांकडे जाण्यास निघाला. त्यानें पहांटेस उठून स्नान करून सर्व पौर्वाण्हिक क्रिया आटोपून आपल्यास अलंकृत केलें. सूर्योदय होतांच सूर्याची व अग्नीची उपासना करून शिबिराबाहेर पडला. नंतर वृषभास पाठीवर स्पर्श करून व ब्राह्मणांस नमस्कार करून त्यानें रथांत पाय ठेविला, आणि सात्यकीस रथावर घेऊन प्रयाण केलें. त्या वेळीं रथाच्या घोषानें पृथ्वी व आकाश भरून गेलीं. योगीश्वर भगवान् श्रीकृष्ण हस्तिनापुरास जात आहे ही बातमी चोहींकडे पसरलीच होती. उपप्लव्या-पासूनच रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं हजारों लोकांचे थवे श्रीकृष्णाचें दर्शन घेण्यास उभे होते. त्यांचें नमस्कार घेत घेत व परचक्राच्या दुःखापासून सदोदित मुक्त असल्यानें अत्यंत समृद्ध असलेल्या त्या कुरुराष्ट्रांतील लोकाची सुस्थिति पहात पहात, श्रीकृष्ण दुपारच्या सुमारास शालिभवन नांवाच्या एका रमणीय नगरास पोंचला. पण तेथें मुक्काम न करितां श्रीकृष्ण पुढें निघाला तों सायंकाळीं अस्तास जाणाऱ्या सूर्याच्या रक्त किरणांनीं आकाश तांबडें होऊं लागलें, अशा वेळीं वृकस्थलास पोहोंचला. तेथें रथांतून खालीं उतरून त्यानें घोडे सोडण्याविषयीं आज्ञा केली. मग शुचिर्भूत होऊन संध्येची उपासना करून जमलेल्या ब्राह्मणांसह त्यानें सुमृष्ट अन्नाचें भोजन केलें व तेथेंच रात्रीं वस्ती केली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सर्व आन्हिक क्रिया आटोपून त्यानें पुनः प्रयाण केलें, तें सायंकाळच्या सुमारास हस्तिनापूर गांठलें. त्याचें दर्शन घेण्याकरितां जमलेल्या लोकांची गर्दी सर्व

रस्त्याभर वाढतच होती. हस्तिनापुराबाहेर तर प्रचंड जनसमुदाय श्रीकृष्णाचें दर्शन घेण्यास उभा होता. भीष्म, द्रोण वगैरे कौरवांचे अधिकारी व दुर्योधनाखेरीज धृतराष्ट्राचे सर्व पुत्र श्रीकृष्णाचें स्वागत करण्याकरितां सामोरे आले होते. भीष्माशीं थोडेंसें भाषण झाल्यावर सर्व मंडळी शहरांत जाण्यास निघाली. सर्व नगर धृतराष्ट्राच्या आज्ञेनें अलंकृत केलें होतें, व रस्त्यावर ठिकठिकाणीं रत्नादिकांनीं उत्तम आरास केली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंचीं घरें पाहण्यास बसलेल्या स्त्रियांनीं इतकीं गच्च भरून गेलीं होतीं कीं, तीं घरें हालत आहेत असें वाटलें. पांढऱ्या रंगानें रंगविलेल्या अनेक मंदिरांनीं शोभिवंत झालेल्या धृतराष्ट्राच्या वाड्याशीं येतांच श्रीकृष्ण रथाखालीं उतरला व राजवाड्यांत शिरून तीन कक्षा ओलांडून जेथें वैचित्रवीर्य धृतराष्ट्र बसला होता तेथें पोंचला. भीष्म द्रोणांसह धृतराष्ट्रानें उठून त्याचें स्वागत केलें व एका मुद्दाम आणून ठेविलेल्या सुवर्णाच्या आसनावर त्यास सन्मानानें बसविलें. नंतर पुरोहितांनीं मधुपर्कानें त्याची पूजा केली ती त्यानें आदरानें घेतली. कांहीं वेळ स्वागतांचीं प्रश्नोत्तरें व व्याहीपणाच्या नात्यांचीं थट्टेचीं भाषणें कौरवांशीं झाल्यावर धृतराष्ट्राचा निरोप घेऊन श्रीकृष्ण विदुराच्या घरीं जावयास निघाला. दुर्योधनानें आपल्या येथें येऊन राहण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला; पण श्रीकृष्णानें मान्य केलें नाहीं. विदुरानें आपल्या घरीं अत्यंत मनोभावानें गोविंदाचें आतिथ्य केलें. धर्मार्थाविषयीं नित्य दक्ष असलेल्या त्या मत्सररहित विदुरानें पांडवांसंबंधानें अनेक कुशल प्रश्न केले. त्यांचीं समर्पक उत्तरें देऊन श्रीकृष्णानेंही त्यास पांडवांकडील वर्तमान सविस्तर सांगितलें. किंबहुना, त्या दोघां महात्म्यांचीं भाषणें रात्रभर संपलीं नाहींत.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं उठून नित्याप्रमाणें आन्हिक आटोपून श्रीकृष्ण राजसभेत जावयास तयार झाला, तों दुर्योधन व शकुनि त्यास भेटावयास आले व त्यांनीं धृतराष्ट्र राजसभेंत जाऊन बसला असें सांगितलें. नंतर ब्राह्मणांस हिरण्य, वस्त्रें व गाई दान करून श्रीकृष्णानें अग्नीस प्रदक्षिणा घातली, व ब्राह्मणांस नमस्कार केला. मग गळ्यांत कौस्तुभमणि घातल्यानें अधिक देदीप्यमान झालेला श्रीकृष्ण कौरवांच्या मंडळींतून, रक्षण करणाऱ्या यादवांसह रथाजवळ आला, आणि रथांत विदुरासह बसून निघाला.

श्रीकृष्णाच्या रथाचा जवळ आलेला आवाज ऐकतांच कौरवसभेंतील सर्व राजे आनंदानें व उत्सुकतेनें सभाद्वाराकडे पाहूं लागले. क्षणभरानें सर्व बलवा-नांचा व बुद्धिवानांचा अग्रणी जनार्दन सभेंत शिरतांच धृतराष्ट्रासहित भीष्म-द्रोण उभे राहिले, व त्याबरोबरच उत्थापन देणाऱ्या शेंकडों राजांच्या तल-वारींचा खडखडखड आवाज त्या विस्तीर्ण सभेंत भरून गेला. श्रीकृष्णा-करितां धृतराष्ट्राजवळ एक रत्नखचित सुवर्णमंचक ठेविला होता, त्याजवर श्रीकृष्ण विदुरास घेऊन बसला; तेव्हां सात्यकीस दुःशासनानें आपल्या आस-नावर जागा दिली. दुर्योधन व कर्ण एकाच आसनावर श्रीकृष्णापासून थोड्याच अंतरावर बसले. याप्रमाणें सर्व लोक आपआपल्या स्थानीं बस-ल्यावर श्रीकृष्णाचें भाषण ऐकण्यासाठीं ती राजसभा स्तिमित झाली. तेव्हां श्रीकृष्णानें धृतराष्ट्राकडे वळून बोलण्यास प्रारंभ केला, " धृतराष्ट्रा, कौरव-पांडवांचा स्नेह व्हावा व लक्षावधि वीरांचा प्राणनाश होऊं नये याजविषयीं प्रयत्न करण्यासाठीं मी येथें आलों आहें. राजा, हें कौरवकुल सर्व राजकुलांत श्रेष्ठ असून श्रुत व वृत्त या सद्गुणांनीं संपन्न आहे. अशा या कुलांत, विशे-षतः तुझ्या निमित्तानें, हा भयंकर प्रकार घडूं पहात आहे हें योग्य नव्हे. अंतर्बाह्य कोणत्याही रीतीनें या कुलांत मिथ्या आचरण करणाऱ्यावर तुझी सर्वथा सत्ता आहे. असे असतां तुझे दुर्योधनादि पुत्र धर्म आणि अर्थ या दोहींचा अनादर करून नृशंस वर्तन करूं पहात आहेत, हें काय ? यांज-पासून उत्पन्न होणारी आपत्ति कौरवकुळाचाच नव्हे तर सर्व पृथ्वीचा नाश करील. राजा, तुझ्या हातीं शम आहे. पांडव पराक्रमी आहेत, त्यांस तूं आपले करून घेतल्यास या कुरुराज्यावर देवसेनेसह इंद्रसुद्धां स्वारी करूं शकणार नाहीं, मग इतर राजांची काय कथा ? तर या पांडवांस समजावून व पूर्वीप्रमाणेंच आपल्या पोटाशीं धरून तूं सर्व पृथ्वीचें साम्राज्य भोग. युद्ध झाल्यास उभयपक्षीं क्षय होईल, यांत हित कोणतें ? पांडव रणांगणांत पडले किंवा तुझे पुत्र पडले, दोन्ही पक्षीं तुला काय मिळेल हें मला सांग. राजा, हे पांडवही तुझेच आहेत व हे पुत्रही तुझेच आहेत; यांचा तूं नाश करूं नकोस. तूं जर आपल्या प्रकृतीवर स्थिर राहशील तर सर्व गोष्टी साध-तील. तूं पांडवांवर पूर्वी जें प्रेम केलेंस तेंच तूं आज मृत्यु समीप आला असतां कर आणि कौरवपांडवांचा संधि घडवून आण. हे जमलेले राजे

एकमेकांस आनंदानें भेटून एके ठिकाणीं भोजनपान करून शांततेनें आप-आपल्या देशांस जाऊं दे. यांत तुझा धर्म आणि अर्थ या दोहोंचें रक्षण होईल. धृतराष्ट्रा, पांडवांनीं तुझा प्रसाद मागून विनंति केली आहे, "ताता, तुझ्या आज्ञेनें आम्हीं सर्व दुःखें निमूटपणें सोशिलीं. आमचा ज्येष्ठ पिता आपलें वचन वनवासाअंतीं खचित पाळील, या भरंवशावर आम्ही आपल्या कराराबाहेर वागलों नाहीं. याजबद्दल हजारों ब्राह्मण साक्ष आहेत. तर आम्ही समय पाळीत आहों, त्याप्रमाणें तूं पाळ आणि आम्हांस आमचा राज्यांश दे. या राजसभेलाही पांडवांची हीच विनंति आहे. तुम्ही सर्व धर्मज्ञ आहा. सभासदांच्या समक्ष, जर अधर्मानें धर्माचा व असत्यानें सत्याचा नाश होईल तर तें पातक सभासदांस लागेल. यासाठीं जर माझें वचन कोणत्याही रीतीनें अयोग्य असेल तर तुम्हीच सांगा. धृतराष्ट्रा, या सर्व राजे लोकांस मृत्युपाशापासून तूं सोडीव, व क्रोधाचा आश्रय न करितां शमाचा आश्रय कर. मी पांडवांचें नव्हे, तर सर्वांचेंच श्रेय इच्छितों. अर्थाला अनर्थ समजून व अनर्थाला अर्थ मानून अतिलोभास गुंतलेल्या या तुझ्या पुत्रांचा तूं निग्रह कर. तूं सांगशील तें ऐकण्यास पांडव तयार आहेत. तूं तसेंच म्हणशील तर ते युद्धासही तयार आहेत. यासाठीं या वेळीं जें अत्यंत युक्त आहे तें तूं कर, असें माझें तुला कळकळीचें सांगणें आहे." हें केशवाचें धर्मार्थसहित भाषण ऐकून सर्व सभा रोमांचित झाली. कोणींही विरुद्ध भाषण करण्याचें मनांत आणिलें नाहीं. शेवटीं धृतराष्ट्र म्हणाला, "धर्म आणि न्याय यांस अनुसरून इहलोकीं जें सुखकर तेंच तूं मला वचन सांगितलें आहेस. हा मूर्ख दुर्योधन जें करीत आहे तें मलाही पसंत नाहीं. पण त्याजवर माझ्या बोलण्याचा परिणाम होत नाहीं. याकरितां जनार्दना, तूं त्याला कांहीं सांगून पहा." हें ऐकून श्रीकृष्ण दुर्योधनाकडे वळून म्हणाला, "बा दुर्योधना, तुला तुझ्या बंधूंसहवर्तमान शमाच्या हेतूनें जें मी बोलत आहे त्याजकडे लक्ष दे. तूं महा-प्राज्ञांच्या कुळांत उत्पन्न झाला आहेस, व स्वतः शील व वृत्त यांहीं संपन्न आहेस. प्राज्ञ, सुज्ञ, उत्साही, बहुश्रुत, आत्मवान् अशा पांडवांशीं संधि करणें हेंच तुला श्रेयस्कर आहे. कारण शमापासून ज्ञातींचें आणि मित्रांचें कल्याण आहे इतकेंच नाहीं, तर सर्व जगताचें कल्याण आहे. विशेषतः तुझ्यासारख्या श्रुतवान्, ऱ्हीमान्, आनृशंस्यवान् पुरुषानें

मातापितरांचें वचन अवश्य ऐकावें. अत्यंत आपत्ति आली असतां मनुष्यास आपल्या पित्याच्या बोलण्याची आठवण होते. सुहृदांचें भाषण जो वेळीं ऐकत नाहीं त्याला परिणामीं पश्चात्ताप होतो. जो सुहृदांचें वचन बाजूस ठेवून असताच्या नादीं लागतो तो घोर विपत्तींत पडून मग त्यास कोणी त्राता रहात नाहीं. इंद्रतुल्य पराक्रमी बंधूंस सोडून परांचा आश्रय तुझ्याशिवाय कोण वेडा करील? जन्मप्रभृति तूं पांडवांचा विनाकारण द्वेष केलास; परंतु ते तुझा द्वेष करीत नाहींत. कारण त्याचें सर्व लक्ष धर्मावर आहे. शहाण्या मनुष्यानें धर्म, अर्थ व काम या तिहींकडे लक्ष द्यावें. तिन्हीं साधत नसतील तर धर्म व अर्थ यांकडे द्यावें. दोहींचा विरोध असेल तर धीर मनुष्यानें धर्माच्या अनुरोधानें वागावें. कारण धर्माच्या अनुरोधानें अर्थ व काम हे शेवटीं मिळणारेच आहेत. धर्माला सोडून अर्थ व काम कधींही प्राप्त होणार नाहींत. यासाठीं धर्माचा आश्रय करून तूं पांडवांशीं संधि कर. जो मनुष्य आपली किंमत जाणतो तो दुसऱ्याचा अवमान कधींहि करीत नाहीं. प्राकृत मनुष्याची सुद्धां कोणी किंमत कमी करीत नाहीं, मग पांडवांसारख्या नरर्षभांना बाजूस टाकून इतरांपासून तूं रक्षण इच्छितोस हें ठीक नव्हे. दुःशासन, शकुनि, कर्ण, किंबहुना भीष्म-द्रोण सुद्धां अर्जुनाशीं बरोबरी करूं शकत नाहींत, आणि माझें साहाय्य अर्जुनास असल्यावर पुरंदरसुद्धां त्याच्याशीं सामना करण्यास समर्थ नाहीं, हें लक्षांत ठेव. तूं आपल्या हट्टासाठीं बंधु, पुत्र व हे हजारों राजे मारूं नकोस. तेही राहोत व ह्या तुझ्या कुलाचा नाश होऊन कुलघ्न अशी तुझी अपकीर्ति होईल, ती तूं होऊं देऊं नको!" हें शौरीचें अर्थपूर्ण भाषण ऐकून धृतराष्ट्र दुर्योधनास म्हणाला, "दुर्योधना, महात्मा शौरि जें म्हणत आहे, तें तूं ध्यानात घे, आणि त्यांचें अत्यंत कल्याणकारक वचन मान. वासुदेव सर्वांत समर्थ आहे. त्याच्याशीं तूं विरोध मांडूं नकोस. मला कालप्राप्त हेच वाटतें कीं, त्याच्या वचनाच्या बाहेर त्वां जाऊं नये." भीष्म-द्रोणांनींही याच उपदेशास पुष्टि दिली, आणि ते म्हणाले, "जोंपर्यंत अर्जुन व कृष्ण कंबर बांधून युद्धास सज्ज झाले नाहींत, जोंपर्यंत भीम आपली गदा घेऊन सैन्याच्या शिरोभागीं उभा राहिला नाहीं, तोंपर्यंतच हें युद्ध बंद कर; आणि तुला तुझ्या वीरबंधूंशीं संमत झालेला पाहून ह्या सर्व राजांच्या नेत्रांतून आनंदाश्रु

पडूं दे. " हीं निरनिराळीं भाषणें ऐकत असतां दुर्योधनाचें तोंड रागानें लाल होत होतें. शेवटीं तो म्हणाला, " तुम्ही सर्वच मला दोष देतां याचें मला आश्चर्य वाटतें. राजा, विदुर, भीष्म, आणि कृष्णा, तूंही माझाच अपराध आहे, असें धरून चालतां याचें कारण काय ? पांडव द्यूत खेळले व पण हरले हा माझाच अपराध ! आमच्या कोणत्या आगाळिकी-साठीं पांडव व संजय आम्हांवर चालून आले आहेत ? आम्ही अशा दटावणीला किंवा तयारीला भिणारे नाहीं. भीष्म, द्रोण व कर्ण देवांस सुद्धां जिंकले जाणार नाहींत, मग पांडवांची काय कथा ? बरें, धर्मानुसार युद्ध करीत असतां आम्हांस मरण आलें तर तेंही श्रेयस्करच आहे. नेहमीं उद्यम करावा, पण दुसऱ्यास नम्र होऊं नये; किंबहुना ऊंस जसा मध्येंच मोडतो, पण वांकत नाहीं, त्याप्रमाणें अकालीं सुद्धां मरावें पण वांकूं नये, असें सर्व खऱ्या क्षत्रियाप्रमाणें माझें मत आहे. माझ्या पित्यानें पूर्वी जो राज्यांश चुकून पांडवांस दिला तो मी जिवंत आहें, तोंपर्यंत तरी आतां त्यांस मिळणार नाहीं. पांडव पांच गांवांवरही तुष्ट होतील, पण सुईच्या अग्रानें निघेल इतकी मृत्तिका सुद्धां त्यांस देण्यास मी तयार नाहीं. " हें भाषण ऐकून श्रीकृष्णाचे नेत्र क्रोधानें लाल झाले, व तो म्हणाला, " ठीक आहे ! तुझ्या इच्छेप्रमाणेंच होईल. महाघोर संग्राम होईल, तेव्हां तूं स्थिर रहा; म्हणजे तुला मागितल्याप्रमाणें वीरशयनच मिळेल. पण तूं जें म्हणतोस कीं पांडवांचा मी अपराध केला नाहीं,तर तूं केलेले अपराध ऐक. सज्जनांच्या सुद्धां बुद्धीस भ्रष्ट करणारें द्यूत खेळून पांडवांची संपत्ति हरण करण्याची दुष्ट क्लृप्ति शकुनीच्या साहाय्यानें तूं योजलीस. जें कोणीही अन्य मनुष्य कर-णार नाहीं, ते भ्रातृपत्नीला सभेंत ओढून आणण्याचें व तिला भलतीं भाषणें बोलण्याचें नीच कृत्य तूं केलेंस. वारणावतांत पांडवांस कुंतीसह जाळण्याचा प्रयत्न तूं केलास आणि आतां न्यायानें आपलें राज्य मागत असतां पांडवांस तें देण्यास तूं हरकत करतोस. वडिलांच्या आणि सुहृद् यांच्या उपदेशाचा अव्हेर करून तूं हा अनर्थ उत्पन्न करीत आहेस ! असो. भ्रष्टैश्वर्य होऊन रणांत पडशील तेव्हां तूं हें राज्य पांडवांस आपण होऊन देशील. " असें श्रीकृष्ण बोलत आहे, तो दुःशासन कुत्सितबुद्धीनें मध्येंच म्हणाला, " दुर्योधना, कृष्णाचें म्हणणें ऐक; नाहींतर तुला बांधून कौरवांकडून

हा केशव पांडवांच्या स्वाधीन करवील. तुला, मला आणि कर्णाला, भीष्म, द्रोण व तुझा पिता अनर्थाचें मूळ समजून बांधून पांडवांच्या स्वाधीन करतील असें मला वाटतें." हें ऐकतांच दुर्योधन रागानें उठला, व पित्याची परवानगी न घेतां व भीष्म, द्रोण, कृप, विदुर, शल्य, इत्यादिकांचा अनादर करून सभेंतून चालता झाला. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला, "हे कुरुवृद्धांनो, हा तुमचा सर्वांचा अपमान आहे, याकरितां या मंदबुद्धि दुर्योधनास खरोखरच बंधनांत टाका, आणि सर्वांचें हित साधण्यासाठीं पांडवांशीं सख्य करा. ज्ञातीचें कल्याण व्हावें यासाठीं मीं कंसास ठार मारलें. दैत्यदानवांचें व देवांचें भयंकर युद्ध होऊन अतिशय प्राणहानि होऊं लागली, तेव्हां प्रजापतीनें दैत्यदानवांस पाशानें बांधून वरुणाच्या स्वाधीन केलें, ते अद्याप त्याच्या ताब्यात समुद्रांत आहेत. दुर्योधन, शकुनि व कर्ण यांस बंधनांत टाकून संधि करावा, ही कल्पना वाईट नाहीं. कुटुंबाकरितां एका मनुष्याचा त्याग करावा. सर्व गांवाकरितां एका कुलाचा त्याग करावा. सर्व देशाकरितां एका गांवाचाही नाश करावा, अशी नीति आहे. तर राजा, दुर्योधनाचा त्याग करून पांडवांशीं सख्य कर, म्हणजे लक्षावधि वीरपुरुषांचा नाश होणार नाहीं." असें श्रीकृष्ण बोलत आहे, तों बाहेर दुर्योधनानें व शकुनीनें "तडकाफडकी काम करणारा कृष्ण आपल्यास कैद करणार त्यापूर्वी त्यासच आपण कैद करूं या" असा बेत चालविला. "कृष्ण अटकेत पडला म्हणजे पांडव सहजच हतवीर्य होतील" असें ते म्हणूं लागले. ती बातमी हेरानें विदुराच्या कानांत सांगितली. तेव्हां विदुरानें धृतराष्ट्रास त्याच्या पुत्राच्या उन्मत्त विचाराविषयींचें वर्तमान सांगितलें. तेव्हां श्रीकृष्ण धृतराष्ट्रास म्हणाला, "राजा, मला दुर्योधनास कैद करण्याची परवानगी दे; ते मला कैद करितात कीं मी त्यास कैद करतों हेंच तूं पहा. भावी युद्धाचा निकाल येथेंच होईल. परंतु तुझ्या परवानगीवाचून मी हें कर्म करूं शकत नाहीं. हें ऐकून अंतर्यामीं पुत्रांकरितां घाबरलेल्या पुत्रप्रिय धृतराष्ट्रानें विदुरास 'त्या मूर्ख राज्यलुब्ध दुर्योधनास सभेंत घेऊन ये,' अशी आज्ञा केली. त्याप्रमाणें विदुरानें बाहेर जाऊन दुर्योधनास सभेंत आणलें, तेव्हां धृतराष्ट्र त्यास म्हणाला, "दुष्ट, पापी मनुष्यांच्या साहाय्यानें पापकर्म करूं इच्छितोस! पण मूर्खा! हा केशव, देव,

मनुष्य, गंधर्व, असुर, यांनासुद्धां अजिंक्य आहे, हें तुला ठाऊक नाहीं काय ? जसा मनुष्य चंद्रास स्पर्श करूं शकत नाहीं, किंवा वायूस धरूं शकत नाहीं, त्याप्रमाणें ह्या केशवास कोणीही ग्रहण करूं शकत नाहीं. ” असें धृतराष्ट्र बोलत असतां सात्यकीचा हात धरून श्रीकृष्ण उठला व सर्व ऋषींची व राजांची अनुज्ञा घेऊन सभेच्या बाहेर पडला. त्याच्या मागोमाग भीष्मद्रोणांसहित धृतराष्ट्र धांवला व सर्व राजेही धांवले; तों श्रीकृष्णाचा रथ दारुकानें आणून उभा केला. त्या वेळेस धृतराष्ट्र श्रीकृष्णास पुन्हा म्हणाला, “ कृष्णा, माझ्या पुत्रांवर माझें किती बळ आहे, हें तूं प्रत्यक्ष पाहिलें आहेस. शम व्हावा अशी माझी फार इच्छा आहे, पण माझें कांहीं चालत नाहीं. पांडवांविषयीं माझा अभिप्राय दुष्ट नाहीं, याविषयीं सर्व कौरव व हे सर्व राजे साक्ष आहेत. ” तेव्हां श्रीकृष्ण तोच शब्द उचलून म्हणाला, “ हे कौरव हो, हे सर्व राजांनो, आजच्या सभेंत काय झालें व मंदबुद्धि दुर्योधन रागानें कसा उठून गेला हें तुम्हीं प्रत्यक्ष पाहिलेंच आहे. धृतराष्ट्र माझ्या पुत्रावर माझें कांहीं चालत नाहीं असें म्हणत आहे तेंही तुम्हीं ऐकिलें आहे. तेव्हां आपल्या सर्वांची रजा घेऊन मी पांडवांकडे परत जातों. ” असें म्हणून श्रीकृष्णानें सात्यकीस रथांत आरोहण केलें, व तो आपल्या आत्येचा निरोप घेण्यासाठीं विदुराच्या घरीं आला.

कुंतीस सभेंत झालेली हकीकत थोडक्यांत सांगून व तिचा विदुलासंवाद-रूपी उद्धर्षण निरोप पांडवांस घेऊन श्रीकृष्णानें तिच्या पायांवर प्रेमानें व आदरानें डोकें ठेविलें; व नंतर हस्तिनापुराहून तात्काळ कूच करून झपाट्यानें उपप्लव्यास येऊन पांडवांची भेट घेतली. श्रीकृष्णाचीही मध्यस्थी फुकट जाऊन शेवटीं युद्धाचाच प्रसंग येऊन ठेपला हें पाहून धर्मराजास फार वाईट वाटलें. परंतु प्राप्त झालेली गोष्ट केलीच पाहिजे असें जाणून तो युद्धाच्या तयारीस लागला. त्यानें आपल्या सैन्याचे सात विभाग करून त्यांजवर सात सेनापति नेमिले, व धृष्टद्युम्नास एकंदर सैन्याचा अधिपति केलें. त्या सर्वांस मदत अर्जुनानें करावी व अर्जुनास श्रीकृष्णानें सल्ला द्यावी असें त्यानें ठरविलें. श्रीकृष्णानें स्वतः शस्त्र धरण्याचें पूर्वीं नाकारिलें होतेंच, पण त्यानें आपला प्रिय शिष्य अर्जुन याच्या रथाचें सारथ्य पत्करून त्याच्या घोड्यांच्या पागा आपल्या हातांत घेतल्या. पांडव-सैन्याचा आत्मा अर्जुन होता,

त्यास सोडून निराळें राहणें श्रीकृष्णास शक्यच नव्हतें. अर्जुनाचा जय होणेंही त्याच्या सतत सान्निध्यावर अवलंबून होतें. सारांश, श्रीकृष्णानें सर्व गोष्टी ध्यानांत आणूनच हें बाह्यात्कारी हलकें दिसणारें काम आपल्याकडे घेतलें. याप्रमाणें सर्व व्यवस्था लागून पांडवसैन्यानें कुरुक्षेत्राकडे चाल केली. " कुरुक्षेत्रांत समोर घाव खाऊन मरण आलें असतां मुक्ति मिळते " अशी त्या वेळची समजूत असल्यानें दोन्ही सैन्यांनी याच धर्मक्षेत्रांत लढण्याचें ठरविलें. पांडवांनी कुरुक्षेत्रांत पोंचून आपलीं शिबिरें ठोकिलीं. तसेंच दुर्योधनानेंही आपलें सैन्य हालवून कुरुक्षेत्रांत आणिलें आणि मध्यें पांच योजनें लांब आणि पांच योजनें रुंद असें रणमैदान सोडून दुसरे बाजूस आपलीं शिबिरें कायम केलीं. याप्रमाणें दोन प्रचंड सैन्यें रणांगणावर उतरून एके दिवशीं प्रातःकाळीं परस्परांशीं भिडण्यासाठीं सज्ज होऊन रणमैदानावर समोरासमोर आलीं. त्या काळांत धर्मयुद्धाचे नियम कडकडीत असून गैरसावध किंवा धोक्यानें शत्रूवर तुटून पडण्याची क्लृप्ति बहुधा कोणीही उपयोगांत आणीत नसत.प्रातःकाळीं स्नान करून अग्नि व सूर्य यांची उपासना करून अलंकृत होऊन दोन्ही पक्षांकडील क्षत्रिय आपआपलीं सैन्यें घेऊन रणांगणावर आले व दोन्ही पक्षांकडील मुख्य सेनापतींनीं आपआपल्या कल्पनेप्रमाणें सैन्यांचे व्यूह रचण्यास सुरवात केली.ज्याच्या सफेत घोड्यांच्या दोऱ्या श्रीकृष्णानें स्वतः आपल्या हातांत घेतल्या आहेत असा अर्जुनाचा रथ पांडवांच्या सैन्यापुढें आला, तेव्हां त्या सैन्यानें प्रचंड आरोळी ठोकून त्याचा गौरव केला. तिकडे केंस पांढरे झालेला, पांढरें पागोटें घातलेला, डोक्यावर सैन्याधिपत्याचें पांढरें छत्र धरलेला, पांढरे घोडे जोडलेल्या रथांत बसलेला व रथावर पांढरेंच निशाण लावलेला वृद्ध भीष्म कौरवसैन्याच्या अग्रभागीं आला; तेव्हां कौरवसैन्यानेंही जयाच्या प्रचंड गर्जनेनें त्याचें स्वागत केलें. याप्रमाणें लाखों लोकांच्या वीर-गर्जनांनीं वीरांच्या हृदयांत वीरश्री उत्पन्न होत आहे, अशा समयीं कोण कोण वीर आपल्याशीं लढावयास आले आहेत हें निरखून पाहण्याच्या हेतूनें अर्जुनानें श्रीकृष्णास आपला रथ कौरवसेनेकडे नेऊन मैदानाच्या मध्यभागीं उभा करण्याविषयीं सांगितलें; तेव्हां श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ रणमैदानाच्या मध्यभागीं नेऊन उभा केला.

अर्जुनानें दोन्ही सैन्यांकडे नजर फेंकली तों जेथवर दृष्टि पोंचत होती

तेथवर दोन्ही बाजूंस लक्षावधि वीर मारूं किंवा मरूं अशा वीरश्रीनें युद्धास ठाकून उभे राहिलेले त्याच्या दृष्टीस पडले. इकडे कौरवांच्या निशाणापाशीं भीष्म, द्रोण, शल्य इत्यादि महान् महान् महारथी व लक्ष्मणादि कौरवांचे पुत्र आपआपल्या रथांत बसून एकत्र जमलेले दृष्टीस पडले. तर दुसरीकडे पांडवांच्या निशाणापाशीं धृष्टद्युम्न, भीम, विराट, चेकितान, पांड्य इत्यादि महारथी व अभिमन्युप्रभृति पांडवांचे पुत्र व विराटद्रुपदांचे पौत्र वगैरे युद्धाच्या भयंकर प्रसंगासही न भितां वीरश्रीनें फुरफुरणारे बालवीर जमलेले त्याच्या नजरेस पडले. हे लक्षावधि वीर, हे पूज्य व प्रिय पितामह, आचार्य, श्वशुर, शालक, पुत्र, पौत्र, बंधु, आप्त, मित्र एकमेकांस मारून ठार झाल्यावर त्यांच्या रक्तानें व मांसानें मांडीइतक्या भरलेल्या रणांगणांतून मी वांचलों तर हस्तिनापुराच्या राज्याकडे जाण्यास मला रस्ता मिळेल ही गोष्ट मनांत येऊन अर्जुनाचें हृदय लाखों जीवांच्या करुणेनें व आप्तांच्या प्रेमानें धडधडूं लागलें, त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले व त्याचे हातपाय गळून गेले.शेवटीं शेवटीं श्रीकृष्णास गद्गदस्वराने तो म्हणाला, "गोविंदा, या लाखों वीरांस, प्रिय बंधूंस व पूज्य गुरूंस ठार मारून मीं राज्यही मिळविलें तरी तें काय कामाचें ? जनार्दना, ज्याच्यासाठीं राज्य मिळवावयाचें तेच आजोबा, गुरु, बंधु, मेहुणे, पुतणे, प्राण हातांत घेऊन सर्वस्वाचा त्याग करून माझ्याशीं लढावयास उभे राहिले आहेत; त्रैलोक्याच्या राज्यासाठींसुद्धां यांजवर माझा हात चालणार नाहीं; मग एका लहानशा कुरुराज्याकरितां मी यांजवर शस्त्र उचलूं ? या कुलक्षयाच्या कृत्यापासून आम्हांस कोणतें सुख मिळणार आहे ! जरी हे लोभास बळी पडून कुलक्षय करण्यास तयार झाले आहेत तरी धर्मशील आम्ही म्हणवतों, आम्हीं कुलक्षयाचें पातक किती भयंकर आहे हें जाणतों, आम्हीं तरी त्यांशीं लढावयास कां उभें रहावें ? अरेरे ! आम्ही अत्यंत निंद्य कर्म करण्यास या वेळीं उद्युक्त झालों आहों ! यापेक्षां यांनींच आम्हांस शस्त्र टाकलें असतां या रणांगणांत ठार मारलें तरी अधिक श्रेयस्कर होईल." असें म्हणत अर्जुन रथाच्या मागच्या बाजूस धनुष्यबाण टाकून उद्वेगानें खालीं बसला.ही अर्जुनाची विलक्षण स्थिति झालेली पाहून श्रीकृष्णास मोठें आश्चर्य वाटलें. आणि तो म्हणाला, "अर्जुना, तुझ्या आर्य पूर्वजांस कधीं न शिवलेलें,

तुझ्या कीर्तीस कालिमा आणणारें आणि अंतीं तुला अधर्मामुळें नरकास नेणारें हें काळेकुट्ट भ्रमाचें पटल तुझ्या बुद्धीवर एकाएकीं कोणीकडून आलें ? बाबा, असा नपुंसक होऊं नकोस ! हा नपुंसकपणा तुला शोभत नाहीं; ही मनाची क्षुद्र दुर्बलता टाकून युद्धास उभा रहा. " श्रीकृष्णाचे हे चाबकासारखे तीक्ष्ण शब्द ऐकूनही अर्जुन पुन्हां म्हणाला, " श्रीकृष्णा, ज्या आजोबांच्या मांडीवर लहानपणीं मी आनंदानें लोळलों त्यांच्या छातीवर मी आज शस्त्र टाकूं काय ? ज्या द्रोणगुरूंनीं मला आपल्या पुत्रापेक्षांही शस्त्रविद्येत अधिक निपुण केलें त्यांची दिलेली विद्या त्यांजवरच चालवूं ? गोविंदा, या अत्यंत पूज्य व प्रिय भीष्मद्रोणांवर मी बाण टाकूं तरी कसे ? यापेक्षां भीक मागून पोट भरणें किंवा आम्ही वनांत राहून मृग मारून निर्वाह करीत होतों तें करणें शतपट बरें असें मला वाटतें ! जनार्दना, या आप्तजनांच्या मोहपाशानें माझ्या बुद्धीस खरोखर दुर्बलता आली आहे. तूं सर्व सूक्ष्म असूक्ष्म जाणतोस, तूं प्रत्यक्ष श्रीविष्णु आहेस, तुला मी मनोभावानें शरण आलों आहें. या वेळीं व या प्रसंगीं मला जें करणें खरोखर न्याय्य व श्रेयस्कर असेल तें तूं कृपा करून मला सांग. " संसारांतील अनेक दुःखांच्या व अडचणींच्या प्रसंगीं, नानातऱ्हेचे बिकट, न सुटणारे विचार मनांत चोहोंकडून धांवत येत असतां शेंकडों मनुष्यें अशींच भांबावून जातात, व आपलें योग्य कर्तव्य काय आहे तें त्यांस सुचत नाहीं. अशा भ्रांत लोकांस, अर्जुनास पुढें करून, भगवान् श्रीकृष्णानें या वेळीं जो दिव्य त्रिकालाबाधित, मनोहर उपदेश केला, तो उपनिषदांसमान योग्यशास्त्रसम्मित भगवद्गीता-ग्रंथांत महर्षि व्यासानें भारताच्या मध्यभागीं ग्रथित केला आहे, त्याचें आपण यथामति येथें मराठींत भाषांतर करूं.

श्रीकृष्ण म्हणाला, " अर्जुना, ज्या लोकांविषयीं शोक करणें योग्य नाहीं, त्यांविषयीं तूं शोक करतोस आणि इकडे तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगतोस याचें मला आश्चर्य वाटतें. बाबा, जिवंत किंवा मेलेल्या मनुष्यांविषयीं शोक करणें हें पंडितांचें लक्षण नव्हे. मी, तूं, हे सर्व राजे यापूर्वी नव्हतों किंवा यापुढें होणार नाहीं असें मुळींच नाहीं. ज्याप्रमाणें आत्म्याच्या या देहास बाळपण, तरुणपण, वृद्धपण, अशा निरानिराळ्या अवस्था येतात, त्याचप्रमाणें आत्म्यास या देहानंतर दुसऱ्या देहाची प्राप्ति

ठेवलेलीच आहे; यास्तव कोणाच्याही मरणाबद्दल धीर पुरुष शोक करीत नाहींत (१४।०५). जें असत् म्हणजे कधींच नव्हतें,तें उत्पन्न होणार कसें ? आणि जें सत् म्हणजे आहे तें नाहींसें होणार कसें ? तत्त्ववेत्त्यास सत् व असत् या दोहोंचा पूर्ण निश्चय झालेला असतो. सत् व असत् यांच्याही पलीकडे असणाऱ्या अविनाशी तत्त्वानें हें सर्व जग व्याप्त झालें आहे,त्याचाच अंश आत्मा असल्यानें तो अविनाशी आहे. या अव्यय आत्म्याचा नाश कोणी ही करूं शकत नाहीं. आत्म्याचे देह जरी अन्त पावतात तरी देहाचा अधिष्ठाता आत्मा अंत पावत नाहीं; यासाठीं अर्जुना, तूं निःशंक युद्ध कर. हा आत्मा मारणारा किंवा मरणारा आहे, असें मानणें चुकीचें आहे. हा मारीतही नाहीं किंवा मरतही नाहीं. हा आत्मा अज, नित्य, शाश्वत, पुराण आहे. शरीराचा नाश झाला तरी याचा नाश होत नाहीं (२१). जसें आपण जीर्ण झालेलें वस्त्र टाकून नवें घेतों,त्याप्रमाणें देहाचा अधिष्ठाता आत्मा जीर्ण शरीरें टाकून पुन्हां पुन्हां दुसरे नवीन देह घेतो. हा आत्मा हत्यारानें तोडतां येत नाहीं, किंवा आगीनें जाळतां येत नाहीं. हा पाण्यानें भिजणारा नव्हे, किंवा वाऱ्यानें सुकणारा नव्हे. हा नित्य, सर्व-व्यापी, अचल, सनातन, अव्यक्त, अचिंत्य, आणि अविकार्य असा आहे. हें आत्म्याचें स्वरूप पूर्णपणें तूं जाणलेंस म्हणजे तुला शोक करण्याचें कारण ठरणार नाहीं. कदाचित् तूं आत्म्यासच जन्ममरण आहे असें मानीत असशील तरीसुद्धां तुला शोक करण्याचें कारण नाहीं. तुझ्या समजुतीप्रमाणें जो आत्मा जन्मास आला तो मरणारच आहे. आणि जो मेला तो पुन्हां जन्मास येणारच आहे. तेव्हां जन्ममरण अपरिहार्य असल्यामुळें त्यांज-विषयीं शोक करणें योग्य नव्हे. 'केवळ प्रत्यक्षच गोष्ट मानली आणि प्राणिमात्र जिवंत आहेत तोंपर्यंतच व्यक्त आहेत, ते आले कोठून व जातात कोठें, हें अव्यक्त आहे, असें धरलें तरीसुद्धां शोक काय म्हणून ?' जर मनुष्य जन्मास आल्याचा शोक नाहीं तर तो मरण पावल्याचा तरी शोक कशासाठीं ? अर्जुना, आत्म्याचें खरें स्वरूप जाणणें फार कठीण आहे. त्याचें प्रत्यक्ष स्वरूप पाहणारे अति विरळा. आत्म्याचें स्वरूप वर्णन करणारे तितकेच विरळा. आत्म्याचें यथार्थ स्वरूप ऐकण्यास मिळणें दुर्मीळ, आणि ऐकूनही त्याचें यथार्थ ज्ञान होणें त्याहूनही दुर्मीळ. तथापि'

सर्वांच्या देहांत असणारा देही निश्चयानें नेहमीं अवध्य आहे; यासाठीं कोणत्याही मनुष्याविषयीं शोक करणें तुला उचित नाहीं. आणि ' असें जर आहे तर ' स्वधर्माकडे लक्ष्य देऊन युद्ध करण्यास मागेंपुढें पाहण्याचें तुला कारण काय ? तुझ्यासारख्या क्षत्रियास धर्मानें प्राप्त झालेल्या युद्धाहून अधिक श्रेयस्कर तें कोणतें ? ' सत्य तुझ्या बाजूला आहे आणि युद्धास उभें राहण्यापूर्वी तूं साम करण्यासाठीं शक्य तो प्रयत्न केलास. अशा स्थितींत धर्मास अनुसरून आपण जें युद्ध करीत आहों ' तें केवळ अकल्पित स्वर्गद्वारच आपणांस उघडलें आहे असें समज. जो क्षत्रिय धन्य असेल त्यासच असें युद्ध करणें प्राप्त होतें. बरें, तूं हें धर्म्य युद्ध न करतां मागें परतशील तर तुला धर्म तर मिळणारच नाहीं; पण उलट तुझी अपकीर्ति होऊन तुला पातक मात्र लागेल. ' भीष्म-द्रोणांच्या प्रीतीनें तूं त्यांजवर बाण न टाकतां मागें फिरलास तरी ' तुझे शत्रु तूं भीष्म द्रोणांच्या भीतीनें मागें फिरलास असेंच म्हणतील आणि तुझ्या पराक्रमाची परोपरी निंदा करतील. संभाविताला अपकीर्ति मरणाहूनही अधिक दुःख देते. ' शिवाय, कोणाचीही अपकीर्ति होणें हें पातकच होय.' ' अर्जुना, या धर्मयुद्धांत माघार न घेतां पुढें होणें तुला उभयपक्षीं श्रेयस्कर आहे. ' यांत तुला मरण आलें तर स्वर्ग मिळेल आणि यांत जय आला तर तुला पृथ्वीचें राज्य मिळेल. यासाठीं जय, अपजय, लाभ, अलाभ, सुखदुःख यांचा विचार बाजूस ठेवून किंबहुना यांस सारखे मानून तूं स्वकर्तव्याचाच निश्चय कर आणि युद्धास उभा रहा. असें केलें असतां तुला कोणतेंही पातक लागणार नाहीं. ''

अर्जुना, येथवर आत्मा अमर आहे. या सांख्याच्या म्हणजे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें स्वकर्तव्य करणें तुला कसें श्रेयस्कर आहे हें मीं सांगितलें. आतां याहीपेक्षां योगाच्या 'म्हणजे कर्मकौशल्याच्या दृष्टीनें हेंच करणें कसें अधिक श्रेयस्कर आहे याचा सूक्ष्म ' विचार मी तुला सांगतों. " हा विचार केला म्हणजे कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या पापपुण्याचें बंधनच रहात नाहीं. या विचारांत प्रयत्न केलेला फुकट जात नाहीं किंवा दोष उत्पन्न होऊन प्रत्यवायप्रायश्चित्त येत नाहीं. या विचाराचा थोडासा जरी अंमल मनावर बसला तरी मोठमोठ्या संकटांपासून मनुष्य मुक्त होतो. निश्चयात्मक हा

विचार एकच आहे. या निश्चयास सोडून जे विचार करतात त्यांना मात्र अनंत शाखा फुटलेल्या दिसतात. पहा, जे अजाण लोक वेदांत ‘ काम्य कर्मांचेंच विधान आहे, ’ त्यांत दुसरें कांहीं नाहीं असा वाद घेऊन अलंकारयुक्त भाषणे करतात, जे केवळ अनेक कामांनीं व्याप्त होऊन स्वर्गाची इच्छा करतात, किंवा नाना प्रकारच्या भोगासाठीं व ऐश्वर्यासाठीं निरनिराळीं अनेक कर्मे करावीं असें म्हणतात त्यांस हा निश्चयरूपी विचार येत नाहीं व त्यांचें मन, समाधान अथवा शांति हिच्या ठिकाणीं कायम रहात नाहीं. वेदांत तिन्ही गुणांनीं मिश्र असे विषय आहेत. पण अर्जुना, तूं या त्रिगुणमिश्र स्थितींच्या पलीकडे जा. राग, द्वेष सोडून, रजस्तमाचा त्याग करून तूं नेहमीं सत्त्वगुणांत रहा व आपल्या योगक्षेमाची काळजी न करितां आत्म्याच्या ठिकाणीं स्थित हो. ‘ असें झालें म्हणजे तुला ब्रह्माचेंही ज्ञान होईल. ’ सर्वच जलमय झाल्यावर ज्याप्रमाणें विहिरी, तळीं वगैरेंची किंमत रहात नाहीं, त्याप्रमाणें ज्ञान झालेल्या ब्रह्मवेत्त्या पुरुषांस सर्व वेदांचीही जरूरी रहात नाहीं. असो. हा निश्चयात्मक विचार कोणता हें मी तुला सांगतों. तुझा अधिकार कर्म करण्यापुरता आहे, फलाविषयीं तुझा अधिकार नाहीं, हें तूं ध्यानांत ठेव. आणि हें समजून फलाच्या इच्छेनें तूं कर्म करूं नकोस व कर्म करणेंही सोडूं नकोस. फलांत आसक्त न होतां योगांत दृढ होऊन तूं कर्तव्यकर्म कर. कर्म सिद्धीस जावो अथवा न जावो,दोन्ही स्थितींत चित्तवृत्ति सारखी ठेवणें याचेंच नांव योग.अशा मनाच्या स्थितीनें कर्म करणें फलावर नजर ठेवून कर्म करण्यापेक्षां किती तरी श्रेष्ठ आहे! यासाठीं या बुद्धीला, या मनाच्या समतोल स्थितीला,तूं शरण जा.जे फलावर नजर देऊन कर्म करतात ते कींव करण्यालायक होत.या बुद्धीनें म्हणजे फलेच्छारहित बुद्धीनें कर्म करणाऱ्या मनुष्यास सुकृत आणि दुष्कृत, पाप आणि पुण्य या दोहोंचाही स्पर्श होत नाहीं. यासाठीं या योगाचा तूं प्रयत्न कर.हा योग म्हणजे कर्म करण्याचें खरें कौशल्य होय. या बुद्धीनें कर्तव्यकर्म करणारे, कर्मांच्या फलास सोडल्यानें जन्मबंधनापासूनही मुक्त होऊन अंतीं अनामय पदास पोंचतात. ही बुद्धि तुझ्या ठिकाणीं उत्पन्न होऊन तुझ्या मोहतमाचा नाश करील, तेव्हां तुला अधिक सांगण्याची किंवा विचार करण्याची जरूरी राहणार नाहीं. नानाप्रकारच्या वेद—वादाला सोडून तुझी बुद्धि समाधीच्या

ठिकाणीं जेव्हां निश्चल होईल तेव्हां तुला हा योग सहज प्राप्त होईल. ” या ठिकाणीं अर्जुनानें ‘ कांहीं शंका मनांत येऊन ’ श्रीकृष्णास प्रश्न केला, “ केशवा, स्थितप्रज्ञ कोणास म्हणतात ? समाधिस्थाचें लक्षण काय ? स्थितप्रज्ञ काय बोलतो, कोठें बसतो, कसें वर्तन करतो ? ” श्रीकृष्णानें उत्तर केलें, “ अर्जुना, जेव्हां मनुष्य सर्व इच्छांचा, ‘ बाह्यात्कारी नव्हे, तर ’ मनाने सुद्धां त्याग करतो व आपल्याच ठिकाणीं आपल्याशींच संतुष्ट राहतो, तेव्हां त्यास स्थितप्रज्ञ म्हणतात. दुःखानें ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं, व सुखानें ज्याच्या मनांत भोगाची इच्छा उत्पन्न होत नाहीं; प्रीति, भय, राग हे विकार ज्याचे गेले आहेत, अशा मनुष्यास स्थितधी म्हणतात. जो कोणत्याही ठिकाणीं प्रेम न ठेवितां तें तें शुभ, किंवा अशुभ प्राप्त झालें असतां आनंद मानीत नाहीं, किंवा द्वेष करीत नाहीं, त्याची प्रज्ञा स्थिर झाली आहे असें समजावें. जसा कांसव आपले पाय व मान आंत ओढून घेतो, त्याप्रमाणें जो इंद्रियांस त्यांच्या विषयांपासून परावृत्त करून आपल्याच ठिकाणीं ओढून घेतो, त्याची प्रज्ञा स्थिर होय. इंद्रियांना उपभोग मिळाले नाहींत, म्हणजे विषय आपोआप सुटतात. मनांत राहणारी विषयांची प्रीति कांहीं दिवस उरते तीही परमात्म्याचें ज्ञान झालें म्हणजे नाहींशी होते. ‘ अशा प्रकारचा इंद्रियांचा संयम करणें फार कठीण आहे. ’ कारण मोठमोठ्या शहाण्या मनुष्यांचीं सुद्धां इंद्रियें नियमाचा प्रयत्न करीत असतांहीं ‘ बेफाम घोड्याप्रमाणें त्या प्रयत्नास न जुमानतां’ एखादे वेळीं त्यांच्या मनाला भलतीकडेच घेऊन जातात, ‘ हें आपण पाहतों. ’ तर अशा जात्या दांडग्या इंद्रियांचा निरोध करून त्यांस जो आपल्या ताब्यांत ठेवतो त्याची प्रज्ञा स्थिर झाली. अर्जुना, इंद्रियांचा संयम करण्याचा मुख्य उपाय म्हटला म्हणजे विषयांचें ध्यान सोडणें हा होय. ’ विषयांचें ध्यान करूं लागलें म्हणजे त्या ठिकाणीं प्रीति उत्पन्न होते; प्रीतीपासून काम, कामापासून क्रोध, क्रोधापासून मोह, मोहापासून स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशापासून विवेकनाश, आणि विवेकाचा नाश झाला म्हणजे एकंदर नाश होतो. “यासाठीं अगोदर मनानें विषयांचें ध्यान सोडलें पाहिजे. त्या त्या इंद्रियांचा त्या त्या विषयाशीं संबंध हा येणारच. पण, ” असा संबंध राग व द्वेष यांनीं विरहित असला म्हणजे मनुष्याचें मन गढूळ होत नाहीं आणि मन प्रसन्न

झालें म्हणजे मनुष्याची बुद्धि स्थिर होते ( ६६ ). इंद्रियांचा व्यापार चालतांना त्यांत आपलें मन घातल्यानें मनुष्याची बुद्धि ज्याप्रमाणें पाण्यांत नाव वाऱ्यानें इकडून तिकडे हेलकावे खात धांवते त्याप्रमाणें धावूं लागतें. त्यासाठीं इंद्रियांस विषयांपासून ज्यानें मनानें परावृत्त केलें, त्याची प्रज्ञा स्थिर झाली. अशा संयमी मनुष्यांस लोकांची जी रात्र तो दिवस आणि लोकांचा जो दिवस ती त्या पहाणाऱ्या मुनींची रात्र होय. ' सामान्य मनुष्यें ज्या विषयांत निद्रिस्त असतात त्यांत तो जागृत असतो आणि ज्या गोष्टींत तीं जागृत राहून धडपड करतात त्यासंबंधानें तो डोळे उघडे असूनही निद्रिस्त असतो. ' समुद्रांत हजारों नद्या मिळत असतांही जसें त्याचें पाणी वाढत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या मनाच्या समुद्रांत हजारों इच्छांच्या नद्या लुप्त होऊन जातात, तोच अक्षय शांतीचा अनुभव घेतो. कामांच्या मागें धडपडणाऱ्या मनुष्यास अशा शांतीचा लेशही मिळत नाहीं. सर्व इच्छा सोडून निस्पृह होऊन जो व्यवहार करतो त्या ममत्व व अहंकार सोडलेल्या पुरुषास शांति मिळते. या स्थितीस, अर्जुना, ब्राह्मी स्थिति म्हणतात;या स्थितींत मनुष्यास मोह नाहीं;व या स्थितींत राहून मनुष्यास मरण आलें असतां त्यास ब्रह्मपदाचा अक्षय्य आनंद प्राप्त होतो " ( भ० अ० २ ).

' अर्जुनास धनुष्यबाण टाकून अरण्यांत जाण्याची उत्कट इच्छा उत्पन्न झाली होती तीच ब्राह्मी स्थितीकडेस नेणारी आहे अशा समजुतीनें त्यानें हा प्रश्न केला होता. ह्या स्थितीची प्रशंसा ऐकून अर्जुनानें आपली शंका श्रीकृष्णासमोर स्पष्ट मांडली. ' तो म्हणाला, " श्रीकृष्णा, ' स्थितप्रज्ञाची स्थिर ' बुद्धि जर कर्मापेक्षां तुझ्या सांगण्यावरून अधिक श्रेयस्कर दिसते, तर मला कर्म, किंबहुना घोर कर्म करण्यास तूं कां प्रवृत्त करतोस ? तुझें बोलणें मला धरसोडीचें दिसतें. त्यानें माझ्या समजुतींत घोटाळे उत्पन्न होतात. याकारितां ज्याप्रमाणें आचरण केलें असतां माझें कल्याण होईल, तें निश्चयरूपी मत तूं मला सांग. " श्रीकृष्णानें उत्तर केले, "अर्जुना, माझें बोलणें धरसोडीचें नाहीं. मी काय म्हणतों याजकडे नीट लक्ष दे. " मीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें या लोकांत सांख्य आणि योग अशा दोन ' निष्ठा अथवा बुद्धि ' आहेत. सांख्य हे ज्ञाननिष्ठ आहेत आणि योगी हे कर्मनिष्ठ आहेत. ' पण अर्जुना, सांख्य ज्ञानाकडे जाणारे असले तरी त्यांचें

कर्म करणें नाहींसें होत नाहीं. ' ' त्याचें साध्य नैष्कर्म्य म्हणजे मोक्ष असला आणि सधान संन्यास असला तरी ' कर्मांचा आरंभ न केल्यानें नैष्कर्म्याचा अनुभव होत नाहीं. आणि केवळ कर्मांचा संन्यास केल्यानेंच सिद्धि प्राप्त होत नाहीं. ' अर्जुना, संसारत्याग करून अरण्यांत जाऊन बसल्यानें कर्म सुटलें काय ? असें केल्यानें मनुष्य या पंचमहाभूतांच्या सृष्टींतून बाहेर गेला काय ? भूक लागली म्हणजे मृगांच्या पाठीस तूं लागणार. निराहार राहाण्याचा निश्चय केलास तरी तुझा श्वासोच्छ्वास चालणारच. बरें, श्वासोच्छ्वास प्राणायामानें बंद केलास तरी तो प्राणायाम कर्मच होय. ' सारांश, या सृष्टींत कोणीही जिवंत मनुष्य एक क्षणभरसुद्धां कर्म केल्यावांचून राहूं शकत नाहीं. ' कर्म न करण्याचा निश्चय केला ' तरी प्रकृतीचे गुण मनुष्यास मुसक्या बांधून कर्म करावयास लावतात. ' कर्मेंद्रियांचा अत्यंत निग्रह केला तरी मन कोठें स्वस्थ बसतें ? तें आपलें विषयांच्या ध्यानाचें कर्म सारखें करीतच असतें. ' बाह्यात्कारी इंद्रियांचा निग्रह करून मनानें विषयांचा ध्यास करणारा मनुष्य निंद्य, मिथ्याचार होय. तर मनानें विषयांचा त्याग करण्यानें जो इंद्रियांचा निग्रह करतो, व आसक्तिरहित होऊन कर्मांचा आरंभ करतो तोच खरा योगी होय. अर्जुना, तूं निश्चयानें कर्म कर. कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें बरें. तुझा चरितार्थसुद्धां तूं अकर्म स्वीकारलेंस तर चालणार नाहीं. हा लोक कर्मांशींच बांधलेला आहे. पण कर्म करावयाचें तें मुक्तसंग होऊन करावयाचें हें माझें म्हणणें आहे. ' मीं पूर्वी वेदवादाची निंदा केली, यावरून माझ्या मतें वैदिक कर्म करण्यांत तात्पर्यच नाहीं असें तुला कदाचित् वाटलें असेल; पण असें नव्हे.' यज्ञयागादिक क्रिया प्रजेच्या उत्पत्तीबरोबरच उत्पन्न झाल्या आहेत. प्रजेनें यज्ञांनीं देवांस तुष्ट करावें व देवांनीं पर्जन्यानें प्रजेस तुष्ट करावें असा परस्पराचा संबंध प्रजापतीनेंच लावून दिला आहे. देवांनीं दिलेल्या अर्थात् उत्पन्न केलेल्या अन्नसामुग्रीनें जो देवांची आराधना करीत नाहीं तो चोर होय. याकरितां देवतांस यज्ञांत अन्नाचा भाग अर्पण करून राहिलेलें अन्न आपण खावें हाच सन्मार्ग आहे, आणि असें केलें तरच मनुष्याची पापापासून मुक्तता आहे. प्रजा अन्नापासून, अन्न पर्जन्यापासून, पर्जन्य यज्ञापासून आणि यज्ञ कर्मापासून असें हें चक्र चाललें आहे ( १५ ). तें जो

मनुष्य कर्माचा त्याग करून चाळवीत नाहीं, त्याचें आयुष्य व्यर्थ होय. किंबहुना त्याचें लक्ष इंद्रियांच्या भोगाकडे किंवा उदरपूर्तीकडेसच असल्यानें त्याचें आयुष्य पापमय म्हणण्यास हरकत नाहीं. आतां जो मनुष्य आत्म्याच्या ठिकाणीं रत असून आत्मतुष्ट असतो त्यास अमुक एक कर्म कर्तव्य आहे असें नसतें; त्यानें काम केलें तरीही त्यांत हेतु नसतो व न केलें तरीही कर्म न करण्यांत त्याचा कोणताही हेतु नसतो. ' हें खरें आहे. त्यानें हें चक्र कशास चालवावें असें तूं म्हणशील; पण ' अशा मनुष्याचा जगतांत कोणताच अर्थ उद्दिष्ट नसला तरी त्यानें आसक्तिरहित होऊन कर्तव्यकर्म करावें. आसक्तिविरहित कर्म केलें असतां मनुष्यास परम पुरुषार्थ प्राप्त होतो. जनकादि विरक्त महात्मे असेंच कर्म करून सिद्धि पावले. सामान्य लोकांस सन्मार्गे लावण्यासाठींही विद्वान् मनुष्यानें कर्म केलें पाहिजे. कारण श्रेष्ठ लोक जें जें करतात तें तें सामान्य लोक करूं इच्छितात. ते ज्या गोष्टी प्रमाण मानतात त्यांस अनुसरून इतर लोक वागतात, 'हा जगताचा नियम आहे. ' मजकडेस पहा. या तिन्ही लोकांत मला कांहींही कर्तव्य नाहीं. मला कांहीं मिळालेलें नाहीं किंवा कांहीं मिळवावयाचेंही नाहीं. असें असून मी अर्जुन कर्मच करीत आहें. जर मी ' धर्म, नीति, व्यवहार यांस अनुसरून ' लक्ष्यपूर्वक कर्म करणार नाहीं तर लोक माझा मार्ग अनुसरतील. मी जर कर्म सोडून बसलों तर हे लोक उत्सन्न होऊन संकराचा दोष मजकडे येईल आणि ह्या प्रजांचें नुकसान होईल. ' अर्जुना, धर्मशास्त्रानें गृहस्थास कर्मसंन्यासाची वेळ अंगाला चिरम्या पडून केस पांढरे होणें ही सांगितली आहे, ही सोडून भलत्या वेळीं क्षणिक वैराग्यानें संन्यास घेतलेले तरुण इंद्रिय-निग्रह न झाल्यानें कुमार्गास लागतात आणि वर्णसंकर होण्यास व लोकांची नीति भ्रष्ट करण्यास कारण होतात, हें तूं पाहतोस. ' याकरितां, अर्जुना, अजाण लोक ज्याप्रमाणें सक्त होऊन कर्म करतात त्याचप्रमाणें विद्वान् मनुष्यानें आसक्त होऊन कर्म करावें. ' पण मौज काय आहे ? ' चोहोंकडे प्रकृतीच्या गुणांनीं कर्में घडत असतां मनुष्यास कर्तेपणाचा अहंकार उत्पन्न होऊन त्याचें मन मूढ होतें व तीं तीं कर्में मी करतों असें मानून त्या त्या कर्मांत तो आसक्त होतो. यासाठीं आसक्त

न होण्याचा मुख्य उपाय म्हटला म्हणजे 'गुण व कर्म यांच्या विभागाचें यथार्थ ज्ञान करून घेणें हा होय.' प्रकृतीचे गुण निरनिराळीं कर्में प्रवृत्त करतात हें लक्षांत ठेवलें म्हणजे मनुष्य आसक्त होत नाहीं (२९). आणखी एक आसक्त न होण्याचा उपाय, अर्जुना, मी तुला सांगतों. पूर्वी सांगितल्याप्रमाणें महत्त्वरहित होऊन व सुखदुःखाकडे लक्ष न देतां, तूं परमेश्वराच्या ठिकाणीं चित्त ठेवून सर्व कर्में परमेश्वराला निवेदन कर आणि पापापुण्याची सर्व तळमळ सोडून खुशाल युद्ध कर. जे लोक श्रद्धापूर्वक कोणताही किंतु मनांत न आणतां या माझ्या मताचें आचरण करतात ते कर्माच्या पापपुण्यापासून मुक्त होतात. परंतु जे नेणते मनुष्य याप्रमाणें वागत नाहींत ते नष्ट व पापी होत. 'कारण' ज्ञानी मनुष्यसुद्धां आपल्या प्रकृतीनुसार प्रसंगवशात् पापकर्म केल्यावांचून रहात नाहीं. प्रकृतीपुढें नुसत्या इंद्रियनिग्रहाचें काय चालतें? प्रत्येक इंद्रियाच्या विषयांत रागद्वेष हे ठेवलेच आहेत. 'ते पापपुण्य उत्पन्न करतात.' त्यांच्या तडाक्यांतून सुटण्याचा प्रयत्न केला पाहिजे. याचमुळें प्रकृतीनुसार स्वधर्म गुणहीन असला तरी त्याचें अनुष्ठान परधर्माच्या अनुष्ठानाहून अधिक श्रेयस्कर आहे. स्वधर्मांत मरण आलें तरी चालेल. पण परधर्म भयंकर आहे. कारण "त्यापासून पापाचरण होण्याची फार भीति आहे."

'ज्ञानी मनुष्यसुद्धां प्रकृतीच्या तडाक्यांत सांपडून पाप कसें करतो याचें गूढ पडून' अर्जुनानें येथें प्रश्न केला, "श्रीकृष्णा, इच्छा नसतां, सर्व गोष्टी समजत असून, मनुष्याच्या जणूं मुसक्या बांधून त्याजकडून पाप कोण करवितो?" श्रीकृष्णानें उत्तर केलें, "प्रकृतीच्या गुणांपैकीं रजोगुणापासून उत्पन्न होणारा काम हा पापाचा प्रवर्तक आहे. याचेंच स्वरूप क्रोध होय; त्याचेंच स्वरूप लोभही होय. कामाचें पोट कधींही भरत नाहीं. जितकें खावयास मिळेल तितकें खाऊन हा पुन्हां भुकेला. हा मोठा पापी आहे. हाच मनुष्याचा मुख्य वैरी आहे. या दुर्धर शत्रूनें ज्ञान्याच्याही ज्ञानास आवरण पडतें. या कामरूपी अग्नीची भूक शांत होणें कठीण आहे. हा प्रथम इंद्रियें, मग मन आणि मग बुद्धि यांजवर ताबा करतो. आणि या मार्गानें आंत घुसून ज्ञानास झाकून मनुष्यास मोहांत पाडतो. तर तूं प्रथम इंद्रियांचें नियमन करून या कामशत्रूचा नाश कर. इंद्रियें विषयांहून पलीकडे म्हणजे वर

आहेत. इंद्रियांहून मन, मनाहून बुद्धि आणि बुद्धीहून आत्मा. आत्मा बुद्धीहूनही वर आहे हें जाणून आत्म्याचें आत्म्याच्याच बलानें तूं सस्तंभन कर, आणि पापें करविणाऱ्या या दुर्जय कामशत्रूस तूं मारून टाक (भ० अ० ३).

'असो. अर्जुना, मीं तुला माझा कर्मयोग सविस्तर समजावून सांगितला. ममत्वरहित होऊन जयापजयाचा विचार सोडून स्वकर्तव्य करावें; दुसरें, फलावर लक्ष न ठेवतां कर्तव्य करावें आणि तिसरें, परमेश्वरावर निष्ठा ठेवून परमेश्वरास सर्व कर्में अर्पण करून कर्तव्य करावें; असा हा माझा कर्म करण्याविषयींचा सिद्धांत आहे हा सिद्धांत नवीन नसून फार जुना आहे;' हा योग प्रथम मीं विवस्वान् म्हणजे सूर्य यास उपदेशिला. "जगाच्या उत्पत्तीपासून आजपर्यंत तो त्याप्रमाणें चालत आहे. देहाची पर्वा न करता फलाविषयीं निरपेक्ष राहून व परमेश्वरावर भरंवसा ठेवून जगताला प्रकाश देण्याचें कर्तव्य तो बजावीत आहे." विवस्वानानें हा कर्मयोग मनूला दिला. 'त्यानेंही त्याप्रमाणें वागून जगताचा व्यवहार सुरळीत चालू केला.' मनूपासून इक्ष्वाकु, इक्ष्वाकूपासून अनेक धर्मांचें आचरण करणारे राजे, याप्रमाणें हा कर्मयोग परंपरेनें चालत येऊन मध्यंतरीं कालाच्या गतीनें नष्ट झाला. 'वेद, सांख्य, योग इत्यादि मतांत हळुहळू आग्रहानें विरोध उत्पन्न झाल्यानें हा कर्मयोग लोकांतून नाहींसा झाला.' तो मी तुला आज पुन्हां उपदेश केला आहे. तूं माझा अत्यंत प्रियभक्त आहेस म्हणून तला मीं हें उत्तम रहस्य समजाविलें आहे. अर्जुना, तूं कदाचित् म्हणशील "विवस्वानाचा जन्म क्रोडों वर्षांपूर्वी आणि श्रीकृष्णा, तुझा जन्म अगदीं अलीकडे; तूं हा कर्मयोग विवस्वानास सांगितलास हें संभवेल कसें?" पण, अर्जुना, माझे व तुझे हजारों जन्म झाले; ते सर्व मला माहीत आहेत, तुला माहीत नाहींत. जरी मी अजन्मा आहें, तरी मी सर्व भूतांचा ईश्वर आहें; जरी मी अव्यय आहें, तरी मी आपल्या प्रकृतीचा आश्रय करून आपल्या मायेनें जन्म घेतों. ज्या ज्या वेळेस धर्माची ग्लानि होऊन अधर्माचें डोकें वर होतें त्या त्या वेळेस मी आपल्यास उत्पन्न करतों. सज्जनांच्या रक्षणासाठीं, दुर्जनांच्या विनाशासाठीं आणि धर्माच्या संस्थापनेसाठीं असा 'अवतार' मी प्रत्येक युगांत घेतों.

माझे हे दिव्य जन्म आणि कर्म ज्यांस नीट समजलें तो पुन्हां जन्मास येत नाहीं. भय, प्रीति व क्रोध हे विकार टाकून, माझा आश्रय करून, माझ्या ठिकाणीं तन्मय होऊन, माझें खरें ज्ञान झाल्यानें पवित्र होऊन, पुष्कळ लोक माझ्याशीं तादात्म्य पावले आहेत. ' बाकी ' जे ज्या भावानें माझें भजनपूजन करतात त्यांस त्या भावानें मी भजतों; आणि लोकहा निर-निराळ्या प्रकारानें माझ्याच मार्गाला लागतात. सिद्धीची कामना धरून पुष्कळ लोक इंद्रादि देवतांना यज्ञांनीं तुष्ट करतात. कारण, यज्ञकर्मापासून या मनुष्य–लोकांत फार लवकर सिद्धि होते. चारी वर्णांचे लोक भिन्न-भिन्न कर्में व गुण देऊन मींच उत्पन्न केले आहेत. जरी वास्तविक मी अकर्ता आहें तरी चातुर्वर्ण्याचा उत्पन्न करणारा मीच आहें असें समज; ' आणि म्हणून त्यांचीं निरनिराळीं कर्में मीच लावून दिलीं असल्यानें तीं मलाच पोहोंचतात हें लक्षांत ठेव. ' मला कोणतींही कर्में बंधक होत नाहींत, कारण, मला कर्मांच्या फलांची इच्छा नाहीं; याप्रमाणें माझें स्वरूप जो ओळखतो तो कर्मबंधनापासून मुक्त होतो. अर्जुना, हें जाणून ' फलावर इच्छा न ठेवतां' पूर्वीं होऊन गेलेल्या मुमुक्षूंनीं कर्म केलें, तर तुझ्या पूर्वीच्या लोकानीं जें पूर्वीं केलें तेंच तूंही कर, ' आणि फलाची इच्छा सोडून आपलें कर्तव्य कर. ' कर्म म्हणजे काय, आणि अकर्म म्हणजे काय, याजविषयीं मोठमोठ्या विद्वान् लोकांस सुद्धां मोह पडतो, यासाठीं तें कर्म मी तुला सांगतों. कर्म ' म्हणजे विहित कर्म, ' विकर्म 'म्हणजे निषिद्ध कर्म ' आणि अकर्म अशा तिन्हींचें तत्त्व नीट जाणलें पाहिजे; कारण कर्माचें तत्त्व फार गहन आहे. ' थोडक्यांत सांगणें तर, संगरहित विहित ' कर्म म्हणजेच अकर्म आणि ' अहंकारयुक्त ' अकर्म म्हणजेच ' निषिद्ध ' कर्म असें जो जाणतो तो खरा बुद्धिवान्, तो खरा योगी, तो समस्त कर्मांचें पुण्य घेणारा. ' अर्जुना, पुन्हां दुसऱ्या शब्दांनीं सांगतों. ' जो मनुष्य कर्मास आरंभ करतांना अमुक इच्छेनें अमुक फलप्राप्तीसाठीं अशा प्रकारचा काम किंवा संकल्प चित्तांत वागवीत नाहीं तो पंडित असें जाणते समजतात. त्याच्या कर्मांची पापपुण्यरूपीं इंधनें ज्ञानाच्या अग्नीनें जळून खाक झालीं. कर्मफलाचा संग सोडून जो नेहमीं तृप्त राहून कशाचाही आश्रय करीत नाहीं, तो कर्मांत प्रवृत्त झाला

तरी तो कांहीं करीत नाहीं; 'असेंच समजलें पाहिजे.' आशारहित होऊन, चित्ताचें नियमन करून, सर्व परिग्रहाचा त्याग करणारा 'संन्यासी' शारीरिक केवळ क्रिया करतो, त्यांनीं त्यास पातक लागत नाहीं. हें तर काय पण यदृच्छा—लाभांत संतुष्ट राहून राग, द्वेष व मत्सर सोडून सिद्धि व असिद्धीचे ठिकाणीं सम राहून संसाराचीं अनेक व्यावहारिक कर्मे केलीं तरी तो बांधला जात नाहीं. किंबहुना संगरहित होऊन व ज्ञानाच्या ठिकाणीं चित्त स्थिर ठेवून मुक्त पुरुषानें नानाप्रकारच्या यज्ञासाठीं जरी कर्म केलें तरी तेंही परिणामासह नष्ट होतें. हवनाची अर्पणाक्रिया ब्रह्म, हवनाची वस्तु ब्रह्म, ज्यांत हवन करावयाचें तो अग्नि ब्रह्म, हवन करणारा ब्रह्म आणि ज्याला हवन अर्पण करावयाचें तोही ब्रह्म अशा बुद्धीनें यज्ञ करणारा ब्रह्मालाच पोंचला पाहिजे. अशा बुद्धीनें कर्मयोगयुक्त होऊन कित्येक योगी इंद्रादि देवतांचें यज्ञ करितात, तर कित्येक वेदरूपी अग्नींत यज्ञाचेंच हवन करितात. कित्येक संयमरूपी अग्नींत इंद्रियांचें हवन करतात, कित्येक विषयांचें हवन इंद्रियाग्नींत करतात. कित्येक इंद्रियें व प्राण या दोहोंच्या कर्मांचा यज्ञ ज्ञानानें उद्दीपित केलेल्या आत्मसंयमाग्नींत करतात. याप्रमाणें कोणी द्रव्ययज्ञ, कोणी तपोयज्ञ, कोणी संयमयोगयज्ञ, कोणी स्वाध्याययज्ञ; कोणी ज्ञानयज्ञ करतात. कोणी अपानाचा प्राणांत व प्राणाचा अपानांत प्राणायामानें प्राणापानगतींचा रोध करून यज्ञ करतात, तर कोणी आहाराचा नियम करून सर्व प्राणांचें प्राणांतच हवन करतात. हे सर्व यज्ञ जाणणारे असून यज्ञानें आपल्या पापांचा नाश करणारे आहेत. अर्जुना, हा लोकसुद्धां कोणत्यातरी यज्ञाशिवाय सुधारत नाहीं, मग परलोकाची गोष्ट कशाला? हे निरनिराळे यज्ञ ब्रह्माचीच प्राप्ति करून देणारे आहेत, 'मग ते वेदानुवचन, हविर्यज्ञ, दान, तप, अनशन इत्यादि कोणतेही असोत.' पण ते कर्मांपासून उत्पन्न आहेत हें जाणलेंस म्हणजे तुला मोक्ष मिळेल. 'मात्र' द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ अधिक लवकर फल देणारा असतो. आणि सर्व कर्म फलासहित 'परमज्ञानाच्या' ठिकाणीं समाप्त होते. 'अर्जुना, हें परमज्ञान होणें हीं महद्भाग्याची गोष्ट आहे; तें होण्यास सद्गुरूचीच कृपा झाली पाहिजे.' तें ज्ञान तत्त्वदर्शी ज्ञानी तुला उपदेश करतील; जेव्हां तूं त्यांस प्रणिपात, परिप्रश्न व सेवा करून 'अर्थात्

श्रवण, मनन आणि निदिध्यास करून ' शरण जाशील तेव्हां हें ज्ञान अर्जुना, तुला झालें म्हणजे तुला असा मोह पुन्हां उत्पन्न होणार नाहीं.'कारण' या ज्ञानानें सर्व भूतमात्र तुला आपल्याच ठिकाणीं व माझ्या ठिकाणीं दिसूं लागेल.अर्जुना,तूं"पूर्वी कितीही पापी," पापिष्टाहूनही पापी असलास तरी तुला ही ज्ञाननौका तुझ्या पातकसमुद्रांतून तारून नेईल. जसा अग्नि एकदां धगधगीत झाला म्हणजे वाटेल तशीं ओलीं इंधनें जाळून भस्म करतो, त्याप्रमाणें हा ' परम ' ज्ञानरूपी अग्नि सर्व कर्मांचा नाश करतो. या ' परम ' ज्ञानासारखी पवित्र वस्तु दुसरी या जगतांत नाहीं. तें ज्ञान स्वतःही ' सद्गुरूवांचून ' कर्मयोग सिद्ध झाला म्हणजे कालेंकरून आपल्याच ठिकाणीं मिळूं शकतें. श्रद्धेनें या ज्ञानाचा सारखा ध्यास घेतला असतां इंद्रियांचा संयम करणाऱ्या मनुष्यास हें ज्ञान मिळतें आणि तें मिळालें म्हणजे अक्षय्य शांतीचा लाभ लवकरच होतो. ' अर्जुना, तूं मनांत कोणताही संशय बाळगूं नको. ' अज्ञ, अश्रद्धावान् आणि संशयग्रस्त मनुष्याचा नाश होतो. संशयग्रस्ताला हा लोक नाहीं, परलोक नाहीं आणि सुखही नाहीं. योगानें म्हणजे फलेच्छा सोडल्यानें कर्माचा संन्यास करणारा ( प्रत्यक्ष नव्हे ), ज्ञान प्राप्त होऊन संशय नाहींसा झालेला, आत्मनिष्ठ मनुष्य कर्म करीत राहिला तरी त्या कर्मांनीं तो बद्ध होत नाहीं. यासाठीं अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या आपल्या या हृदयांतील संशयास ज्ञानरूपी तलवारीनें छाटून मीं सांगितलेल्या कर्मयोगाचा तूं आश्रय कर आणि युद्धास निःशंक उभा रहा ( भ० अ० ४ ).

' अर्जुनाचा संशय अद्याप कोठें फिटला होता ! '

' यज्ञादि कर्मे ब्रह्माला अर्पण केल्यानें कर्मबंधन नाहींसें होतें, हें जरी खरें, तरी ब्रह्मज्ञान अत्यंत श्रेष्ठ असून तेथें सर्व कर्म आपोआप समाप्त होतें हें सांगून श्रीकृष्ण अर्जुनास शेवटीं युद्धास उभा रहा असेंच म्हणता; याचें आश्चर्य वाटून ' अर्जुन म्हणाला, " श्रीकृष्णा, एकदां कर्मसंन्यासाची प्रशंसा करतोस आणि पुन्हां कर्मयोगाची करतोस हें काय ! यांपैकीं जें मला श्रेयस्कर असेल तेंच निश्चयपूर्वक सांग. " श्रीकृष्ण म्हणाला, " अर्जुना, कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्ही मोक्षास नेणारे आहेत; पण कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगांत कांहीं विशेष आहे. ' कारण ' जो मनुष्य इच्छा व द्वेष

सोडून ' कर्म करतो ' तो नेहमींच संन्यासी आहे. असा इच्छाद्वेषरहित पुरुष कर्मबंधनापासून सहज मुक्त होतो. सांख्य आणि योग ' अर्थात् ज्ञान-निष्ठा आणि कर्मनिष्ठा ' भिन्न आहेत असें वेडे लोक समजतात, शहाणे समजत नाहींत. योग्य रीतीनें कोणत्याही एकाचें अनुष्ठान केलें तर दोहों-चेंही फल मिळतें. ' निरनिराळ्या ' ज्ञानमार्गांनीं जें स्थान शेवटीं प्राप्त होतें तेंच ' निरनिराळ्या ' योगमार्गांनीं प्राप्त होतें; तात्पर्य, सांख्य आणि योग एकच आहेत असें जो जाणतो तो खरा जाणणारा होय. सांख्य-मार्ग योगाची जोड दिल्याशिवाय आचरणासही कठीण आहे. ' कर्म ' योगानें युक्त असलेला मुनि म्हणजे संन्यासी ब्रह्माला लवकर पोंचतो. ' कर्म ' योगानें शुद्ध अंतःकरण होऊन इंद्रियांचा व मनाचा जय करून, आपला आत्मा आणि सर्व भूतांचा आत्मा एक झाला म्हणजे कर्म केलें तरी त्याचें बंधन उत्पन्न होत नाहीं. ' संन्यासी झाला तरी त्याचें जरूरीचें कर्म सुटतें काय ? ' पाहणें, ऐकणें, स्पर्श करणें, वास घेणें, खाणें, चालणें, निजणें, श्वासोच्छ्वास करणें, बोलणें, टाकणें, घेणें, पापण्या मिटणें किंवा उघडणें या क्रिया झाल्याच पाहिजेत; त्या होतांना इंद्रियें विषयांच्या ठिकाणीं स्वभावानें प्रवर्ततात हें लक्षांत ठेवून, युक्त पुरुषानें मी कांहीं करीत नाहीं हें ध्यानांत धरावें; आणि संगरहित होऊन परमेश्वराला सर्व कर्में अर्पण करावीं; म्हणजे कमलाच्या पानाला जसें पाणी त्याजवर असून कधींही स्पर्श करीत नाहीं, त्याप्रमाणें त्यास पापाचा स्पर्श होत नाहीं. ' कर्म ' योगी शरीर, मन, बुद्धि, इंद्रियेंसुद्धां यांनीं संगरहित होऊन चित्तशुद्धीसाठीं कर्म करीतच जातात. फलाची इच्छा सोडल्यानें त्यांस नित्यशांति मिळते. याच्या उलट योगरहित मनुष्य इच्छा धरल्यानें फलांत आसक्त होतो आणि पापपुण्यांच्या बंधनांत गुरफटून जातो. ' यासाठीं कर्म-योगांत विशेष आहे. असा योगयुक्त संन्यासी अथवा मुनि कसें आचरण करतो हें मी तुला सांगतों. ' असा संन्यासी मनानें सर्व कर्मांचा संन्यास करून नऊ दरवाजे असलेल्या या शरीरांत, शरीर असूनही कांहीं न करीत किंवा करवीत सुखानें राहतो. 'कारण' परमेश्वर कोणाला कर्तृत्व देत नाहीं, कर्म करवीत नाहीं किंवा कर्मांचें फलही देत नाहीं. या गोष्टी स्वभा-वानें होतात. अर्थात् परमेश्वर कोणाचें पापही घेत नाहीं किंवा पुण्यही घेत

नाहीं. ' परमेश्वर करविता, कर्मस्रष्टा किंवा फलदाता आहे, ' अशी भ्रांत कल्पना मायेमुळें उत्पन्न होते, आणि यामुळें लोक मोहांत पडतात. असा मोह यथार्थ ज्ञानानें ज्या " ज्ञानमार्गी यती " चा नाहींसा झाला, त्यास सूर्योदय झाल्यानें जसें सर्व स्पष्ट दिसूं लागतें,तसें तें परब्रह्म स्पष्ट दिसूं लागतें. आणि मग त्याच ठिकाणीं बुद्धि लावून, तेंच आपला आत्मा असें जाणून, तेंच आपलें ध्येय असें समजून, त्याच्याच ठिकाणीं परायण होऊन, ज्ञानानें सर्व पापांचा मल धुवून गेल्यानें हे ज्ञानमार्गी ' संन्यासी ' जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होतात. ' अशा ज्ञानवान् पंडितांची प्राणिमात्रांच्या ठिकाणीं समदृष्टि होते हें लक्षण लक्षांत ठेव. ' विद्या व विनय यांनीं युक्त असलेला पूज्य ब्राह्मणही त्यांना सारखा आणि गाय, हत्ती,कुत्रा किंबहुना कुत्रें खाणारा अस्पृश्य ' चांडाळही सारखा. अशी ज्यांची समदृष्टि झाली त्यांनीं याच लोकीं जन्ममरण जिंकलें यात आश्चर्य काय ? कारण एक ब्रह्मच निर्दोष आणि सम आहे; अर्थात् असे समदृष्टि पुरुष ब्रह्मांतच स्थित आहेत [२०–२३]. जो अंतःसुख, अंतराराम, अंतर्ज्योति, तो योगी ब्रह्मस्वरूप होऊन ब्रह्मानंदाचा अनुभव घेतो. क्षीणपाप झालेले ऋषि ' म्हणजे ब्रह्मज्ञानी संन्यासी " सर्व संशय नाहींसे होऊन चित्ताचें नियमन करून सर्व भूतांचें कल्याण करण्यांत निमग्न होतात आणि ब्रह्माचा आनंद भोगतात. ज्या यतींचा काम, क्रोध नष्ट होऊन चित्त स्थिर झालें आहे व ज्यास परमात्म्याचें ज्ञान झालें आहे, त्याच्याभोंवतीं ब्रह्मानंद हात जोडून उभा असतो. ' असे यति ब्रह्माचें ध्यान करतात त्याचा प्रकार असा;' बाह्य विषयांना बाहेरच ठेवून,डोळ्याची दृष्टि भिवयांच्या मधोमध आंत लावून, प्राण व अपान म्हणजे आंत व बाहेर जाणारा वायु सारखा नासिकेच्या अभ्यंतरांत चालवून इंद्रियें, मन व बुद्धि यांचें नियमन करून मोक्षपरायण होऊन ब्रह्माचें मनन केलें असतां इच्छा, भय, क्रोध कायमचे नाहींसे झालेले यति मुक्तच होतात. ' असो. ' सर्व प्रकारच्या यज्ञांचा व तपांचा भोक्ता मी आहें; अशा यज्ञतपांनीं मिळणाऱ्या स्वर्ग–ब्रह्मादि लोकांचा ईश्वर मीच आहें, आणि सर्व भूतांची प्रत्युपकाराची इच्छा न धरतां केवळ प्रेमानें मदत करणारा सुद्धां मी आहें असें जाणल्यानें मनुष्य अक्षय शांतीप्रत प्राप्त होतो (भग० अ० ५ ).

' अर्जुना, मी तुला कर्मसंन्यासाचें स्वरूप समजावून सांगितलें, आतां

तुला योगाचें स्वरूप समजावून सांगतों; म्हणजे सांख्य आणि योग हे एकच आहेत असें जें आम्हीं पूर्वी म्हटलें तें तुझ्या चांगलें लक्षांत येईल. लोक संन्यास म्हणजे अग्निहोत्र सोडून अरण्यांत जाणें असें समजतात, व योग म्हणजे सर्व कर्में सोडून हात–पाय बांधून बसणें असें मानतात,पण ह्या गोष्टी केवळ बाह्य आहेत, हें त्याचें खरें स्वरूप नव्हे. जो कर्मांच्या फलाचा आश्रय सोडून कर्मच करतो तोच खरा संन्यासी आणि तोच खरा योगी.केवळ अग्नि किंवा कर्म सोडल्यानें संन्यास अथवा योग होत नाहीं. सारांश, योग तोच संन्यास आणि जो संन्यास तोच योग; कारण,संन्यासाला जसा चित्ताचा योग साधल्याशिवाय गत्यंतर नाहीं तसा'संकल्पाचा संन्यास केल्याशिवाय कोणी योगी होऊं शकत नाहीं.योगावर आरूढ होण्याचें साधन,'निष्काम'कर्म आहे आणि योगावर आरूढ होऊन त्या ठिकाणीं कायम राहण्याचें साधन शम' अथवा उपरम अर्थात् संन्यास आहे.जो मनुष्य सर्व संकल्पाचा त्याग करून इंद्रियांच्या विषयांत किंवा कर्मांत अनुरक्त होत नाहीं तो योगारूढ झाला असें समजावें. याप्रमाणें मनुष्यानें आपल्या आत्म्याचा उद्धार आपल्या आत्म्याच्याच जोरावर करावा; आपल्या आत्म्यास अधोगतीस जाऊं देऊं नये. शीत–उष्ण, सुख–दुःख, मान-अपमान, ह्या दोहोंत अत्यंत समाधान-वृत्ति ठेवावी आणि मृत्तिका व कांचन सारखें मानावें. सर्व लोकांच्या ठिकाणीं मग ते साधु असोत किंवा पापी असोत सारखी बुद्धि ठेवावी. असें केल्यावर योगानें सर्व इच्छा व परिग्रह सोडून एकांतांत एकटें बसून मनाला योगांत स्थिर करण्याचा अभ्यास नेहमीं करावा. स्वच्छ प्रदेशांत, फार उंच नाहीं, फार खोलांत नाहीं अशी बसावयाची जागा पसंत करून, तेथें प्रथम दर्भ, त्यावर चर्म व त्याजवर वस्त्र घालून स्थिर आसन घालावें. मग इंद्रियें व चित्त यांचा निग्रह करून मन एकाग्र करावें,आणि आत्मशुद्धीसाठीं योग साधावा. पाठीचा कणा, मान आणि डोकें हीं सरळ करून स्थिर धरावीं, आणि डोळ्यांची दृष्टि नासिकाग्रावर कोणत्याही दिशेकडे न पाहतां शून्य लावावी. भयरहित होऊन चित्त शांत ठेवावें, ब्रह्मचर्यव्रत धारण करावें व मनाचें नियमन करून परमेश्वराचें ध्यान करीत योगांत मग्न व्हावें. याप्रमाणें जो नेहमीं योग करतो तो परमेश्वराच्या ठिकाणीं राहणाऱ्या व आनंदानें भरलेल्या शांतीला पावतो. योगी पाहिजे तितकें खातो किंवा उपास करतो,

पाहिजेल तितका निजतो किंवा जागत बसतो ही कल्पना चुकीची आहे. ह्या गोष्टी हानि करणाऱ्या आहेत.' आहार, विहार, चेष्टा, निद्रा आणि जागृति हीं नियमित केल्यानेंच योगसाधन दुःखरहित होतें. याप्रमाणें निःस्पृह होऊन सर्व इच्छा सोडून जेव्हां मनुष्याचें मन योगानें स्थिर होतें तेव्हां तो युक्त अथवा योगी झाला असें समजावें. निर्वात प्रदेशांत जशी दिव्याची ज्योत न हालतां सारखी जळत राहते, त्याप्रमाणें योगानें स्थिर झालेल्या चित्ताची स्थिति असते. पूर्ण योगाचें स्वरूप 'अर्जुना, मी तुला सांगतों.' जेव्हां योगाच्या सेवनानें चित्त विषयांपासून अगदीं परावृत्त होऊन उपरम पावतें, जेव्हां आपल्या मनानें आपल्यासच पाहत योगी आपल्याच ठिकाणीं तुष्ट होतो;जेव्हां योगी इंद्रियातीत केवळ बुद्धीनेंच गम्य असें निःसीम सुख अनुभवूं लागतो,जेव्हां योगांत स्थित झाला असतां योगी तत्त्वापासून चलन पावत नाहीं,जेव्हां अशा योगापेक्षां'सार्वभौमत्व प्राप्तीसारखा सुद्धां'अन्य कोण-ताही लाभ जगतांत योग्यास अधिक वाटत नाहीं आणि ज्या योगांत स्थित झाला असतां 'पुत्रशोकादि' भयंकर दुःखांनींही योग्याचें मन विचलित होत नाहीं, तेव्हां ती दुःखसंयोगाचा अत्यंत वियोग करणारी स्थिति पूर्णयोग समजावी. अशी योगस्थिति साधण्यासाठीं वैराग्य उत्पन्न झालेल्या पुरुषानें जरूर यत्न करावा. सर्व संकल्प सोडून मनानें इंद्रियांचा निग्रह करून बुद्धि धैर्यानें स्थिर करावी, आणि मन आत्म्याच्या ठिकाणीं विलीन करून सर्व विचार बंद करावे. मन फिरफिरून बाहेर जाईल त्यास पुन्हां पुन्हां परतवून आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर करावें. अशा रीतीनें जो नेहमीं योगाचा अभ्यास करतो त्याचें सर्व पाप नष्ट होऊन त्यास शेवटीं ब्रह्मनिष्ठांचेंच निरतिशय सुख प्राप्त होतें. त्याचीही ब्रह्मनिष्ठ संन्याशाप्रमाणेंच समदृष्टि होऊन, त्यास सर्व भूतांच्या ठिकाणीं आपण व आपल्या ठिकाणीं सर्वभूतमात्र योगयुक्त झाल्यानें दिसूं लागतात. जो माझ्या ठिकाणीं सर्व जग आणि सर्व जगाच्या ठिकाणीं मला पाहतो तो माझ्यापासून कधींही वेगळा होत नाहीं. किंवा मी त्याजपासून वेगळा होत नाहीं. जो सर्वत्र आपल्याचप्रमाणें सुख अगर दुःख समत्वानें पाहतो तो योगी श्रेष्ठ होय. 'येथें एक शंका मनांत येऊन' अर्जुनानें विचारिलें, "हा समदृष्टीनें जाणारा योग तूं सांगितलास, पण तो, मन चंचल असल्यानें कायमचा टिकेल असें मला वाटत नाहीं." श्रीकृष्ण

म्हणाला, "तूं म्हणतोस तें खरें आहे; मन अत्यंत चंचल असून निग्रह करण्यास कठीण आहे; परंतु अभ्यास आणि वैराग्य या दोन गोष्टींनीं तें स्थिर करणें शक्य आहे. 'मात्र' ज्याचें मन ताब्यात येत नाहीं त्याला योग साध्य होणें शक्य नाहीं. ज्याचें मन वश्य असेल तोच योग सिद्ध करूं शकेल. हें ऐकून अर्जुनानें आपली शंका श्रीकृष्णासमोर स्पष्ट मांडली." 'ये चेमेऽरण्ये श्रद्धातप इत्युपासते', 'व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरंति' इत्यादि वेदवाक्यांनीं विहित असलेला चतुर्थाश्रम घेऊन, यति न होतां जो श्रद्धेनें योगाच्या अभ्यासास लागला, पण ज्याचें मन चंचल असल्यानें ज्यास योग साध्य झाला नाहीं त्याची गति काय ? तो वेदमार्गापासूनही भ्रष्ट झाला व योगापासूनही भ्रष्ट झाला, अर्थात् ब्रह्मप्राप्तीपासून दोन्हींकडून च्युत झाल्यानें जसा मेघ फुटला म्हणजे नाहींसा होतो त्याप्रमाणें त्याचा समूळ नाश तर होत नाहींना ? श्रीकृष्णा, हा मला मोठा संशय उत्पन्न झाला आहे, याचें निवारण करणारा तुझ्याशिवाय मला कोणी दिसत नाहीं. श्रीकृष्णानें उत्तर केलें, "अर्जुना, इहलोकीं किंवा परलोकीं अशा पुरुषाचा नाश होत नाहीं. सत्कर्म करणारा कोणीही दुर्गतीला जात नाहीं, हा तूं निश्चय समज." त्याच्या पुण्याप्रमाणें उत्तम लोकांस जाऊन पुण्य असेल त्या मानानें कांहीं काळपर्यंत तेथें राहून तो इहलोकीं शुद्धाचरणयुक्त ऐश्वर्यवान् कुळांत जन्मास येतो आणि इहलोकींचें सुख भोगतो. अथवा योग्याच्याच कुळांत त्यास जन्म मिळून पूर्वदेहांत अपुरा सोडलेल्या योगाच्या मार्गास तो लागतो. अशा प्रकारचा जन्म फारच दुर्लभ होय. त्याचें चित्त नसलें तरी पूर्वीच्या अभ्यासाच्या जोरानें तो योगाकडेसच वळतो; आणि याप्रमाणें प्रयत्न करतां करतां अनेक जन्मांच्या अंतीं पापरहित होऊन तो परमगतीला जातो. अर्जुना, मी तुला तपस्वी, ज्ञानी, आणि कर्मी ( यांचें वर्णन सांगितलें ) त्यांहून ध्यानयोगी अधिक आहे असें मला वाटतें. यासाठीं तूं योगी हो, आणि फलाची इच्छा सोडून कर्म करीत करीत योगमार्गानें ब्रह्म प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न कर. याहूनही एक आणखी निराळा मार्ग आहे तो मी तुला समजावून सांगतों. आजपर्यंत पुण्यवानांनीं आचरलेले हे सर्व मार्ग उत्तमच आहेत; पण याहूनही एक माझ्या मतें श्रेष्ठ मार्ग आहे. अर्जुना, 'सर्व योगामध्यें भक्तियोग श्रेष्ठ आहे, आणि' सर्व योग्यांमध्यें जो योगी माझ्या

ठिकाणीं चित्त लावून श्रद्धापूर्वक माझें भजन करतो तो युक्ततम होय असें माझें मत आहे (भग० अ० ६).

'आत्मसंयमयोग अर्जुनास समजावून दिल्यानंतर हा नवीन उपदेशिलेला आपला भक्तियोग त्यास नीट कळावा या हेतूनें प्रथम परमेश्वराचें स्वरूप त्यास समजावण्यास श्रीकृष्णानें सुरवात केली.' तो म्हणाला, "अर्जुना, माझ्यावर चित्त लावून माझ्या भक्तीचा योग साधणाऱ्या मनुष्यास माझें जें यथार्थ ज्ञान होतें तें मी तुला 'प्रथम' सांगतों. माझ्या अपर स्वरूपाचें ज्ञान, माझ्या पर स्वरूपाच्या विज्ञानासह मी तुला समग्र सांगतों. हें ज्ञान मनुष्यास मिळालें म्हणजे जाणण्याची इतर वस्तुच जगांत उरत नाहीं. हजारों मनुष्यांत एखादाच हें ज्ञान मिळविण्यासाठीं यत्न करतो. आणि यत्न करणाऱ्या हजारों मनुष्यांपैकीं एखाद्यासच माझें खरें ज्ञान होतें. 'बाकीचे अर्ध्या ज्ञानानेंच सिद्ध झालों असें मानतात.' अर्जुना, माझी अपरा म्हणजे अलीकडची प्रकृति पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि व अहंकार अशा आठ भिन्न प्रकारची असून माझी दुसरी पर म्हणजे पलीकडची प्रकृति जीवरूपी आहे, तिनें हें सर्व जग धारण केलें आहे. सर्व भूतें या दोन प्रकृतींपासून झालीं आहेत. हें सर्व विश्व याप्रमाणें माझ्यापासून होतें व माझ्याच ठिकाणीं लयास जातें. हे धनंजया, माझ्याहून पलीकडे कांहीं नाहीं. ही सर्व सृष्टि माझ्या अंतर्भूत आधारावर धरलेली आहे. जसें हाराचे मणि सूत्रानें ग्रथित असून त्यांत ओंवलेले असतात, त्याप्रमाणेंच हें सर्व विश्व माझ्यांत ओत व प्रोत आहे. जलाची आर्द्रता, सूर्यचंद्रांचा प्रकाश, आकाशाचा शब्द, पृथ्वीचा पुण्यगंध, आणि अग्नीची उष्णता मी आहें. सर्व जिवंत भूतांचा जिवंतपणा मी आहें. मनुष्यांचें मनुष्यत्व मी आहें.' तपस्व्यांचें तप मी आहें. बुद्धिमंतांची बुद्धि व तेजस्व्यांचें तेज मी आहें.काम व राग या दोषांनीं रहित असें बलवानांचें बल मी आहें. धर्माला धरून असणारा भूतमात्रांचे ठिकाणीं काम मी आहे. 'ह्या सर्व उत्तम वस्तु मी आहें, व यांहून खालच्या वस्तूही मीच आहें, अन्य कोणी नाहीं.' तात्पर्य, जे सात्त्विक, राजस व तामस भाव जगांत आहेत ते सर्व माझ्याचपासून उत्पन्न झाले आहेत. पण मी त्यांत नाहीं, ते माझ्यांत आहेत हें लक्षांत ठेव. माझ्या या तीन गुणमय भावांनीं सर्व जगत् मोहून गेलें आहे. यामुळें

याहून मी पलीकडे आहें हें लोक जाणत नाहींत. माझी ही त्रिगुणात्मक दिव्य माया ओलांडून पलीकडे जाणें फार कठीण आहे; जे माझीच भक्ति करून मला शरण येतात ते या मायेला तरून जातात (१५). चार प्रकारचे लोक, अर्जुना, माझी भक्ति करतात. आर्त, जिज्ञासु, ज्ञानी, आणि अर्थार्थी. 'दुःखानें त्रस्त होऊन, किंवा परमेश्वर कसा आहे हें जाणण्याची इच्छा उत्पन्न होऊन, किंवा परमज्ञान झाल्यानेंही केवळ निरपेक्ष होऊन, किंवा कांहीं कामना मनांत धरून, मनुष्य माझें भजन करतो.' यांपैकीं अर्थातच ज्ञानी भक्त निरपेक्षतेनें माझी नित्य भक्ति करणारा असल्यानें विशिष्ट होय, हें सांगणें नको. ज्ञानी भक्ताला मी अत्यंत प्रिय आहें, व मलाही तो अत्यंत प्रिय आहे. माझें भजन करणारे सर्वच लोक उदार होत, पण ज्ञानी हा माझा केवळ आत्मा आहे. अनेक जन्मांच्या अंतीं " सर्व जग वासुदेव आहे " ही भावना उत्पन्न होऊन जो माझी निरपेक्ष भक्ति करतो तो ज्ञानी भक्त अत्यंत दुर्लभ होय. साधारणतः लोक निरनिराळ्या कामनांनीं निरनिराळ्या देवतांची अन्य अन्य नियमांनीं व रीतींनीं आपापल्या प्रकृतीनुसार भक्ति करतात. आणि जो जो ज्या ज्या ईशस्वरूपाची श्रद्धेनें भक्ति करतो त्याची त्याची ती ती श्रद्धा मी निश्चल करतों. त्या त्या श्रद्धेनें माझें आराधन करण्याची इच्छा झाली असतां ते ते काम माझ्याकडूनच त्यांस मिळतात. पण हें त्यांचें फल अंतास जाणारें आहे. देवतांची भक्ति करणारे देवतांस पोंचतात, व माझी भक्ति करणारे माझ्या ठिकाणीं येतात. माझें अव्यक्त पर स्वरूप न जाणणारे बुद्धिहीन लोक मी अव्यक्त असून मला व्यक्तरूपच मानतात. मी माझ्या योगमायेनें वेष्टित असल्यानें मी सर्व लोकांना माझ्या खऱ्या स्वरूपानें दिसत नाहीं, व मूढ लोक मी अज, अव्यय परमेश्वर आहें असें ओळखीत नाहींत. मी हल्लीं असलेले, पूर्वी झालेले व पुढें होणारे प्राणिमात्र जाणतों, पण मला कोणी जाणत नाहीं. इच्छा-द्वेषांपासून उत्पन्न झालेल्या 'कामक्रोधादि' द्वंद्वरूपी मोहानें सर्व लोक या मृत्युलोकांत अत्यंत मूढ झाले आहेत. पण ज्यांचें पाप नष्ट झालें आहे, ते पुण्यात्मे या जोडीच्या मोहांपासून मुक्त होतात, आणि माझी दृढ भावानें भक्ति करतात. जन्म-व्याधि, जरामृत्यु इत्यादि दुःखांपासून मुक्ति मिळण्यासाठीं माझा आश्रय करून जे यत्न करतात त्यांस त्या परब्रह्माचेंच ज्ञान होऊन सर्व अध्यात्माचें

व सर्व कर्मांचेंही ज्ञान होतें. अधिभूत व अधिदैव यांसह जे मलाच अधियज्ञ जाणतात, त्यांस अंतकालींही योगयुक्त चित्तानें माझेंच स्मरण होतें ( भग० अ० ७ ).

'ज्ञानविज्ञानासह परमेश्वराचीं निरनिराळीं स्वरूपें याप्रमाणें अर्जुनास सांगितलीं; तेव्हां वेदान्तांत नेहमीं येणाऱ्या वरील शब्दांचें, वस्तूंचें व तत्त्वाचें यथार्थज्ञान व्हावें या हेतूनें' अर्जुनानें प्रश्न केला. "श्रीकृष्णा, तें परब्रह्म कोणतें, अध्यात्म म्हणजे काय, आणि कर्म म्हणजे काय, अधिभूत कशास म्हणतात व अधिदैव म्हणजे कोणती वस्तु आहे, ह्या देहांत अधियज्ञ कोण व का आहे, आणि मरणकाळीं नियतचित्त झालेल्या पुरुषांनीं तुझें कसें स्मरण करावें." 'वेदान्तांत नेहमीं येणाऱ्या या गोष्टींसंबंधानें' श्रीकृष्णाने थोडक्यांत उत्तर दिलें:—"अर्जुना, अक्षर हेंचि परब्रह्म होय; आणि स्वभाव म्हणजेच अध्यात्म होय. कर्म म्हणजे प्राणिमात्राला उत्पत्तीस कारणीभूत असणारें हवन कर्म होय. ही सर्व क्षर अथवा नाशिवंत सृष्टि अधिभूत असून पुरुष अथवा ईश्वर हा अधिदैव होय. देहधारी प्राण्यांच्या देहांत अधियज्ञ मीच आहें. अंतकाळीं माझेंच स्मरण करून जो देहत्याग करतो तो निःसंशय माझ्याच स्वरूपाला पोंचतो. कारण ज्या ज्या भावाचें मनुष्यास अंतकाळीं स्मरण होऊन देह सुटतो तो पुढच्या जन्मीं त्या त्या भावानें प्रेरित होऊन त्या त्या भावाला जातो. यासाठीं माझें तूं नेहमीं स्मरण कर, आणि युद्ध कर; म्हणजे तुझें मन व बुद्धि माझ्याच ठिकाणीं निमग्न असल्यानें मरणकालीं तूं मलाच येऊन पोंचशील ( ८ ). प्रयाणकालीं भृकुटीच्या मध्यभागीं प्राण धारण करून, अणुहून अणु, सर्वांचा उत्पन्न करणारा, आदित्यासारखा तेजस्वी, तमाच्या पलीकडे असणारा पुराणकवि व शास्ता अशा अचिंत्यस्वरूप परमात्म्याचें भक्ति व योगबल यांनीं मन अचल करून स्मरण केलें असतां मनुष्य त्या दिव्य परमपुरुषाला पोंचतो, ' ही श्रुति तुला ठाऊकच आहे. ' वेदान्तवेत्ते ज्यास अक्षर म्हणतात, जेथें वीतराग संन्यासी प्रवेश करतात, आणि ज्याच्या इच्छेसाठीं ब्रह्मचारी ब्रह्मचर्य पाळतात, तें स्थान थोडक्यांत मी तुला सांगतों. सर्व शरीरद्वारांचा संयम करून हृदयांत मनाचा निरोध करून, प्राण मस्तकाच्या ब्रह्मबिंदूंत धारण करून योगधारणेंत स्थिर होऊन ओम् या ब्रह्मस्वरूपी एकाक्षराचा

उच्चार करीत, माझें स्मरण करून, जो देहाचा त्याग करून जातो, तो त्या परम स्थानाला पोंचतो ( १४ ). त्या गतीला म्हणजे माझ्या पदाला पोंचला म्हणजे अशाश्वत व दुःखाचें केवळ माहेरघर असा हा पुनर्जन्म मनुष्यास येत नाहीं. ब्रह्मलोकापासून जितके लोक आहेत तितके सर्व पुनरावर्ति आहेत; परंतु त्या परमपदाच्या ठिकाणीं पोंचल्यावर पुनर्जन्म नाहीं. ब्रह्मदेवाचा एक दिवस सहस्रयुगांचा, आणि सहस्रयुगांची त्याची एक रात्र असें ज्ञानी जाणतात. ब्राह्म दिवसाच्या प्रारंभीं अव्यक्तापासून सर्व व्यक्त जग निर्माण होतें; आणि रात्र आली म्हणजे त्याच अव्यक्त–संज्ञकांत लयास जातें. या अव्यक्ताहूनही पलीकडे असणारा जो दुसरा अव्यक्तभाव आहे, तो सर्व भूतांचा नाश झाला तरी नाश पावत नाहीं. त्यालाच अव्यक्त अक्षर असें वेदान्ती म्हणतात. तेंच तें परम पद होय. त्यालाच पोंचलें असतां पुनरावृत्ति नाहीं. तेंच माझें परम धाम होय. ज्याच्या आंत ही सर्व सृष्टि आहे,आणि ज्यानें अंतर्यामित्वानें हें सर्व जग व्यापलें आहे, तो केवळ अनन्य भक्तीनें साध्य परपुरुष होय. आतां ज्या कालीं देहांतून गेलें असतां पुनरावृत्ति होत नाहीं असें योगी जाणतात, तो काळही मी तुला सांगतों. उत्तरायणाचे सहा महिने, शुक्लपक्ष, दिवस आणि अग्निज्योति या कालीं देह सोडणारे ब्रह्मविद् ब्रह्माला पोंचतात. 'अर्थात्' दक्षिणायनाचे सहा महिने, कृष्णपक्ष, रात्र आणि धूमज्योति अशा वेळीं देह सोडला असतां योगी चंद्रावर जातो व तेथून परत येतो. हे ' आर्चिरादि व धूमादि ' शुक्ल व कृष्ण मार्ग जगतांत शाश्वत चालू आहेत. ते माहीत असणाऱ्या योग्याला कधींही मोह होत नाहीं. म्हणून अर्जुना, तूं योगमुक्त हो. वेदपठण, यज्ञ, दान, तप यांत जें पुण्यफल सांगितलें आहे, त्याहूनही या गोष्टीचें ज्ञान झालें असतां योग्यास अधिक फल मिळतें, आणि तो त्या परम स्थानाचाच रस्ता धरतो ( भग० अ० ८ ).

' याप्रमाणें अर्जुना, मी तुला वेदान्तांत प्रसिद्ध असलेलें अक्षरब्रह्माचें वर्णन सांगितलें;' पण याहून जें गुह्यतम ज्ञान मी तुला सांगणार आहें, तें तूं माझी असूया करीत नाहींस, म्हणून सांगतों. हें विज्ञानासहित ज्ञान तुला समजलें म्हणजे सुद्धां तूं अशुभापासून मुक्त होशील. ही श्रेष्ठ विद्या पवित्र असून अत्यंत गुह्य आहे. हें ज्ञान समजावयास प्रत्यक्ष आहे, धर्मास अनु-

स्वरूप आहे आणि शाश्वत असून तदनुरूप वागण्यास सोपें आहे ( ३ ). अर्जुना, हें सर्व जगत् मी आपल्या अव्यक्त शरीरानें व्यापिलें आहे. हीं सर्व भूतें माझ्यात वास करतात, पण मी त्यांत वास करीत नसून तींही माझ्या ठिकाणीं नाहींत; अर्थात् स्वतंत्र आहेत. हें माझें ईश्वरी योगसामर्थ्य पहा. आणि माझा आत्मा सर्व भूतांना अथवा उत्पत्तिमत् वस्तूंना वर्तवणारा असून त्यांस अंतर्यामित्वानें धारण करणारा आहे तरी माझी शक्ति त्यांत नाहीं ( ६ ). अर्जुना, सर्व भूतें कल्पांतीं माझ्या प्रकृतीला पोंचतात, आणि कल्पारंभीं मी त्यांस पुन्हां उत्पन्न करतों ( ८ ). मी अध्यक्ष म्हणजे वरून पाहणारा असल्यानें प्रकृति चराचर सृष्टि निर्माण करते, आणि या कारणानें हें जग वारंवार परिवर्तन पावतें. जे मूर्ख आहेत ते मला मनुष्य समजून माझा अनादर करतात ( ११ ). परंतु जे महात्मे दैवी प्रकृतीचा आश्रय करणारे आहेत, ते मी सर्व भूतांचा अव्यय आदि आहें असें जाणून माझी अनन्यभावानें भक्ति करतात. ते दृढव्रतानें माझेंच सतत गुणवर्णन करतात आणि मलाच नमस्कार करून नित्ययुक्त होऊन माझी उपासना करतात. दुसरे ज्ञानी भक्त ज्ञानयज्ञानें माझ्या एकस्वरूपाची, पृथक् स्वरूपाची किंवा विश्वस्वरूपाची उपासना करतात ( १६–१९ ). वेदत्रयाचें तत्त्व जाणणारे व सोमपान करणारे मलाच यज्ञानें संतुष्ट करून पापापासून मुक्त होऊन स्वर्गास जाण्याची इच्छा करतात आणि इंद्रलोकास जाऊन दिव्य भोग भोगतात, पण त्यांचें पुण्य सरलें म्हणजे ते पुन्हां मर्त्यलोकीं येतात. याप्रमाणें वेदत्रयांतील यज्ञकर्म निरनिराळ्या कामनांनीं करणारे जा–येच्या फेऱ्यांत पडतात; परंतु जे लोक अनन्यभावानें माझी भक्ति करतात, त्याच्या योगक्षेमाची काळजी मी वाहतों. जे श्रद्धेनें अन्यदेवांची भक्ति करतात, ते अविधीनें माझेंच पूजन करतात. कारण सर्व यज्ञांचा भोक्ता व प्रभु मीच आहें. परंतु ते मला तत्त्वतः जाणत नाहींत, म्हणून ते पतन पावतात. माझें भजन करणारे मात्र मला पोंचतात.' माझी भक्ति फार कठीणही नाहीं.' जो भक्तीनें नुसतें पत्र, पुष्प, फल किंबहुना केवळ जल मला अर्पण करतो, त्या शुद्धचित्ताच्या पुरुषानें तें भक्तीनें दिलेलें मी स्वतः अशन करतों. अर्जुना, जें तूं करशील, जें खाशील, जें हवन करशील, जे दान देशील, किंवा जें तप करशील तें मला अर्पण कर. म्हणजे कर्मांच्या शुभ व अशुभ

दोन्ही फलांपासून सुटून फल-संन्यास योगांत तुझें चित्त युक्त झाल्यानें तूं मुक्त होशील, आणि मला येऊन पोंचशील. जरी मी समदृष्टि आहें, मला कोणी द्वेष्य किंवा प्रिय नाहीं, तथापि जे माझे भक्तीनें भजन करतात ते माझ्यांत आहेत, आणि मी त्यांच्यांत आहें. अत्यंत दुराचारी मनुष्य-सुद्धां जर अनन्यभावानें माझे भजन करील तर तो साधूच समजला पाहिजे. कारण जो पुण्यकर्माला लागला तो तात्काळ धर्मात्मा होतो, व नित्य शांतीला पोंचतो. ' संन्यास किंवा योग किंवा यज्ञ हे मार्ग खुले नसल्यानें स्त्री, वैश्य, शूद्र किंवा अन्य पापयोनींत उत्पन्न झालेलीं मनुष्यें सुद्धां माझा आश्रय केल्यानें उत्तम गतीला जातात, मग पुण्यब्राह्मण आणि भक्तराजर्षि जातील हे सांगितलें पाहिजे काय ? यासाठीं अर्जुना, या अशाश्वत आणि दुःखानें भरलेल्या लोकांत येऊन तूं माझें भजन कर. अर्जुना, तूं माझ्या ठिकाणीं मन लाव, माझी भक्ति कर, मला यज्ञ अर्पण कर, निदान मला नमस्कार कर, म्हणजे मत्परायण होऊन भक्तियोगांत तूं रत झाल्यानें मलाच पोचशील ( भग० अ० ९ ).

' सर्व विद्यांत, सर्व गुह्यांत, सर्व योगांत श्रेष्ठ, अशी ही राजविद्या, हें राजगुह्य, हा राजयोग ऐकून ' अर्जुनाचें अंतःकरण प्रफुल्लित झालेलें पाहून श्रीकृष्ण पुढें म्हणाला, " अर्जुना, तुला संतोष होत आहे हें पाहून मी तुला आणखी सांगतों. माझें हें परम भाषण ऐक. माझा प्रभाव देव आणि महर्षि यांसही पूर्णपणें कळत नाहीं. कारण मी त्या सर्वांचा आदि आहें ( २ ). बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, तसेंच सुख, दुःख, जन्म, मृत्यु, भय, अभय, आणि अहिंसा, समता, तुष्टि, तप, दान, यश, अयश, हे सर्व निरनिराळे भाव भूतांना माझ्यापासूनच मिळतात. सात महर्षि आणि पूर्वींचे चार मनु, ज्यांपासून ह्या सर्व प्रजा उत्पन्न झाल्या आहेत ते माझ्या मनापासून उत्पन्न झालेले माझेच भाव आहेत. याप्रमाणें जो माझा ऐश्वर्ययुक्त योग जाणतो तो निश्चल भक्तियोगांत युक्त होतो. अर्जुना, पूर्ण भक्तियोगाचें स्वरूप मी तुला सांगतों ' मी सर्वांचा प्रभव आहें आणि माझ्यापासूनच सर्व गोष्टी प्रवृत्त होतात असें मानून हे सुजाण भक्त अत्यंत भावानें युक्त होऊन माझें भजन करतात, त्यांचें चित्त सदैव माझ्याकडे लागलेलें असतें; त्यांचे प्राणही माझ्या ठिकाणीं अर्पण

असतात; ते एकमेकांस भक्तीचाच बोध करतात;आणि माझ्या गुणांचें वर्णन करण्यांत संतोष पावून रममाण होतात. खऱ्या प्रीतीनें माझी भक्ति करणाऱ्या अशा पुरुषांस मी मजकडे नेणारी बुद्धि देतों आणि त्यांच्या हृदयांतील अज्ञानतम प्रदीप्त ज्ञानज्योतीनें नाहींसें करतों. " हें ऐकून अर्जुन भक्तीनें म्हणाला, " श्रीकृष्णा, तूंच पर ब्रह्म, तूंच पर धाम, तूंच परम पवित्र, तूंच शाश्वत पुरुष. तूंच दिव्य आदिदेव, तूंच अज, तूंच विभु आहेस. सर्व महर्षि हेंच म्हणतात, आणि तूंही मला हेंच सांगतोस ( १४–१५–१६ ). पण हें तुझें परम स्वरूप जाणण्यासाठीं कोणकोणत्या विभूतींच्या माहात्म्यानें तुझें ध्यान करावें हे मला विस्तारानें सांग. तुझें "अमृततुल्य भाषण ऐकतांना माझी तृप्ति होत नाहीं. " श्रीकृष्ण म्हणाला, माझ्या विभूतींचा अंत नाहीं. तथापि मुख्य मुख्य विभूति मी तुला सांगतों. मी सर्व भूतांच्या अंतर्हृदयांत राहणारा आत्मा आहे आणि मी सर्वांचा आदि, अंत आणि मध्य आहे. आदित्यांत मी विष्णु आहे आणि तेजस्वी गोलांत सूर्य आहें; मारुतांत मरीचि आहें आणि नक्षत्रांत चंद्र आहे; वेदांत मी सामवेद आहे; देवांत इंद्र आहें, रुद्रांत शंकर आहें, यक्ष–राक्षसांत कुबेर, वसूंत पावक, पुरोहितांत देवांचा पुरोहित बृहस्पति, सेनापतींत देवांचा सेनापति स्कंद, जलाशयांत सागर, महर्षींत भृगु, शब्दांत एकाक्षरी ओंकार, यज्ञांत जपयज्ञ, स्थावरांत हिमालय, वृक्षांत अश्वत्थ, देवर्षींत नारद, सिद्धांत कपिल, मनुष्यांत नृप ( २७–२८–२९ ), मृगांत सिंह, पक्ष्यांत गरुड, पवित्र करणाऱ्यांत वायु, शस्त्रभृतांत रामचंद्र, नद्यांत जान्हवी, विद्यांत आध्यात्मविद्या, अक्षरांत अकार, समासांत द्वंद्व ( ३३–३४ ), छंदांत गायत्री, वृष्णींत वासुदेव, पांडवांत धनंजय आणि मुनींत व्यास आहे ( ३८–३९ ). अर्जुना, माझ्या विभूतींचा अंत नाहीं. थोडक्यांत सांगणें तर जो जो प्राणी अथवा जी जी वस्तु, विभूति, ऐश्वर्य आणि उत्साह यांनीं युक्त आहे तो तो किंवा ती ती माझ्या अद्भुत अंशापासून आहे हें जाण; पण यावरून असें नको समजूं कीं, बाकीचे प्राणी माझ्याहून कोणी निराळे ( ख्रिस्तांच्या सैतानासारखे किंवा पारशांच्या अहरिमानासारखे ) आहेत. अर्जुना, मीच हें सर्व जग चतुर्थांशानें व्यापिलें आहे आणि माझे तीन हिस्से अमृतरूपानें दिव्य लोकांत आहेत " (भ० अ० १०).

' अर्जुनाच्या प्रीतीस्तव हा अध्यात्मज्ञानाचा साधनरूप विभूतियोग श्रीकृष्णानें त्यास सांगितला. तेव्हां अर्जुन म्हणाला, " श्रीकृष्णा, तुजपासून हें अध्यात्मसंज्ञक परम गुह्य ऐकून माझा मोह नाहींसा झाला. सृष्टि कशी उत्पन्न होते, आणि लय पावते, हें मला समजलें. तुझें ऐश्वररूपही मला तूं सांगितलेंस. त्याप्रमाणेंच तुझें रूप आहे, यांत संशय नाहीं. पण तुझें तें परमेश्वरी स्वरूप पाहण्याची मला इच्छा उत्पन्न झाली आहे, तर हें शक्य असेल तर, योगेश्वरा, तें मला दाखीव " ( ५-९ ). ' मनुष्यास शब्दांनीं ईशस्वरूप कितीही सांगितलें तरी स्वानुभवाशिवाय समाधान होत नाहीं. श्रीकृष्णासारखा प्रत्यक्ष ईश्वर गुरु सांगणारा आणि अर्जुनासारखा त्याजवर पूर्ण भरंवसा ठेवणारा, परम भक्त ऐकणारा, तथापि त्याच्या हृदयाच्या कोनाकोंपऱ्यांत संशय दडून राहिलाच होता; तो नाहींसा करण्या-साठीं, महायोगेश्वर श्रीहरीनें त्यास प्रथम दिव्यदृष्टि देऊन आपलें विश्व-रूप दाखविलें. आकाशांत एकदम हजार सूर्य उगवले असतां जें तेज पसरेल त्याची त्या स्वरूपाच्या पसरलेल्या तेजास उपमा थोडीशी साजेल. त्या अद्‌भुत रूपाला हजारों डोळे, तोंडें, हात, पाय असून हजारों स्वरूपांचें सर्व जग त्यांत एके ठिकाणीं दिसत होतें. पृथ्वीपासून तों जोंपर्यंत वर आकाश दिसत होतें तोंपर्यंत तें रूप व्यापलें असून कमलावर बसलेल्या ब्रह्मदेवासह सर्व देव, सर्व असुर, सर्व नाग त्यांत दिसत होते. इतकेंच नव्हे तर त्यानें सर्व दिशा व्यापल्या असून महर्षि, सिद्ध, गंधर्व, यक्ष, मरुत, वसु हात जोडून त्याची प्रार्थना करीत होते. या रूपाच्या हजारों दंष्ट्रायुक्त भयंकर मुखांत रणांगणांत उभे राहिलेले दोन्ही बाजूंचे लक्षावधि वीर, धृतराष्ट्राचे पुत्र, भीष्म, द्रोण, कर्ण, द्रुपद, विराट इत्यादि रथी कोणाचें डोकें फुटलें आहे, कोणाचे हात तुटले आहेत, अशा रीतीनें भराभर शिरत होते, आणि नाहींसे होत होते. किंबहुना ज्याप्रमाणें प्रदीप्त झालेल्या अग्नींत हजारों पतंग जोरानें पडून नाश पावतात, त्याप्रमाणें ते समग्र लोकच्या लोक त्या स्वरूपाच्या आ पसरलेल्या मुखांत गडप होत होते. असें तें भयंकर विशाळ रूप पाहून अर्जुनाच्या अंगावर विस्मयानें व भीतीनें रोमांच उभे राहिले. त्यानें एकदम हात जोडून म्हटलें, "देवाधिदेवा, तुम्ही कोण आहां तें मला सांगा; तुमचें हें उग्ररूप पाहून मला दिशा सम-

जेनाशा होऊन माझा जीव घाबरा झाला आहे. मी तुम्हांस वारंवार नमस्कार करतों, तुम्ही कोण आहां तें देवा, मला सांगा." श्रीकृष्णानें उत्तर केलें, "मी सर्व लोकांचा क्षय करणारा काल आहे. या वेळेस मी प्रवृद्ध होऊन लोकांचा नाश करण्यास प्रवृत्त झालों आहें. हे युद्धासाठीं उभे राहिलेले सर्व वीर मीं मारले आहेत. तर अर्जुना, ऊठ, यश घे आणि शत्रूंस जिंकून समृद्ध राज्य उपभोग. हे द्रोण, भीष्म, कर्ण इत्यादि वीर मीं पूर्वीच मारले आहेत; तूं त्यांस मारण्यास निमित्त मात्र हो." हें ऐकून, थरथर कांपत, हात जोडून, पुन्हां पुन्हां नमस्कार करून किरीटी श्रीकृष्णास म्हणाला, "हे हृषीकेशा, सर्व जग तुझ्या कीर्तीनें हृष्ट होऊन तुझ्या ठिकाणीं अनुरक्त झालें आहे यात आश्चर्य काय ! सर्व राक्षस तुला भिऊन पळतात आणि सर्व सिद्ध तुला नमस्कार करतात, तें सर्वथैव योग्य आहे. हे अनंता,हे जगन्निवासा देवा,तूं अक्षर आहेस,आणि सत् आणि असत् यांच्या पलीकडे आहेस. तूं पुराणपुरुष आहेस, तूं या विश्वाचें परम निधान आहेस, तुला हजार नमस्कार असोत. तूं माझा सखा समजून कृष्णा, यादवा इत्यादि एकेरी नांवांनीं मीं तुला हाक मारिली. विहार, शयन, आसन, भोजन इत्यादि प्रसंगीं तुझी मीं अमर्यादा केली,त्याजबद्दल तूं मला क्षमा कर. तूं चराचर विश्वाचा पिता आहेस, पूज्य गुरु आहेस, तुझ्या समही कोणी नाहीं, मग तुझ्याहून अधिक कोण असूं शकेल ! तुझें अदृष्टपूर्वक रूप पाहून माझ्या अंगावर रोमांच आले आहेत; भयानें माझें मन व्यथित झालें आहे; तर देवा, जगन्निवासा, मला तूं आपलें पूर्वीचेंच सौम्यरूप दाखव." हें ऐकून श्रीकृष्णानें पुन्हां आपलें पूर्वरूप प्रकट करून म्हटलें, "अर्जुना, तूं जें माझें आज रूप पाहिलेंस तें दुर्मिळ रूप पाहण्याची देव सुद्धां इच्छा करतात. वेदाध्ययनानें, तपानें, दानानें किंवा यज्ञानें माझें रूप पहावयास मिळावयाचें नाहीं. केवळ परमभक्तीनेंच हें माझें रूप पाहण्यास, जाणण्यास किंवा प्रवेश करण्यास शक्य आहे. मला सर्व कर्में अर्पण करून माझ्या ठिकाणीं परायण होऊन माझी भक्ति करून संगरहित होऊन जो सर्व भूतांचें वैर सोडतो तो माझ्या रूपांत मिळून जातो" (भग० अ० ११).

'श्रीकृष्णानें नवीन उपदेशिलेला व विश्वरूपाच्या प्रत्यक्ष दर्शनानें मना-

वर पक्का ठसविलेला हा भक्तिमार्ग अधिक श्रेष्ठ किंवा वेदांत सांगितलेला अव्यक्तोपासनेचा मार्ग अधिक श्रेष्ठ ही शंका पुन्हां येऊन ' अर्जुनानें प्रश्न केला, "श्रीकृष्णा, याप्रमाणें सतत योग साधून जे भक्त तुझी उपासना करतात ते अधिक योग जाणणारे किंवा जे अव्यक्त अक्षराची उपासना करतात ते अधिक योग जाणणारे?" श्रीकृष्णानें उत्तर केलें, "माझ्या ठिकाणीं मन लावून सततयुक्त होऊन परमश्रद्धेनें जे माझी उपासना करतात ते युक्ततम असें माझें मत आहे. आतां जे अनिर्देश्य, अव्यक्त, सर्व ठिकाणीं भरलेलें, कूटस्थ, अचल अशा अक्षराची उपासना आपल्या इंद्रिय-समूहाचें नियमन करून सर्व ठिकाणीं समबुद्धि ठेवून करतात ते सर्व भूतांचें हित करण्यांत तत्पर असलेले 'वेदांतमार्गी संन्यासी' मलाच पोंचतात. परंतु अव्यक्ताची उपासना करण्यांत क्लेश अधिक होतात; कारण शरीरधारी मनुष्यास अव्यक्ताचें ध्यान मोठया दुःखानें होतें. यासाठीं सर्व कर्मे मला अर्पण करून अनन्य योगानें माझी भक्ति करून ( ७ ) तूं माझ्या ठिकाणीं मन व बुद्धि लाव म्हणजे इहलोकींची यात्रा संपली म्हणजे तूं निःसंशय माझ्याच ठिकाणीं येऊन राहशील. याप्रमाणें माझ्या ठिकाणीं मन निश्चल लावणें शक्य नसेल तर या गोष्टीचा अभ्यास कर; तसें करणेंही होत नसेल तर तुमतीं सर्व कर्मे मला अर्पण कर आणि हेंही होत नसेल तर केवळ कर्मफलाचा त्याग कर, ' म्हणजे तूं शेवटीं मलाच येऊन पोंचशील ' ( १२ ). ' अर्जुना, निरनिराळ्या मार्गांनीं परमेश्वराची भक्ति करणारे मला प्रियच आहेत. ' सर्व भूताचा द्वेष सोडून किंबहुना मैत्री जोडून त्यांजवर करुणा करणारा निर्मम, निरहंकार, सुखदुःख सम मानणारा, क्षमावान्, नित्य संतुष्ट योगी माझ्याच ठिकाणीं बुद्धि अर्पण करणारा असा माझाच भक्त असून तो मला प्रिय आहे. लोकांस उद्वेग न करणारा व लोकांपासून उद्वेग न होणारा हर्षामर्षांनीं विमुक्त असा मनुष्यही मला प्रियच आहे. जो कोण-त्याच कर्माला आरंभ करीत नाहीं तो शुचि, उदासीन, गतव्यथ भक्तही मला प्रिय आहे. शत्रु व मित्र, मान व अपमान, शीत व उष्ण, सुख व दुःख, निंदा व स्तुति सम मानणारा, मौन धारण करणारा, मिळेल त्यांत संतुष्ट होणारा, असा गृहाचा त्याग करणारा, स्थिरमति ' संन्यासी ' ही मला प्रिय आहे; परंतु या सर्वांहून जो वर सांगितल्याप्रमाणें माझें धर्म्य व

अमृत मत पाळून श्रद्धेनें माझ्या ठिकाणीं परायण होतो तो भक्त मला अत्यंत प्रिय होय ( भग० अ० १२ ).

'याप्रमाणें आपला भक्तियोग अर्जुनास समजावून तत्त्वज्ञानाचा राहिलेला विषय त्यास समजाविण्याच्या हेतूनें''श्रीकृष्ण पुढें म्हणाला,अर्जुना,या शरीरास क्षेत्र अशी संज्ञा आहे, ' कारण त्यांत जें पेरावें तें उगवणारें आहे,' आणि या शरीराला जाणणारा अंतर्यामी आत्मा यास तत्त्ववेत्ते क्षेत्रज्ञ म्हणतात. सर्व क्षेत्रांत हा क्षेत्रज्ञ एकच असून तो मीच आहें ' हे मीं तुला पूर्वी सांगितलें आहे.' आणि क्षेत्र अथवा शरीरही मीच असल्यानें, क्षेत्राचें व क्षेत्रज्ञाचें ज्ञान तें माझेंच ज्ञान होय. हें क्षेत्र विकारांसह कोणतें आणि क्षेत्रज्ञ कोण व कसा हें मीं थोडक्यांत तुला सांगतों. याचें वर्णन ऋषींनीं वेद-मंत्रांत व हेतुयुक्त ब्रह्मप्रतिपादक सूत्ररूप ग्रंथांत केलें आहे.पंचमहाभूतें अहंकार, बुद्धि आणि अव्यक्त अशी अष्टविध प्रकृति व मनासह अकरा इंद्रियें, पंचें-द्रियांचे विषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, चेतना व धृति असे विकार मिळून हें क्षेत्र बनलें आहे. अमानित्व, अदांभित्व, अहिंसा, शांति, सरलता, गुरूची शुश्रूषा, शुचिर्भूतता, स्थैर्य, मनोनिग्रह, विषयांविषयीं वैराग्य, अहंकाराचा त्याग,जन्म-मृत्यु-जरा-व्याधि इत्यादि दुःख-दोषांनीं हें शरीर भरलें आहे अशी तीव्र जाणीव, पुत्र, भार्या, गृह इत्यादिकांविषयीं अनासक्ति, इष्ट किंवा अनिष्ट प्राप्त झाले असतां हर्ष किंवा शोक न होतां चित्ताचें समत्व राहणें, निवांत जागीं बसण्याची चाड व लोकांच्या संमर्दा-पासून त्रास, माझ्या ठिकाणीं अव्यभिचारी भक्ति, अध्यात्मज्ञानाकडे नित्य लक्ष आणि तत्त्वज्ञानाची चांगली समजूत, या ब्रह्मज्ञानाच्या पायऱ्या आहेत; अर्थात् याच्या उलट गोष्टी अज्ञानाची उतरंड होत. आतां ज्ञेय वस्तु म्हणजे परब्रह्म त्याचें तुला स्वरूप सांगतों. ज्याला आदि नाहीं, जें सत् व असत् याहून भिन्न आहे, ज्यास सर्व बाजूनें हात, पाय, डोळे, कान, तोंड, डोकें आहे, जें सर्व व्यापून राहिलें आहे, ज्याच्या ठिकाणीं सर्व इंद्रियें भासतात परंतु ज्यास कोणतेंही इंद्रिय नाहीं, असक्त असून सर्वांना धारण करणारें, निर्गुण असून गुणांचा उपयोग घेणारे, सर्व भूतांच्या बाहेर असून आंत असणारे, अचर असून चर व दूर असून जवळ असणारें, सूक्ष्म असल्यानें जाणण्यास अशक्य, सर्व भूतांत एकत्वानें भरलें असून भूतांच्या

भिन्नपणानें विभक्त दिसणारें, सर्व भूतांना पोसणारें, लयास नेणारें व उत्पन्न करणारें, ज्योतींचेंही ज्योति, तमाच्या पलीकडे असणारें असें जें तें परब्रह्म होय. तें ज्ञानस्वरूप असून ज्ञानाचेंच गम्य आहे आणि सर्वांच्या हृदयांत अधिष्ठित आहे. याप्रमाणें क्षेत्र, क्षेत्रज्ञ आणि त्यांच्या ज्ञानाचें साधन थोडक्यांत मीं तुला सांगितलें. हें जाणून माझा भक्त माझ्याच स्वरूपास मिळतो. प्रकृति आणि पुरुष हीं दोन्हीं अनादि जाण व विकार आणि गुण हे प्रकृती-पासून उत्पन्न झाले आहेत. ' प्रकृतिपुरुषाचें तुला लक्षण सांगतों.' कार्य-कारणांची परंपरा चालण्यास हेतुभूत जी ती प्रकृति होय आणि सुखदुःखांचा अनुभव येण्यास हेतुभूत जो तो पुरुष होय. पुरुष प्रकृतींत राहून तिच्या गुणांचा उपभोग घेतो आणि गुणांत आसक्त झाल्याकारणानें शुभाशुभ योनींत जन्म घेतो. निरनिराळ्या देहांत जाणारा हा पुरुष प्रकृतीला जवळ बसून पाहतो म्हणून तिच्या क्रियांस अनुमोदन देतो व अशा रीतीनें हा तिचा उपभोग घेणारा व तिचें पोषण करणारा आहे; पण तो वस्तुतः महेश्वर परमात्माच आहे ( २३ ). या आत्म्याचें आपणच–कोणी ध्यानानें, कोणी सांख्यानें, कोणी कर्मयोगानें स्वरूप जाणतात ( २५ ). अर्जुना, जें जें स्थावर, किंवा जंगम सत्त्व उत्पत्ति पावतें तें तें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून पावतें हा निश्चय समज. त्यांत क्षेत्र भिन्नभिन्न व विनाशी असून क्षेत्रज्ञ हा सम व अविनाशी आहे; हें ज्यानें जाणलें तो जाणकार होय. सर्व ठिकाणीं ईश्वर सारखा भरला आहे ही जाणीव झाल्यानें मनुष्य आपल्या आत्म्याचा आत्म्यानेंच नाश करीत नाहीं, आणि यामुळें तो परमगतीला जातो. तसेंच प्रकृति क्रिया करते आणि आत्मा हा अक्रिय आहे हें जो जाणतो तो खरा जाणकार ( ३० ). हा आत्मा अव्यय परमेश्वरच असल्यानें निर्गुण व अनादि आहे, यास्तव देहांत असूनही तो कांहीं करीत नाहीं, किंवा कर्मानें कशांतही लिप्त होत नाहीं. जसें आकाश सर्वगत असून अत्यंत सूक्ष्म असल्यानें कशानेंही लिप्त नाहीं, त्याप्रमाणें हा आत्मा सर्व देहांत असूनही अलिप्त आहे. जसा एकटा सूर्य या सर्व भिन्नभिन्न लोकांना प्रकाश देतो, त्याप्रमाणें सर्व क्षेत्राला हा क्षेत्री प्रकाशित करतो. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा हा भेद नीट लक्षांत ठेवल्यानें व जीवाच्या प्रकृतीचा मोक्ष कसा होतो हें जाणल्यानें मनुष्य परमगतीला जातो'' ( भग० अ० १३ ).

'क्षेत्रक्षेत्रज्ञाचा विभाग सांगून' श्रीकृष्ण पुढें म्हणाला, (१-२) 'प्रकृतीला महद्ब्रह्म असेंही दुसरें नांव आहे,' त्या योनिरूप महद्ब्रह्माचे ठिकाणीं मी गर्भ स्थापन करतों, तेव्हां सर्व भूतमात्रांची उत्पत्ति होते. 'कारण ती स्वतः उत्पत्ति करण्यास समर्थ नाहीं.' 'अन्य शब्दांनीं सांगणें तर' निरनिराळ्या योनींत ज्या मूर्ति उत्पन्न होतात त्यांची मूळयोनि प्रकृति अथवा महद्ब्रह्म आहे; आणि बीज स्थापन करणारा पिता मी आहें. याच प्रकृतीपासून सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण उत्पन्न झाले आहेत. तो देहांत असणारा अव्यय देही या गुणांनीं दोऱ्यांनीं बांधल्याप्रमाणें बांधलेला आहे. त्यांत सत्त्व निर्मलत्वानें प्रकाशक असून सुखाच्या अनुभवानें व ज्ञानानें आत्म्यास बांधतें. रज प्रीतिस्वरूप असून तृष्णा उत्पन्न करतें; आणि कर्मे करावयास लावून आत्म्यास कर्मानें बांधतें. तम अज्ञानापासून उत्पन्न होऊन मनुष्यास मोह पाडतें आणि त्यास प्रमाद, आळस, निद्रा यांनीं बांधतें (९). प्रत्येक देहांत हे तिन्ही गुण असून कधीं सत्त्व इतर दोहोंतून अधिक होतें, कधीं रज व कधीं तम. जेव्हां मनुष्याची प्रवृत्ति ज्ञानाकडे धांवते तेव्हां सत्त्व विवृद्ध आहे असें जाणावें. जेव्हां रज वाढतें तेव्हां लोभ, कर्मांचा आरंभ, आणि इच्छा यांकडे वळतें.आणि तम वाढलें म्हणजे अज्ञान, आळस, प्रमाद आणि भ्रांति यांचें साम्राज्य चालतें. सत्त्व विवृद्ध असतां मरण येईल तर जीव ऊर्ध्व गतीला जातो, रज असतां कर्मसंगीं मनुष्यांत जन्म येतो आणि तम असतां वृक्ष, पशु, इत्यादि मूढ योनींत तो उत्पन्न होतो. सत्त्वाचें फल पुण्य कर्म, रजाचें दुःख आणि तमाचें अज्ञान (१७-१८). यासाठीं गुणांशिवाय दुसरा कोणी कर्म करविणारा नाहीं असें जेव्हां ज्ञानी जाणतो आणि गुणांपलीकडे असणाऱ्या परमात्म्याला ओळखतो तेव्हां तो माझ्या स्वरूपाला पोहोंचतो. देही त्रिगुणांच्या पलीकडे जाईल तरच जन्म, मृत्यु, जरा इत्यादि दुःखांपासून मुक्त होऊन अमृतसुखाचा अनुभव घेईल. अर्जुनानें विचारलें, " मनुष्य त्रिगुणातीत झाला हें कशावरून ओळखावें ? त्रिगुणातीत होण्याचा उपाय कोणता ? " श्रीकृष्णानें उत्तर केलें, " सत्त्व, रज, तम, यांचे परिणाम प्रकाश, प्रवृत्ति आणि मोह हे नाहींसें होण्याचीही जो इच्छा करीत नाहीं किंवा हें आल्याचाही जो विषाद मानीत नाहीं, गुणच प्रवर्ततात हें जाणून उदासीनपणें ज्याचें चित्त

चंचल होत नाहीं, सुख-दुःख, मृत्तिका-सुवर्ण, प्रिय-अप्रिय, निंदा-स्तुति, मान-अपमान, मित्र-शत्रु यांस सारखें मानून जो सर्व कर्माचा त्याग करतो तो त्रिगुणातीत जाणावा. अर्जुना, त्रिगुणातीत होण्याचा उपाय माझी अव्य-भिचारी भक्ति हाच आहे. जो भक्तियोगानें माझी उपासना करील तोच गुणांस ओलांडून ब्रह्मभावास पोंचेल. कारण, अमृत आणि अव्यय अशा ब्रह्माचें अर्थात् शाश्वत धर्म आणि एकांतिक सुख यांचें अधिष्ठान मीच आहें'' ( भग० अ० १४ ).

' क्षेत्र क्षेत्रज्ञ परब्रह्म, प्रकृति पुरुष आणि गुणविभाग यांचें पूर्वाचार्यांनीं सांगितल्याप्रमाणें विवेचन करून, या विवेचनास सोन्याच्या कळसाप्रमाणें शोभणारा आपला समारोप जोडतांना' श्रीकृष्ण आणखी म्हणाला,'या संसा-रावर वेदांनीं एक सुंदर रूपक केलें आहे.' हा संसाररूपी वृक्ष अश्वत्थ म्हणजे उद्यांपर्यंत सुद्धां टिकणारा नसून अव्यय अथवा अविनाशी आहे, आणि याचीं मुळें वर गेलीं असून त्याच्या शाखा खालीं आल्या आहेत. 'अर्जुना, या रूपकास आणखीही वाढवितां येईल. ' या वृक्षाला वेदाच्या ऋचा हीं हिरवींगार पानें लागलीं आहेत. या वृक्षाचें ज्यांस खरें ज्ञान झालें त्यांसच वेदाचा अर्थ कळला. याच्या शाखा खालीं येऊन पुन्हां वर गेल्या आहेत, व त्यांस गुणरूपी दोऱ्यांनीं जोर आला आहे. त्या शाखांस विषयरूपी लाबडी कोंवळी पालवी फुटली आहे. आणि कर्मानुसार खालीं मनुष्य-लोकांत जाणारीं मुळे पुन्हां फुटलीं आहेत. तसेंच या वृक्षाचें रूप मुळींच दिसत नाहीं, आणि त्याचा आदि, अंत किंवा मध्य लक्षांत यत नाहीं. खालीं मुळें रुजल्यानें अधिक मजबूत झालेल्या या वृक्षाला असंगरूपी शस्त्र दृढ धरून त्यानें छेदून टाकले पाहिजे, आणि मग ' ज्यापासून हा पुराण सना-तन वृक्ष प्रसूत झाला त्यालाच मी शरण जातों ' अशी भावना धरून ज्या पदाला गेलें असतां पुनरावृत्ति नाहीं त्या पदाचा शोध केला पाहिजे ( ५ ). अर्जुना, त्या परमपदाला सूर्याचाही प्रकाश पोंचत नाहीं, आणि चंद्राचाही पोंचत नाहीं; मग अग्नीची काय कथा ? तें माझें तेजोरूपी परमधाम होय; तेथें गेलें असतां मनुष्य पुन्हां परत फिरत नाहीं. 'या संसा-रांतही मीच भरलों आहें. ' माझाच सनातन अविनाशी अंश जीवरूपानें या जीवलोकांत आहे; तो पांच इंद्रियें आणि सहावें मन असें प्रकृती-

पासून उत्पन्न झालेलें ' लोढणें गळ्यांत ' ओढीत फिरतो. जीव शरीरांत जो प्रवेश करतो किंवा शरीरांतून बाहेर पडतो तो या लोढण्यासह जसा वायु पदार्थांतून वास घेऊन निघतो त्याप्रमाणें जातो ( ९ ). शरीरांतून जातांना किंवा शरीरांत राहून इंद्रियांनीं गुणांच्या साहाय्यानें विषयांचा उपभोग घेतांना, अज्ञ लोकांस हा जीव दिसत नाहीं. ज्ञानानें पाहणाऱ्या विद्वान् मनुष्यास केवळ हा दिसूं शकतो. योगींही प्रयत्न केला असतां आपल्याच ठिकाणीं राहणाऱ्या या जीवाला पाहूं शकतात. परंतु जे युक्त-चित्त नाहींत त्यास प्रयत्न केला तरीही हा जीव दिसणार नाहीं. ' असो; सजीव सृष्टींत जसा मी आहे त्याप्रमाणें या जड सृष्टींतही मीच भरलों आहे.' जें तेज सूर्यांत राहून सर्व जगाला प्रकाशित करतें, जें चंद्रांत व तदनंतर अग्नींत राहतें तें तेज माझेंच आहे. पृथ्वींत प्रवेश करून मीच आपल्या शक्तीनें सर्व भूतांचें धारण करतों; आणि जलरूपी सोम होऊन सर्व औषधींचें पोषण मीच करतों. प्राण्यांच्या जड देहांत असणारा वैश्वा-नर अग्निही मीच आहें, आणि प्राणापानवायु मीच होऊन त्याच्या साहाय्यानें त्या अग्नीस प्रदीप्त करून मीच चतुर्विध अन्न पचन करतों. ' अग्निरूपाशिवाय ' प्रत्येकाच्या हृदयांत सदसद्विवेकरूपानें राहणारा ईश मीच आहे. आणि डोक्यांत बुद्धिरूपानें राहणारा मीच आहें. ' बुद्धीचीं जीं तीन वाढतीं स्वरूपें ' स्मृति, ज्ञान आणि विवेक हीं माझ्यापासूनच प्राप्त होतात. सर्व वेदांनीं ज्याचें ज्ञान होतें तो मीच आहे, आणि वेदाचें रहस्य सांगणारा आणि वेद जाणणाराही मीच होय. सारांश, ' दृश्य भेदाला अनुसरून सांख्य शास्त्रानें प्रकृति आणि पुरुष अशा दोन कोट्या सांगितल्या; ' पण वस्तुतः या जगांत क्षर आणि अक्षर असे दोन पुरुष आहेत. सर्व भूतें हीं क्षर होत, व भिन्न दिसणाऱ्या जडाच्या आंत राहणारा अक्षर होय. या क्षराक्षर पुरुषांहूनही उत्तम अथवा वरिष्ठ " तिसरा " पुरुष आहे; त्याला परमात्मा म्हणतात. तो अव्यय ईश्वर या लोकत्रयाला व्यापून त्याचें धारण करतो. अर्जुना, ज्या अर्थी मी क्षराहून पलीकडे आहें, आणि अक्षराहूनही पलीकडे अथवा उत्तम आहें त्या अर्थी मला लोकांत आणि वेदांत पुरुषोत्तम म्हणतात. जो मनुष्य भ्रांतिरहित होऊन मला या-प्रमाणें पुरुषोत्तम जाणतो, त्याला सर्व वस्तूंचें यथार्थज्ञान झाल्यानें सर्व

स्वरूपानें तो माझी भक्ति करतो. 'सांख्यादि शास्त्राहूनही' गुह्यतम असें हें शास्त्र मी तुला सांगितलें आहे. हें बुद्धिमान मनुष्यानें जाणलें म्हणजे त्याची इतिकर्तव्यता संपूर्ण होते ( भग० अ० १५ ).

'पुरुषोत्तम—योगास पोंचण्याची योग्यता अर्जुनाची खास आहे अशी त्याची खातरी करण्यासाठीं, किंबहुना त्यासारखा संसारांत सदाचरणानें वागणारा मनुष्यही अखेरीस मोक्षाकडे जातो हें त्याच्या मनावर ठसविण्यासाठीं' श्रीकृष्ण म्हणाला, 'ज्याप्रमाणें सत्त्व, रज, तम यांनीं सृष्टि त्रिधा भिन्न आहे, त्याप्रमाणें दैवी आणि आसुरी संपत्ति अशा दोन स्वभावांनीं ही सृष्टि द्विधा आहे.' संकटांचे प्रसंगीं निर्भयता, अंतःकरणाची शुद्धता आणि ज्ञानयोगाचे ठिकाणीं निश्चलता, तसेंच दान, दम, यज्ञ, स्वाध्याय, तप आणि ऋजुता, अहिंसा, सत्य, अक्रोध, फलाचा त्याग, शांति, सुष्टपणा, सर्व भूतांविषयीं दया, विषयांचे ठिकाणीं लंपट न होणें, मृदुता, लोकलज्जा, स्थिरता, तेज, क्षमा, धैर्य, शुचिर्भूतपणा, अद्रोह आणि फाजील मानाविषयीं निरिच्छता, हे गुण दैवी संपत्ति घेऊन जन्मास आलेल्या मनुष्याचे ठिकाणीं राहतात. याच्या उलट दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, कठोरपणा आणि अज्ञान हे गुण आसुरी संपत्तीच्या वांट्यास आलेले असतात. दैवी संपत्ति मोक्षास नेणारी आहे. आसुरी संपत्ति बंधांत टाकणारी आहे. अर्जुना, तूं काळजी करूं नकोस. तूं दैवी संपत्ति घेऊन जन्मास आला आहेस. 'पांच गांवांवर तृप्त होऊन तूं लाखों जीवांना वांचविण्यास तयार झाला होतास; एवढीच गोष्ट तुझी दैवी संपत्ति सिद्ध करण्यास पुरे आहे.' या लोकांत मनुष्यें उपजतांच दोन प्रकारचीं असतात. दैवी किंवा आसुर. दैवी स्वभावाचें वर्णन पूर्वीं विस्तारानें केलें; आसुरांचें वर्णन थोडें केलें, तें आणखी ऐक. आसुरी स्वभावाचे लोक प्रवृत्ति आणि निवृत्ति यांस बिलकूल ओळखीत नाहींत; आणि शुद्धता, आचार किंवा सत्य यास जाणत नाहींत. जगत् असत्य आहे, त्यास प्रतिष्ठा म्हणजे कांहीं आधार नाहीं, अर्थात् या लोकापलीकडे कांहीं नाहीं, त्यास कोणी ईश्वर किंवा शास्ता नाहीं, याचा कोणी कर्ता नाहीं. तें चार स्वतंत्र परमाणूंचे बनलें आहे, सारांश, ह्या लोकाचा केवळ उपभोग हाच हेतु आहे, असें हे लोक मानतात. असें यांचें तत्त्वज्ञान असल्यानें हे दुष्ट लोक दुष्पूर कामाच्या मागे

लागून दंभ, मान, मद यांनीं ग्रस्त होऊन, आयुष्याची इतिकर्तव्यता भलतीच समजून केवळ दुर्वर्तन करतात. केवळ मरणापर्यंतचीच अपरिमेय चिंता करून अन्यायानें कामभोगासाठीं द्रव्यसंचय करतात. आज हें मिळविलें, उद्यां हें आणखी मिळवीन, आज हा शत्रु मारला, उद्यां तो मारीन असे संकल्प करीत, मी ईश्वर, मी भोगी, मी बलवान्,मी सुखी, मी श्रीमंत, मी कुलीन, माझी बरोबरी करणारा दुसरा कोण आहे ? मी अमुक यज्ञ करीन, मी तें दान करीन, मी तो उत्सव करीन अशा दंभासाठींच फुशारक्या मारून केवळ कामभोगांत प्रसक्त होतात, आणि शेवटीं नरकांत पडतात. आपल्यास मोठे समजून धन व मान यांच्या गर्वानें उन्मत्त होऊन जे केवळ ऐट मिरविण्याकरितां नांवाचे यज्ञ पाहिजेल तसे केवळ अविधीनें करतात. अहंकार, बल, दर्प, क्रोध यांजवर स्वार झाल्यानें स्वतःच्या हृदयांतील आत्म्याच्या सदुपदेशास न जुमानतां हे माझा द्वेष व हेवा करतात. अशा नराधमांना मी आसुरी योनींतच वारंवार टाकतों. जन्मोजन्म आसुरी योनींत उत्पन्न झाल्यानें ते उत्तरोत्तर अधोगतीस जातात, मला प्राप्त होत नाहींत. अर्जुना, ' तुला मथितार्थ सांगतों. ' काम, क्रोध आणि लोभ हे नरकाचे तीन दरवाजे असून इहलोकींही आत्म्याचे नाश करणारे आहेत. यासाठीं संसाऱ्यानें यांचा त्याग केला पाहिजे. या नरकद्वारांनीं मुक्त असलेला संसारी आपल्या कल्याणाचाच मार्ग स्वीकारतो; आणि अंतीं परम गतीला जातो. संसाऱ्यास आपल्या कल्याणाचाच मार्ग जाणण्याचें साधन शास्त्र आहे. शास्त्रविधीला म्हणजे धर्म, नीति व व्यवहार यांच्या आज्ञेला सोडून जो केवळ स्वेच्छेनें पाहिजे तसें आचरण करतो, त्यास इहलोकीं जय किंवा सुख मिळत नाहीं आणि परलोकींही परमगति मिळत नाहीं. यासाठीं कर्तव्य काय आणि अकर्तव्य काय हें ठरविण्याचें साधन शास्त्र आहे. शास्त्रविधीला जें युक्त असेल तें तूं कर्म कर ( भ० अ० १६ ).

' शास्त्र नीट समजणें कधीं कधीं कठीण असतें. अशा प्रसंगीं शास्त्राला सोडून आचरण होण्याची भ्रांति आहे, हें मनांत येऊन ' अर्जुनानें प्रश्न केला, " जे शास्त्रविधीला सोडून, पण श्रद्धेनें, यज्ञादि कर्में करतात त्यांची निष्ठा सात्त्विक किंवा राजस किंवा तामस ? " श्रीकृष्णानें उत्तर केलें, " श्रद्धाच स्वतः सात्त्विक, राजस व तामस अशा तीन प्रकारची असते;

आणि ती उपजतांच स्वभावाबरोबर येते. श्रद्धा स्वभावानुरूप निरनिराळ्या प्रकारची असते, आणि जशी श्रद्धा असते तसें मनुष्य आचरण करतो, किंबहुना मनुष्य श्रद्धारूपच असतो. सात्त्विक श्रद्धेचे लोक देवांचें यजन करतात, राजस यक्षराक्षसांचें आणि तामस भूतपिशाचांचें (१–६). श्रद्धा अंतःकरणाचा धर्म आहे, आणि अंतःकरण स्वभावानुरूप असतें. इतकेंच नव्हे तर ' अन्यमयं हि सोम्य मनः' या सिद्धांताप्रमाणें आहारानुरूप बदलतें, यासाठीं आहार शुद्ध व सात्त्विक असावा (८–९–१०)." यज्ञ, दान आणि तप याही गोष्टी त्रिविध असतात. फलाकांक्षा सोडून केलेला यज्ञ सात्त्विक होय; फलाच्या इच्छेनें किंवा दंभासाठीं केलेला राजस होय. आणि केवळ अश्रद्धेनें केलेला तामस होय.' तप कायिक, वाचिक आणि मानसिक असें तीन प्रकारचें आहे.' देव, ब्राह्मण, गुरु, सज्जन यांची सेवा करणें, शुचिर्भूतपणा ठेवणें, ब्रह्मचर्य राखणें आणि हिंसा सोडणें हें शरीराचें तप आहे. कठोरपणानें उद्वेग न करणारें, सत्य, प्रिय आणि हितकर असें भाषण नेहमीं बोलणें हें वाचेचें तप आहे. प्रसन्नता, सौम्यपणा, ईश्वराचें भजन, मनाचा निग्रह आणि शुद्धभाव सदोदित बाळगणें हें मनाचें तप आहे. हीं तिन्हीं तपें फलाची इच्छा सोडून केलीं असतील तर तीं सात्त्विक होत; लोकांत प्रतिष्ठा वाढविण्याकरितां, किंवा दंभानें केलीं असतील तर राजस होत; आणि मूर्ख समजुतीनें, आपल्यावरच संतापून किंवा शत्रूच्या नाशासाठीं केलीं असतील तर तीं तामस होत. योग्य स्थानीं, योग्य कालीं, योग्य पात्रीं प्रत्युपकाराची इच्छा न ठेवतां केवळ दान देण्याच्या बुद्धीनें दिलेलें दान सात्त्विक समजावें. परत फायदा मिळण्याच्या हेतूनें, किंवा इतर फलाच्या इच्छेनें, किंवा त्रासून दिलेलें दान राजस होय; आणि शिव्या देऊन किंवा धिक्कारून, किंवा अयोग्य देशकालपात्रीं दिलेलें दान तामस होय. ' यज्ञ, दान व तप निर्दोष होण्यासाठीं एक युक्ति सांगतों. ' ओम्, तत्, सत्, असा ब्रह्माचा तीन प्रकारचा निर्देश आहे. ओम्, तत्, सत्, असें म्हणून ब्रह्मवादी फलाची आशा न ठेवतां यज्ञ, तप आणि दान करतात. यासाठीं ' ओंतत्सत्ब्रह्मार्पणमस्तु ' अशा निर्देशानें यज्ञ, दान, तप किंवा तदर्थी कोणतेंही कर्म श्रद्धेनें ब्रह्माला अर्पण केलें असतां सर्व दोष नष्ट होऊन तें कर्म सफळ होईल हें लक्षांत ठेव. ज्यास श्रद्धाच नसेल त्यानें अश्रद्धेनें

केलेलें विधियुक्तही यज्ञ, दान, तप, किंवा तदर्थी कर्म इहलोकीं किंवा परलोकीं कांहींच कामाचें नाहीं हें निराळें सांगणें नकोच ( भ० अ० १७ ).

' सर्व कर्मांचा त्याग करून संन्यास घेणें, हाच परम पुरुषार्थ अशी अर्जुनाची मूळ समजूत होती. ती श्रीकृष्णाच्या एकंदर भाषणानें, विशेषतः यज्ञदानतपादि कर्मेंही श्रद्धेनें ब्रह्माला अर्पण केलीं असतां मोक्षदायक होतात या शेवटच्या वाक्यानें नाहींशी झाली. तथापि, ही आपली नवी समजूत खरी किंवा खोटी हें ताडून पाहण्याकरितां ' अर्जुनानें प्रश्न केला, " संन्यासाचें तत्त्व जाणण्याची मला इच्छा आहे; आणि त्यागाचेंही तत्त्व भिन्न असल्यास मी समजूं इच्छितों." श्रीकृष्णानें उत्तर केलें, " जाणते लोक काम्यकर्म म्हणजे कामाच्या इच्छेनें केलेलें कर्म सोडणें यास संन्यास म्हणतात; आणि सर्व कर्मांच्या फलाचा त्याग करणें यास त्याग म्हणतात. ' सारांश, त्याग आणि संन्यास तत्त्वतः एकच आहेत. ' कांहीं तत्त्ववेत्ते, कर्मदोष उत्पन्न करणारें, पुण्यकर्म असलें तरीही बंधनच उत्पन्न करणारें आहे, अतएव सर्व कर्म सोडावें असें म्हणतात; तर दुसरे यज्ञ, दान, तप सोडूं नये असें म्हणतात. अर्जुना, या प्रश्नासंबंधानें माझा निश्चयरूपी सिद्धांत ऐक. यज्ञदान व तप हें कर्म त्याज्य नाहीं. तें जरूर करावें, कारण यज्ञ, दान आणि तप हीं मनास पवित्र करणारीं आहेत. पण हीं सुद्धां कर्में संग सोडून फलाची इच्छा न धरतां करावीं असें माझें उत्तम मत आहे. नित्य व अवश्य कर्मांचा त्याग तर शक्यच नाहीं. अशा कर्मांचा वेडेपणानें त्याग करणें यालाच तामस त्याग म्हणतात. सुखकर कर्में तेवढीं करून दुःखानें होणारीं कर्तव्यकर्में सोडणें ह्यास राजस त्याग म्हणतात. त्याजपासून कोणतेंही फल मिळत नाहीं. प्राप्त कर्म संगरहित होऊन फलाची इच्छा सोडून कर्तव्य म्हणून करणें या त्यागाला सात्त्विक त्याग म्हणतात. सात्त्विक त्याग करणारा संशयरहित बुद्धिमान् पुरुष दुःखकर कर्तव्यकर्मांचा तिटकारा करीत नाहीं, किंवा कर्तव्य सुखकर म्हणून त्यांत रममाण होत नाहीं. सारांश, सर्वतोपरी कर्मांचा परित्याग करणें देह आहे तोंपर्यंत मनुष्यास शक्य नाहीं. यासाठीं जो कर्मफलाचा त्याग करतो तो त्यागी म्हणावा. कर्माचें फल अनिष्ट, इष्ट किंवा मिश्र असें तीन प्रकारचें असतें; पण तें कोणाला ? ज्यानें फलाचा त्याग केला नाहीं त्याला. ज्यानें फलाचा त्याग केला अशा

मनुष्यास हीं तिन्हीं फळें सारखींच आहेत. सर्व कर्मांच्या सिद्धीस पांच गोष्टी कारणीभूत आहेत, असें सर्व प्रश्नांचा निश्चय करणाऱ्या सांख्य तत्त्वज्ञानांत सांगितलें आहे. 'तीं कारणें कोणतीं तें ऐक.' अधिष्ठान, कर्ता, निरनिराळीं साधनें, निरनिराळ्या चेष्टा आणि पांचवें दैव अथवा ईश्वरी इच्छा. 'शेत उत्तम पाहिजे, शेती लावणारा हुषार पाहिजे, नांगर, बी इत्यादि शेतीचीं साधनें उत्तम पाहिजेत, मेहनत चांगली केली पाहिजे, आणि शेवटीं पाऊस उत्तम पडला पाहिजे, म्हणजे दैव चांगलें पाहिजे, तर शेती होईल, हा दृष्टांत येथें पुरे आहे.' शरीर, वाचा किंवा मन यांनीं मनुष्य जें जें कर्म करतो—मग तें न्याय्य किंवा तद्विपरीत अन्याय्य असो—त्याच्या सिद्धीला ह्या पांच गोष्टी कारणीभूत आहेत. या पांच गोष्टी सिद्धीला कारणीभूत असतां, कर्ता केवळ आपलीच शेखी मूर्खपणानें मिरवील तर त्याला योग्य दृष्टि आली नाहीं, असेंच म्हटलें पाहिजे. ज्या मनुष्यास कर्तेपणाचा अहंकार नाहीं, आणि ज्याची बुद्धि फलांत लिप्त झाली नाहीं, त्यानें सर्व जगताला जरी ठार मारलें तरी तो कोणास मारीतही नाहीं, आणि बंधनांतही पडत नाहीं ( १८ ). असो. त्याग जसा त्रिविध आहे, तसा कर्ता त्रिविध आहे व ज्ञानही त्रिविध आहे. तसेंच कर्म, बुद्धि धृति व सुख हींही त्रिगुणांनीं त्रिविध आहेत ( २०–३९ ). सारांश, या पृथ्वीवर किंवा देवलोकीं देवांत, अशी कोणतीही वस्तु नाहीं कीं जी या त्रिगुणांपासून सुटली आहे. त्याचप्रमाणें स्वभावापासून उत्पन्न झालेल्या या गुणांनीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचींही कर्में भिन्न झालीं आहेत. शम, दम, तप, शुचिर्भूतता, क्षमा, ऋजुता, ज्ञान, विज्ञान आणि आस्तिक्य हीं ब्राह्मणांचीं स्वभावोत्पन्न कर्में आहेत. शौर्य, तेज, धैर्य, दक्षता, युद्धांत अपलायन, दान, ईश्वरभाव म्हणजे राज्य करणें ह्या गोष्टी क्षात्रियांचीं स्वाभाविक कर्में होत. कृषि, गाई-बैलांचें पाळणें आणि व्यापार हीं कर्में वैश्यांचीं स्वभावोत्पन्न होत; आणि शूद्रांचें स्वाभाविक कर्म सेवा होय. आपआपल्या जात्यनुसार कर्म करूनही मनुष्याला संसिद्धि अथवा मोक्ष मिळतो. तो कसा हें मी तुला सांगतों. ज्या परमेश्वरानें सर्व भूतांची 'जातीसहित' उत्पत्ति केली आहे, त्या परमेश्वरास स्वकर्म अर्पण केलें असतां कोणत्याही जातींत मनुष्यास सिद्धि मिळते. अर्जुना, तुझें क्षात्र स्वभावोत्पन्न कर्म युद्धांत अपलायन हें आहे, तेंच

तूं परमेश्वरास अर्पण करून बजाव. म्हणजे त्यानेंच तूं मोक्षास जाशील. ' स्वधर्म विगुण दिसला तरी तो परधर्म उत्तम केल्यापेक्षांही अधिक श्रेयस्कर आहे. कारण स्वभावप्राप्त कर्म केलें असतां कधींही पाप लागत नाहीं. स्वभावोत्पन्न कर्म सदोष असलें तरीही सोडूं नये. कारण, जसा अग्नीचा आरंभ धूमानें व्याप्त असतो तसा प्रत्येक कर्माचा आरंभ दोषानें व्याप्त आहेच. सारांश, कोणत्याही ठिकाणीं आसक्त न होतां मनाचा जय करून इच्छा सोडली म्हणजे या इच्छेच्या संन्यासाने नैष्कर्म्याचीच सिद्धि मिळते. ही सिद्धि मिळाली म्हणजे ब्रह्म कसें प्राप्त होते आणि ज्ञानाची परम निष्ठा कोणती हें मी तुला ' पुन्हां ' थोडक्यांत सांगतो. शुद्धबुद्धि होऊन, धैर्यानें मन स्थिर करून, शब्दादि विषय सोडून, रागद्वेषांचा नाश करून, एकान्त जागीं जाऊन, लघु आहाराचें सेवन ठेवून,शरीर,वाचा व मन यांचें नियमन करून ध्यानयोगांत मग्न व्हावें आणि वैराग्याचा आश्रय करून अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह सोडावा, म्हणजे मनुष्य शांत होऊन ब्रह्मभावाला पोंचतो. मनुष्य ब्रह्मभावाला पोंचला म्हणजे प्रसन्नचित्त होऊन शोकरहित व इच्छारहित होतो.सर्व भूतांचे ठिकाणीं समदृष्टि होतो,आणि त्यास माझी परम भक्ति उत्पन्न होते.या भक्तीनें त्यास माझें यथार्थ ज्ञान होते आणि या ज्ञानानें तो माझ्यांत समाविष्ट होतो. अर्जुना, संन्यासी व योगी यांची अशी पायरी-पायरीनें गति आहे. ' पण सर्व प्रकारचीं कर्में करूनही जो माझा आश्रय धरतो तोही माझ्या कृपेनें शाश्वत आणि अव्यय पदाला पोंचतो. यासाठीं, अर्जुना, तूं सर्व कर्में मला अर्पण करून मत्परायण हो; आणि बुद्धियोगाचा आश्रय करून माझ्या ठिकाणीं चित्त लाव म्हणजे माझ्या प्रसादानें तूं सर्व संकटें तरून जाशील. आतां अहंकाराच्या भरीस पडून हें माझें म्हणणें तूं न ऐकशील तर तूं सर्वथा नाश पावशील. अहंकाराचा आश्रय केल्यानें युद्ध करूं नये असें तुला ' सध्यां ' वाटत आहे; पण तुझा निश्चय व्यर्थ आहे. तुझी प्रकृतीच तुला युद्ध करावयास लावील. क्षात्रियाच्या कर्मानें तूं बांधलेला आहेस. वेडेपणामुळें तूं आतां जें करूं इच्छित नाहींस तें स्वभावानें तुझ्या मुसक्या बांधल्या जाऊन तूं पुढें ' भलत्या वेळीं ' करशील. ईश्वर प्राणिमात्रांच्या हृदयांत वास करून त्यांस यंत्रारूढाप्रमाणें आपल्या मायेनें फिरवितो. त्यालाच तूं सर्वस्व-भावानें शरण जा, म्हणजे त्याच्या कृपेनें तूं

शाश्वत परमशांतीला आणि शाश्वत परमस्थानाला पोंचशील. हें गुह्याहूनही गुह्यज्ञान मीं तुला सांगितलें. याचा तूं पूर्ण विचार कर आणि जें तुला योग्य दिसेल तें कर. पुन्हां सर्व गुह्यांहूनही गुह्यतम असें भाषण ऐक. तूं मला अत्यंत प्रिय आहेत म्हणून मी तुला हितकर असें वचन सांगतों. तूं ' संन्यासी अथवा योगी असतील तर ' माझ्यावर मन लाव. तुला ' भक्ति करावयाची असेल तर ' माझी भक्ति कर. तुला यज्ञ करावयाचा असेल तर ' माझें यजन कर. तूं ' हें न करतां इतर कर्म करीत असशील तर ' मला नुसता नमस्कार कर. असें केलेंस तर, तूं मला प्रिय आहेस. म्हणून प्रतिज्ञा करून सत्य सांगतों, तूं मलाच येऊन पोंचशील. तात्पर्य, धर्मांचे इतर सर्व प्रकार सोडून तूं मला एकट्याला शरण जा. ज्या अनेक पापांची तुला भीति वाटत आहे त्या सर्व पापांपासून मी तुला मुक्त करीन. तूं बिलकूल काळजी करूं नकोस. हें माझें परम भाषण जो मनुष्य तपनशील नसेल, ज्यास माझ्यावर भक्ति नसेल, आणि ज्यास ऐकण्याची इच्छा नसेल,त्यास कधींही सागूं नको. जो माझा हेवा करतो त्यास तर सांगण्याचें कारणच नाहीं. हें परम गुह्यज्ञान जो कोणी माझ्या भक्ताला सांगेल तो माझी शुश्रूषा केल्यानें माझ्याच पदाला पोंचेल ( ६९–७१ ). अर्जुना, मीं सांगितलेलें हें सर्व वचन तूं एकाग्र चित्तानें ऐकिलेंस काय ? अज्ञानापासून उत्पन्न झालेली तुझी भ्रांति नाहींशी झाली काय ?'' अर्जुनानें उत्तर केलें, " देवाधिदेवा श्रीकृष्णा, माझा भ्रम नाहींसा झाला. तुझ्या कृपेनें मी ठिकाणावर आलों माझे सर्व संशय फिटले. तुझें वचन मान्य करण्यास मीं तयार आहें. '' येथें हा श्रीकृष्णार्जुनांचा शरीरास रोमांचित करणारा अद्‌भुत दिव्य संवाद संपला. हा अद्‌भुत संवाद पुनः पुनः स्मरण होऊन संजयाच्या अंगावर जसे हर्षानें रोमांच उभे राहत, त्याप्रमाणें तो पुन्हां पुन्हां वाचून व मनन करून कोणत्या वाचकास नवा नवा आनंद प्राप्त होणार नाहीं ? आणि जेथें योगेश्वर श्रीकृष्ण आणि धनुर्धर पार्थ एकमत झाले, तेथें श्री, विजय, ऐश्वर्य आणि शाश्वतनीति हीं ठेवलेलींच आहेत असें कोण कबूल करणार नाहीं ? ( भग० अ० १८ ).



## युद्धपर्व

श्रीकृष्णाचा व अर्जुनाचा हा संवाद सरासरी तास दीड तास चालला होता.* इतका वेळ ऐन युद्धप्रसंगीं रणमैदानाच्या मध्यभागीं संवाद चालणें शक्य नाहीं, असें कित्येकांस वाटतें. कौरवपांडवांकडील बाकीचे सर्व लोक तटस्थ राहून नुसते पाहत होते कीं काय ! किंवा रंगभूमीवर ज्याप्रमाणें बोलणाऱ्या पात्राशिवाय इतर पात्रें टिवल्याबावल्या करीत वेळ काढतात त्याप्रमाणे इतर लोक वेड्यासारखे रणभूमीवर बोलत किंवा फिरत होते कीं काय ? परंतु असा प्रश्न आपल्या संकुचित कल्पनांमुळें उत्पन्न होतो हें लक्षांत आणलें पाहिजे. रणाचें मैदान साधारण लढायांच्या ठिकाणां-सारखें लहान नव्हतें; किंवा जमलेलीं माणसें साधारण लढायांप्रमाणें दहा पांच हजार नव्हतीं. एका बाजूस अकरा अक्षौहिणीऽ तर दुसऱ्या बाजूस सात जमल्या होत्या; म्हणजे युद्ध करणाऱ्यांची संख्या पन्नास लक्षांवर गेली होती. अशा प्रचंड सैन्यांचीं तोंडें कमींत कमी दहा बारा कोस पसरलीं असलीं पाहिजेत व दोन्ही सैन्यांमधील या वेळीं अंतर निदान कोसभराचें तरी असलें पाहिजे. अर्जुनाचा रथ कौरवसैन्यापासून मैल, पाऊण मैल दूर उभा होता व तेथून दुर्योधनाच्या निशाणापाशीं जमलेले वीर दिसत होते तरी, कृष्णार्जुनाचें भाषण त्यांस ऐकूं जात नव्हतें. परस्परां-कडील सैन्यांच्या विभागांची मांडणी चालू होती व घोड्यावरील भालदार युधिष्ठिराच्या व दुर्योधनाच्या निशाणापाशीं जमलेल्या सेनापतींचे हुकूम

---

* याची सत्यता यांतील भाषांतर वाचण्यास किती वेळ लागतो याजवरून वाचकांच्या ध्यानांत येईल.

ऽ एक अक्षौहिणी म्हणजे २१८७० हत्ती, २१८७० रथी, तिप्पट म्हणजे ६५६१० घोडेस्वार व पांच पट म्हणजे १०९३५० पायदळ या हिशेबानें सरासरी ३ लाख मनुष्यें एका अक्षौहिणींत होतात.

सैन्यांच्या निरनिराळ्या भागांस पोंचवीत होते. अर्जुनाचा रथ तासभर रणमैदानांत मध्यभागीं उभा होता, तरी त्याचें कोणास आश्चर्य वाटलें नसावें. कारण सर्व सैन्याची टेहेळणी करून, सैन्यांमधील सपाट मैदानांतील अनेक गांवांचें निरीक्षण करून, युद्धाचा क्रम ठरविणें हें दहा पांच मिनिटांचें काम नव्हतें. हल्लींच्या व मागील मोठमोठ्या लढायांचीं वर्णनें वाचलीं असतां असेंच दिसून येतें कीं, विरुद्ध सैन्यें परस्परांच्या दृष्टिपथांत आल्या-वरही प्रत्यक्ष युद्ध सुरू होण्यापूर्वी कित्येक तास किंबहुना दीड दोन प्रहर टेहेळणींत व हालचालींत जातात. याशिवाय तो काळ धर्मयुद्धाचा होता व ठराविक सूचनेशिवाय शस्त्र किंवा बाण टाकण्याचा नव्हता. असो; अर्जुन धनुष्य-बाण घेऊन युद्धास तयार झाला तेव्हां श्रीकृष्णानें त्याचा रथ पांडवांच्या सैन्यापाशीं झपाट्यानें आणला. दोन्ही वीरांना प्रसन्न पाहून पांडव-सैन्यानें जयाची आरोळी पुन्हां ठोकली व आता युद्धास सुरवात करण्याची वेळ अगदीं जवळ येऊन ठेपली. तों ज्या प्रकारच्या भावनेनें अर्जुनाचें मन विव्हल झालें होतें त्याच प्रकारची भावना धर्माच्याही मनांत अन्यरूपानें उद्भवली व त्यानें एकाएकीं कवच काढून रथांतून खालीं उडी टाकून कौरवसैन्याकडे पायींच धांव घेतली. धर्माची ही चमत्कारिक कृति पाहून इतर पांडव रथांतून उड्या टाकून त्याच्यामागें धांवले व त्यांचे रथही त्यांच्यामागें निघाले. लाखों जीवांचा नाश न करतां द्वंद्वयुद्धानेंच वादाचा निकाल करावा म्हणजे एक प्रकारचें द्यूतच खेळावें अशा विचारानें तर धर्मराज ग्रस्त झाला नाहींना ! असें पांडवांकडील लोकांस वाटलें; तर उन्मत्त दुर्योधनास हा नांवाचा युधिष्ठिर भीष्म–द्रोणाशीं येऊन पडलेल्या युद्धास भिऊन मला शरण येत नाहींना असें वाटलें. 'हें काय ?' 'हें काय ?' असा बंधूंनीं पुष्कळ वेळां प्रश्न केला. पण धर्मानें उत्तर न देतां तडक भीष्माच्या रथाकडे चाल केली व रथाशीं पोंचून भीष्माचे पाय धरून गद्गद स्वरानें म्हटलें, "प्रिय व पूज्य आजोबा, तुमच्याशीं मी निरु-पायानें युद्ध करीत आहें तर मला क्षमा करा, आणि आशीर्वाद द्या. तुम्ही क्रुद्ध असाल तर जय होणार नाहीं." हे शब्द ऐकून भीष्म गहिंवरून म्हणाले, "धर्मा, तूं येऊन मला नमस्कार न करतास तर कदाचित् मीं तुझा अपजय चिंतिला असता; पण तूं पूर्ण धर्मनिष्ठ आहेस. 'यतो धर्मस्ततो

जयः।' जा, तुझा पराजय होणार नाहीं. पुरुष अर्थाचा दास आहे. अर्थ पुरुषाचा दास नाहीं. मी अर्थानें दुर्योधनास बांधला गेलों आहें. माझें कर्तव्य म्हणून मी त्याच्या वतीनें तुझ्याशीं युद्ध करीत आहें, तुझ्या द्वेषानें नव्हे; तर तूं जा, आणि निःशंक मनानें माझ्याशीं युद्ध कर." धर्मानें पितामहाच्या पायांवर पुन्हा डोकें ठेवलें आणि तेथून द्रोणाचार्यांच्या रथाशीं जाऊन त्यांच्या पायांवर मस्तक ठेवलें व त्यांचा आशीर्वाद घेतला, आणि तसाच कृपाचार्य व मामा शल्य यांस नमस्कार करून त्यांचाही आशीर्वाद घेतला. नंतर आपल्या रथाकडे परत येतांना तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, "मी न्यायानें युद्ध करीत आहे असें मला वाटतें; माझें मत ज्यास पसंत असेल व माझ्याकडे ज्यास येणें असेल त्यानें या वेळीं जरूर यावें, पुढें येणें शक्य नाहीं." तेव्हां युयुत्सूनें दुर्योधनाचा पक्ष सोडून राजरोस युधिष्ठिराचा पक्ष स्वीकारला. धर्मराजानें त्याचें अभिनंदन करून धृतराष्ट्राचा एक वंश तरी शिल्लक राहील या गोष्टीचा आनंद मानला. नंतर कवच धारण करून त्यानें रथांत आरोहण केलें व सर्वांस नमस्कार करून आपल्या सैन्याकडे प्रयाण केलें. पांडवांची ही धर्मशीलता पाहून कौरवांकडील लहान थोर राजे लोकांस मोठें आश्चर्य वाटलें; कित्येकांनीं पांडवांस उघड धन्यवाद दिला, तर शेंकडोंच्या डोळ्यांतून प्रेमानें व प्रशंसेनें अश्रु आले. थोड्याच वेळानें दोन्ही सैन्यांची परस्परांवर चाल होऊन तुताऱ्यांच्या आवाजानें परस्परांस इशारा होऊन युद्धास सुरवात झाली.

भारतीय युद्धाची हकीकत देणें हें या ग्रंथाचें प्रयोजन नाहीं; पण श्रीकृष्णानें या युद्धांत काय कामगिरी केली हें येथें आपल्यास पाहणें आहे. प्राचीन काळीं हिंदुस्थानांत युद्धाचें शास्त्र बरेंच प्रगतीस पोंचलें होतें. सैन्याचे मध्य व पक्ष असे विभाग त्या वेळींही होते. किंबहुना कोणत्या तरी पक्षाचें स्वरूप सैन्याचें कल्पून त्यानें परसैन्यावर झडप घालावयाची अशी व्यूहकल्पना त्या वेळीं असे. हीच कल्पना 'विंग्स' अथवा पक्ष या शब्दांत अद्याप पाश्चात्य युद्धशास्त्रांतही रूढ आहे. पांडवांकडील मुख्य सेनापति धृष्टद्युम्न असून अर्जुनानें मध्यास किंवा डाव्या उजव्या पक्षास जरूर पडेल तशी मदत द्यावी असें ठरलें होतें. प्रथम दिवशीं पूर्वाह्णीं युद्धास सुरवात झाली तेव्हां पायदळांच्या पायांचा व शस्त्रांचा, घोड्यांच्या टापांचा व खिंकाळण्यांचा, हत्तींच्या घंटांचा व चीत्कारांचा,

रथांच्या गडगडाटांचा व पताकांच्या फडफडण्याचा, वीरांच्या सिंहनादांचा व शंखांचा एकवटलेला भयंकर शब्द पृथ्वीवरून निघून आकाशास जाऊन भिडला. इतक्यांत हत्ती हत्तींवर आदळले, रथी रथींवर, पायदळ पायदळावर आणि घोडेस्वार घोडेस्वारांवर; याप्रमाणें निरनिराळ्या सैन्यांचे विभाग कित्येक कोस पसरले होते ते एकमेकांवर तुटून पडले, तेव्हां दोन्ही बाजूंचे वीर सरावलेले व निश्चयी असल्यानें कोठेंच पाय माघारा पडेना. अशा भयंकर युद्धांत अर्थात्च हजारों हत्ती, घोडे, रथी व पायदळ मरून रणमैदान लवकरच रक्तमांसानें भरून गेलें. इतक्यांत मोठमोठ्या रथींचीं द्वंद्वयुद्धें लागलीं, त्यांत अर्जुनाचें व भीष्माचें युद्ध सुरू होऊन दोघां वीरांनीं शौर्याची पराकाष्ठा केली. पण कोणीच हार जाईना तेव्हां ते एकमेकांपासून विलग होऊन दुसरीकडे घसरले व त्यांनीं विरुद्ध पक्षाकडील हजारों वीर, गज, रथी, स्वार ठार मारले. याप्रमाणें सायंकाळपावेतों रणकंदन होऊन धर्मयुद्धाच्या नियमाप्रमाणें दोन्हीकडील सेनापतींनीं आपआपलीं सैन्यें तुतार्‍यांच्या विशिष्ट आवाजांनीं परतवलीं म्हणजे रणांगणांतून मार्गे काढलीं. शस्त्र ठेवल्यावर शस्त्र चालवावयाचें नाहीं असा धर्मयुद्धाचा नियम असल्यानें रात्रीं दोन्ही सैन्यांनीं आपआपल्या छावणींत बिनधास्त विश्रांति घेतली. सकाळीं क्षत्रियवीर स्नानें करून अग्नीची व सूर्याची उपासना करून व अल्पाहार करून पुन्हां रणमैदानावर आले व पूर्व दिवसाप्रमाणें युद्धांत भिडले. याप्रमाणें दरदिवस क्रम चालू झाला. दोन्ही पक्षांकडील माणसांची व जनावरांची भयंकर हानि प्रत्यहीं होऊं लागली. चौथे दिवशीं भीमानें अतिशय पराक्रम केला. हजारों हत्ती मारले; दुर्योधनाला बाणानें रथांत मूर्च्छित पाडलें; सारथ्यानें दुर्योधनाचा रथ सैन्याच्या मागें काढला. अर्थात् कौरवांचें सैन्य भग्न होऊन मागें फिरलें. भीष्मद्रोणांचा सुद्धां पाय टिकेनासा झाला. दुर्योधन शुद्धीवर येऊन पाहतो तों सर्व सैन्य भीष्मद्रोणांसह मागें हटत आहे. तें पाहतांच त्यानें भीष्माच्या रथापाशीं जाऊन विनंति केली, "आजोबा, तुम्हांस पांडवांची कींव येते किंबहुना त्यांजवर तुमची कृपा आहे असें स्पष्ट दिसतें. पांडवांशीं मनापासून मी युद्ध करणार नाहीं असें मला तुम्ही प्रारंभींच सांगतां तर कर्णासह मी दुसरा विचार केला असता." हें दुर्योधनाचें अप्रिय भाषण ऐकून भीष्माचे डोळे

रागानें लाल झाले व ते म्हणाले, " दुर्योधना, देवांस सुद्धां पांडव अजिंक्य आहेत हें मीं तुला पन्नास वेळ सांगितलें, पण मोहानें तुला समजलें नाहीं. असो; माझ्या म्हाताऱ्याच्या हातून काय होतें तें मी तुला दाखवितों." असें म्हणून मल्हारराव होळकर जसा राक्षसभुवनाच्या लढाईत माधवरावांच्या वाक्प्रतोदानें मागें फिरला, त्याप्रमाणें भीष्म मागें फिरला. तें पाहून दुर्योधनानें आनंदानें शंख फुंकला, तेव्हां तोंड फिरविलेले सर्व वीर मागें परतले, आणि पुन्हां तुंबळ युद्धास सुरवात झाली. हजारों मुंडकीं तुटून खालीं पडलीं. रुधिराची नदी वाहिली. मरून पडलेले हत्ती त्या नदींत खडकासारखे दिसूं लागले आणि मनुष्यांच्या व घोड्यांच्या मांसांचा त्या नदींत चिखल झाला. भीष्मावर नजर ठरेनाशी झाली. त्याचें धनुष्य सतत मंडलाकार दिसत होतें. त्याच्या रथांतून सारखे बाण निघत होते. जो जो वीर त्याच्यासमोर झाला तो तो अग्नींत पतंग जाऊन पडतो त्याप्रमाणें मृत्युमुखांत पडूं लागला. शेवटीं अर्जुनाचा रथ श्रीकृष्णानें भीष्मावर घातला. अर्जुनानेंही पराकाष्ठा केली, पण भीष्मानें अर्जुनासही चीत केलें. श्रीकृष्णानें सारथ्याची कमाल करून निरनिराळीं मंडळें धरून भीष्माचे बाण व्यर्थ दवडण्याची पुष्कळ खटपट केली, परंतु ती फुकट गेली. अर्जुनाच्या रथांतून बाण निघेनासे झाले. तेव्हां श्रीकृष्णानें मागें वळून पाहिलें, तों अर्जुन रथांत मूर्च्छित पडलेला दृष्टीस पडला. प्रियशिष्य अर्जुनाची ती स्थिति पाहून श्रीकृष्णास अतिशय वाईट वाटलें. " या भीष्मापुढें युधिष्ठिराच्या सैन्याचा टिकाव लागणार नाहीं; हा भीष्म पांडवांना सर्व सैन्यासह आजच फडशा पाडतो असें दिसतें. माझ्या भक्तांचा कैवार मला घेतल्यावांचून गत्यंतर नाहीं. ह्या भीष्माला ठार मारून पांडवांचा कांटा मी समूळ नाहींसा करतों. किंबहुना भीष्माला, द्रोणाला, दुर्योधनाला, धृतराष्ट्राच्या सर्व पुत्रांना, त्याच्या सर्व सहायांना ठार मारून युधिष्ठिराला मी आजच पृथ्वीचें राज्य देतों. " असें म्हणत श्रीकृष्णानें आपलें रथांत ठेवलेलें सुदर्शन चक्र ओढलें; घोड्यांच्या दोऱ्या टाकून देऊन रथाखालीं उडी टाकली आणि चक्र उगारून भीष्मावर चाल केली. रथांत उद्यत करून श्रीकृष्ण स्वतःच आपल्यावर धांवून येत आहे, हें पाहून भीष्मानें धनुष्यबाण खालीं ठेविले आणि हात जोडून म्हटलें, देवदेवा जगन्निवासा श्रीकृष्णा, तुझ्या हातून मरण येईल तर फारच चांगलें. इहलोक

व परलोक दोन्ही सुधारतील. ये आणि मला खुशाल मार. " असे भीष्माचे शब्द ऐकून श्रीकृष्णाचा हात किंचित् ढिला पाडला; आणि तो म्हणाला, " भीष्मा, तूं या अनर्थाचें मूळ आहेस. तूं या भयंकर क्षयाला कारण आहेस. सन्मार्गवर्ती प्रधानाचें हें कर्तव्य आहे कीं, निंद्य द्यूत खेळणाऱ्या राजाचें निवारण करावें. त्यानें न ऐकलें तर त्याचा त्याग करावा. जो कुलपांसन राजा धर्मास सोडून वागतो,तो कालपरीतबुद्धि नृप काढून टाकावा असें असून तूं दुर्योधनाला उलटी जयश्री मिळवून देणार काय ? "भीष्मानें उत्तर केलें, " राजा परम दैवत आहे, त्याचें निवारण करणें आमच्याकडे नाहीं. " श्रीकृष्ण म्हणाला, " कंसाला यादवांनीं टाकून दिला,कारण त्यास समजाविलें असतांही तो समजला नाहीं, हें तुला ठाऊक आहे ना ? " असें भाषण श्रीकृष्णभीष्मांचें चाललें आहे तों अर्जुनानें शुद्धीवर येऊन रथाखालीं उडी टाकून धांवून श्रीकृष्णाचे पाय धरले आणि म्हटलें, " जनार्दना, तूं आपली प्रतिज्ञा सोडूं नको. मी तुझ्या कृपेनें शत्रूचा नाश खाचित करतों.तूं आपली प्रतिज्ञा मोडून आमचा उद्धार केलास तर आमचें भूषण काय ? तर श्रीकृष्णा, मला क्षमा कर आणि रथाचें सारथ्य पुन्हा स्वीकार. " श्रीकृष्णानें कांहीं उत्तर न करतां परतून रथावर चढून, घोड्यांच्या दोऱ्या पुन्हां हातीं घेतल्या आणि अर्जुनानें धनुष्यबाण घेऊन युद्ध सुरू केलें. तें इतक्या जोरानें कीं, भीष्माच्यानेंही त्याचा प्रतिकार करवेना. याप्रमाणें सायंकाळपावेतों भीष्मार्जुनांचें ' न भूतो न भविष्यति ' युद्ध होऊन दोन्ही सैन्यें नित्याप्रमाणें सायंकाळीं परत फिरलीं.

सर्वस्वाचा नाश टाळण्यासाठीं आपली प्रतिज्ञा मोडूनही श्रीकृष्णानें भीष्माच्या अत्युत्कट पराक्रमाचा वेग कमी करून व भीष्माच्या प्रीतीनें शिथिल पडणाऱ्या अर्जुनाच्या बाहूंस सामर्थ्यवान् करून त्या दिवशीं पांडवांची जी सरशी करवली ती शेवटपर्यंत वाढतच गेली. भीम व भीष्म हे दोघेही भयंकरच होते, व नित्य परस्परांच्या सैन्यांचें कंदन करीत तरी भीमाच्या पराक्रमाच्या अग्नींत दुर्योधनाचे बंधु नित्य जळून जाऊं लागले. नवव्या दिवशीं तर त्यानें एकामागून एक धृतराष्ट्राचे दहा पुत्र मारले, तेव्हां दुर्योधनानें भीष्माची पुन्हां कानउघाडणी केली. " आजोबा, तुम्ही पांडवांची उपेक्षा करतां. माझे अनेक बंधु

भीमानें मारले पण त्याचा बंदोबस्त तुमच्यानें होत नाहीं. तेव्हां मजवर मोठें संकट येऊन पडलें आहे." भीष्मानें उत्तर केलें, "बाबा, मीं द्रोणानें, विदुरानें, गांधारीनें, तुला वारंवार हेंच सांगितलें होतें; पण तें तुला कळलें नाहीं. भीम ज्याच्या धृतराष्ट्राच्या पुत्राशीं भिडेल त्याला ठार मारल्याशिवाय राहणार नाहीं. पण रणांगणीं पडलेल्या बंधूंचा शोक न करतां तूं स्वतः स्थिर होऊन युद्ध कर. स्वर्गपरायण होऊन तूंच भीमाशीं भीड." हें ऐकून दांतओठ चावून दुर्योधन स्वतः भीमावर घसरला आणि एका बाणानें त्याचें कवच फोडून त्याला इतक्या जोरानें त्यानें घायाळ केलें कीं, भीम गपकन खालीं बसला. पण क्षणभरांत अवसानावर येऊन भीमानें गदा घेऊन रथांतून खालीं उडी टाकली आणि शत्रुसैन्यावर चाल केली. त्या गदेच्या तडाक्याखालीं कोणी वाचेना; द्रोणाच्या रथाचाही चुराडा झाला. आचार्यांच्या मदतीस दुर्योधन, दुःशासन इत्यादि वीर धांवले आणि भीमाच्या मदतीस अभिमन्यु, घटोत्कच इत्यादि वीर धांवले. तेव्हां तेथें भयंकर रणकंदन होऊन अगणित वीर ठार झाले. इतक्यांत सायंकाळ झाल्यानें रणांतून परतण्याची तुतारी वाजूं लागली; तेव्हां विरोधी सैन्यें विलग होऊन आपआपल्या छावणींत परत आलीं.

रात्रीं भोजनोत्तर शकुनि, कर्ण, दुःशासन यांसह दुर्योधन आपल्या पडत्या बाजूला कसें वर आणावें याचा विचार करूं लागला. 'भीष्म बाजूला होईल तर तुला यश मिळवून देतों' असें कर्णाचे भाषण ऐकून दुर्योधन उठला व घोडा तयार करून आणण्याविषयीं त्यानें आज्ञा केली. थोड्याच वेळानें भावांसह व अनेक राजांसह दुर्योधन आपल्या शिबिरांतून बाहेर पडला व घोड्यावर बसून सोन्याच्या मुठींच्या व सुगंधी तेलानें पाजळलेल्या मशालींच्या उजेडांत व शेंकडों भालदारांच्या ललकारण्यांत भीष्माच्या शिबिरापाशीं येऊन पोंचला. भीष्मानें आपल्या राजाचा योग्य आदर करून त्याचा नमस्कार घेऊन त्यास उत्तम आसनावर बसविलें. दुर्योधनानें हात जोडून नेत्रांत अश्रु आणून म्हटलें, "आजोबा, तुमच्या पराक्रमाचा आश्रय करून आम्हीं इंद्राशीं सुद्धां टक्कर देण्याची हिम्मत बाळगतों. यासाठीं माझ्यावर कृपा करा आणि माझ्या शत्रूंना ठार मारा. पण पांडवांविषयीं दया येऊन म्हणा, किंवा माझ्या मंद भाग्यामुळें म्हणा,

तुमचा हात त्यांजवर चालत नसेल तर कर्णाला पुढें होण्याची परवानगी द्या. तो निःसंशय पांडवांस जिंकील. " हें दुर्योधनाचें भाषण ऐकून बराच वेळ भीष्म स्तब्ध राहिले. शेवटीं दुःख व रोष यांनीं संतप्त होऊन डोळे उरफटून ते म्हणाले, " मी तुझ्याकरितां यथाशक्ति परिश्रम करीत असतां तूं मला अशा वाक्शल्यांनीं ताडन करतोस हें मोठें आश्चर्य आहे. अरे, ज्या वेळेस गंधर्वांनीं कर्णासह तुला जिंकून धरून नेलें आणि पांडवांनीं तुला सोडविलें, त्याच वेळेस कर्णाच्या पराक्रमाची परीक्षा झाली नाहीं काय ? आम्हां सर्वांना विराटनगराजवळ अर्जुनानें पराभूत करून कर्णासह सर्वांचीं वस्त्रें ओढून नेऊन उत्तरेला बाहुल्यासाठीं दिलीं तेव्हांच कर्णाच्या पराक्रमाची परीक्षा झाली नाहीं काय ? या अर्जुनाचा, विशेषतः साक्षात् विष्णूचा अवतार श्रीकृष्ण त्याचा सारथि असतां, कोण पराभव करील ? मूर्खत्वामुळें या घडघडीत गोष्टी तुला दिसत नाहींत. असो; उद्यां मी मरेन नाहीं तर पांडव तरी मरतील. उद्यां मी असें भयंकर युद्ध करतों कीं, त्याची आठवण हजारों वर्षें लोक काढतील ! ! आणि उद्यां तुझा हेतु कोणत्यातरी रीतीनें सिद्धीस जाईल. तूं निष्काळजी हो आणि निश्चिंतपणें घरीं जाऊन नीज. " हें भीष्माचें निर्वाणीचें भाषण ऐकून दुर्योधनास आनंद झाला व भीष्माच्या पायांवर मस्तक ठेवून तो आपल्या शिबिरास परत गेला.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं भीष्म रणांगणावर आला तेव्हां दुर्योधनानें आनंदानें शंख फुंकला आणि दुःशासनास म्हटलें, " आज कित्येक वर्षें ज्या गोष्टीचें मी ध्यान करीत आहें, ती मिळण्याची वेळ आली आहे. आज भीष्म पांडवांस मारून मला पृथ्वीचें निष्कंटक राज्य खचित देतील. शिखंडीपासून मात्र त्यांस वांचविलें पाहिजे. कारण शिखंडीवर बाण टाकणार नाहीं अशी त्यांची प्रतिज्ञा आपल्यास त्यांनीं कळविलीच आहे. तर आज भीष्माचें शिखंडीपासून संरक्षण करण्याकडे चांगलें लक्ष ठेवा. " याप्रमाणें त्या दोघां बंधूंचें भाषण होत आहे तों भीष्माचा रथ निशाणापाशीं येऊन त्यास धृतराष्ट्राच्या पुत्रांनीं गराडा घातला. त्या वेळीं सूर्य सप्रभ उगवला असून एकाएकीं निस्तेज पडला. धुकें जमलें. वावटळीचा गार वारा वाहूं लागला. तथापि कोणीही वीरानें या दुश्चिन्हांकडे लक्ष

दिलें नाहीं. यमाचें राष्ट्र वाढविणारें भयंकर युद्ध रोजच्याप्रमाणें सुरू झालें. भीष्मानें परशुरामापासून मिळविलेल्या विशिष्ट अस्त्रशिक्षेनें पांडवांच्या सैन्याचा नाश करण्यास सुरवात केली. त्या दिवशीं त्यानें पांच हजार रथ, दहा हजार हत्ती, दहा हजार घोडे, व चौदा हजार पायदळ मारून सात महारथी ठार मारले. विराटाचा भाऊ शतानीक मारला. पण असा पराक्रम करतां करतां भीष्म आवेशानें कौरवांच्या सैन्याच्या बरेच पुढें आले, आणि त्याचे रक्षक बरेच मागें राहिले. ही संधि पाहून श्रीकृष्णानें अर्जुनास सुचविलें, "अरे, या वेळेस भीष्माला चारी बाजूंनीं गराडा घालून ठार करा. अशी वेळ पुन्हां यावयाची नाहीं." लागलींच शिखंडीचा रथ पुढें करून अर्जुन भीष्मावर घसरला. शिखंडी व अर्जुन या दोघांनीं भीष्मावर बाण चालविले. सात्यकि, धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद, दोघे माद्रीपुत्र व अभिमन्यु इतके आणखी वीर चारी बाजूंनीं धांवले. शिखंडीला समोर पाहून भीष्मानें धनुष्य खालीं ठेवलें, तों शेंकडों बाण चारी बाजूंनीं त्याच्या अंगावर पडून कवच फोडून आंत घुसले. "अरे हे शिखंडीचे बाण नव्हत, हे अर्जुनाचे बाण आहेत, हे माझीं मर्में तोडीत आहेत;' असें म्हणत त्या म्हाताऱ्यानें धनुष्य उचललें तों तें अर्जुनानें तोडून टाकलें. दुसरें उचललें तेंही तोडलें. कित्येक अशीं भीष्माचीं धनुष्यें अर्जुनानें तोडलीं. अर्जुनाचे व इतर वीरांचे या अवधींत शेंकडों बाण भीष्माच्या अंगांत घुसून दोन अंगुळें जागाही रिकामी राहिली नाहीं. शेवटीं प्राण कासावीस होऊन सूर्य अस्तास जाण्याच्या सुमारास भीष्म रथांतून पूर्वेकडे डोकें होऊन खालीं पडले. पण अंगांत घुसलेल्या बाणांमुळें जमिनीच्यावर कुशीवर अधांतरींच राहिले. त्या वेळीं धरणीकंप झाला व एकाएकीं पर्जन्य पडूं लागला. पांडवांच्या सैन्यांतून प्रचंड जयघोष निघाला. तेव्हां तो भयंकर प्रकार पाहून दुर्योधन मागें होता त्यास कांहीं तरी अनिष्ट झालें असें वाटून त्याच्या डोळ्यांतून अश्रु निघूं लागले. कौरवांचा सीमावृक्ष उन्मळून पडला, हें ऐकून तर सर्व कौरव दुःखानें रडूं लागले. द्रोण दुसरीकडे लढत होता त्यास दुःशासनानें जाऊन खबर कळविली. तेव्हां तोही शस्त्र ठेवून शोक करीत भीष्मापाशीं आला. लढाई चोहोंकडे बंद झाली. दोहों बाजूंचे प्रमुख वीर हात जोडून भीष्मापाशीं आले. सूर्य दाक्षिणेकडे

आहे हें पाहून उत्तरायणाची वाट पहात दिव्य रूप झालेल्या भीष्माचा जीव देहांतच होता. 'डोकें लोंबकळतें आहे' असें भीष्म म्हणतांच कित्येकानीं मोठमोठ्या उशा आणल्या, पण भीष्मानें त्या घेतल्या नाहींत. तेव्हां अर्जुनानें बसून तीन बाण मारून त्या बाणांनीं भीष्माचें डोकें सांवरून धरलें. मोठमोठे वैद्य बाण काढून चिकित्सा करण्यास आले होते, त्यांस बक्षिसें देऊन परत पाठविण्यास भीष्मानें दुर्योधनास सांगितलें. "माझें शव बाणांवरच असूं द्या; पण माझ्याभोंवतीं खंदक खणा म्हणजे श्वापदें येणार नाहींत. मी उत्तरायण होईपावेतों असाच बाणशय्येवर राहून मग प्राण सोडीन. पित्याच्या आशीर्वादानें मी इच्छामरणी आहें." असें भीष्मांनीं म्हटलें, तेव्हां त्यांच्याभोंवतीं दुर्योधनानें खंदक खणविला. "बा दुर्योधना, तूं अर्जुनाचा पराक्रम प्रत्यक्ष पाहिला आहेस. हें तुझें भांडण भीष्माच्या अंताबरोबरच अंत पावूं दे. अर्धें राज्य पहिल्याप्रमाणें पांडवांस देऊन संधि कर आणि अवशिष्ट राहिलेल्या दोन्हीकडच्या वीरांस आपआपल्या घरीं आनंदानें जाऊं दे." असें भीष्मानें म्हटलें. पण दुर्योधनानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तें पाहून भीष्मानें डोळे मिटले. शेवटीं दोन्ही पक्षांकडील राजे व महारथी भीष्मास नमस्कार करून सुस्कारा टाकीत आपआपल्या शिबिरास परत गेले.

पांडवांस कर्ण ठार मारील, ही दुर्योधनाची समजूत प्रारंभापासून होती, यामुळेंच त्यानें भीष्माचें म्हणणें मान्य केलें नाहीं. भीष्म सेनापति आहे तोंपर्यंत मी लढणार नाहीं, अशी कर्णानें प्रतिज्ञा केली होती. यामुळें दहा दिवस तो युद्धांत नव्हता. अकराव्या दिवशीं प्रातःकाळीं कर्णास लढाईस सज्ज झालेला पाहून दुर्योधनास व त्याच्या मताच्या लोकांस आनंद झाला. कर्णासच सेनापत्य दुर्योधन देणार होता; पण कर्णानें म्हटलें, "महारथी आचार्य द्रोण येथें असतां इतरांस सेनापत्य देणें वाजवी नाहीं." कर्णाच्या मताप्रमाणें दुर्योधनानें तात्काळ द्रोणास सेनापत्याचा अभिषेक करविला. वर्णश्रेष्ठ्यानें, श्रुतीनें, वयानें, बुद्धीनें, वीर्यानें, तपानें, अस्त्रविद्येनें सारांश अनेक गुणांनीं तुम्हीच आमचे सेनापति होण्यास योग्य आहां अशी दुर्योधनानें सेनापतीची स्तुति केली, तेव्हां द्रोणानें संतुष्ट होऊन म्हटलें, "दुर्योधना, मी तुझ्यावर प्रसन्न आहें. कोणताही एक वर माग."

त्यानें उत्तर केलें, “ तुम्ही प्रसन्न असाल तर धर्मास जिवंत धरून माझ्या-पाशीं आणा.” द्रोणानें विचारलें, “ अरे, जिवंत कां म्हणतोस, मारून कां म्हणत नाहींस?” महात्म्यांचा सुद्धां भाव प्रसंगीं सहसा बाहेर पडल्या-वांचून राहत नाहीं, मग दुर्योधनाची गोष्टच काय ? तो म्हणाला, “ धर्म मेला तरी भीमार्जुन राहतीलच ना ? माझा फायदा धर्म मेल्यांत नाहीं. धर्मास जिवंत आणलेंत तर त्यांस पुन्हा द्यूत खेळावयास लावीन. तो आपल्या व्रताप्रमाणे द्यूत खेळल्याशिवाय राहणार नाहीं. मग त्यास द्यूतांत हारवून बंधूंसहित पुन्हां वनवासास पाठवीन. ” हें उत्तर ऐकून द्रोणास फार वाईट वाटलें. पण बोलल्याप्रमाणें वर दिलाच पाहिजे हें मनांत आणून त्यांनीं म्हटलें, “ अर्जुन जर धर्माचें रक्षण करणार नाहीं तर मी धर्मास पकडून देतों. ” याप्रमाणें भाषण होऊन ते दिवशीं युद्धास सुरवात झाली. सैंधव, कालिंग, विकर्ण, हे कौरवसैन्याच्या उजव्या पक्षाकडे होते; आणि त्यांस शकुनि आपल्या गांधार स्वारानिशीं मदत देत होता. डाव्या पक्षाकडे कृप, कृतवर्मा आणि चित्रसेन, विविंशति, दुःशासन इत्यादि धृतराष्ट्राचे पुत्र असून, त्यांस मदत सुदक्षिण कांबोज देत होता. मध्यावर द्रोण स्वतः असून सर्वांपुढें बिनीत कर्ण होता. रणाचे अग्रभागीं कर्णास पाहून कौरवसैन्यास भीष्माच्या मरणाची क्षिति वाटली नाहीं. किंबहुना, भीष्मानें पांडवांची गय केली, कर्ण करणार नाहीं, असें वाटून त्यास अधिक हिम्मत चढली. याप्रमाणें कौरवांचें सैन्य सज्ज होऊन त्वेषानें व हिम्मतीनें पांडवसैन्यावर घसरलें, तेव्हां पूर्व दिवसाहूनही अधिक भयंकर युद्ध सुरू झालें. द्रोण व कर्ण यांच्या पराक्रमानें पांडवांच्या सैन्याचा फारच नाश झाला. युधिष्ठिराची बाजू उघडी पडून द्रोणानें त्यास गांठलें व त्याच्या रथाशीं रथ भिडवला. तो भयंकर प्रकार पाहून ‘ राजा मेला ’ असा हाहाःकार पांडवांच्या सैन्यांत उसळून गेला. श्रीकृष्णानें दुरून ती आरोळी ऐकून अर्जुनाचा रथ एकाएकीं आणून द्रोणाच्या रथावर घातला, आणि धर्मास सोडविलें. याप्रमाणें प्रथम दिवशीं युद्ध होऊन सायंकाळीं दोन्हीं सैन्यें आपआपल्या शिबिरास परत आलीं.

दुसरे दिवशीं अर्जुनास दूर काढण्यासाठीं दुर्योधनानें संसप्तक गणाकडून त्यास लढाईचें मुद्दाम आव्हान करविलें. हे संसप्तक मोठे योद्धे असून

युद्धांतून परत फिरावयाचेच नाहींत असा त्यांचा बाणा असे. कोणी द्यूतास आव्हान केलें असतां नाहीं म्हणणें जसे क्षत्रियांस अयशस्कर वाटे, तसें युद्धास कोणी आव्हान केलें असतां नाकारणें त्यांस लांछनास्पद वाटे. अर्जुन संसप्तकांशीं स्वतंत्र युद्ध करण्यासाठीं दक्षिणेकडे गेला, तेव्हां द्रोणानें पांडवांच्या सैन्यावर चाल करून धर्मावर गर्दी केली. द्रोणास सत्याजित् पांचाल आडवा आला, त्यास द्रोणानें बाणानें ठार मारलें. पांचाल, केकय, मत्स्य, चेदि, कारुष, इतके लोक धर्माच्या मदतीस धांवले. त्यांचाही द्रोणानें पराभव केला. तेव्हां धर्म युद्धभूमि सोडून गेला. इकडे भीमाचें आणि प्रागज्योतिषाचा राजा भगदत्त यांचें युद्ध लागलें. भगदत्ताजवळ मोठें गजसैन्य होतें, व तो स्वतः हत्तीवरूनच लढत होता. भीमानें त्याच्या गजसैन्याशीं भयंकर युद्ध केलें, परंतु भगदत्त भीमास आटोपेना. सायंकाळच्या सुमारास संसप्तकांचा नाश करून अर्जुन परत येत होता; तों भगदत्ताची गर्जना ऐकून भगदत्ताकडे वळला. भगदत्तानेंही आपला हत्ती अर्जुनावर चालविला. तो हत्ती महा बलाढ्य असून लढाईस सरावलेला होता. त्याचा दम जिरलेला असून तो शस्त्रांस किंवा *अग्नीसही बिलकुल जुमानणारा नव्हता. त्याच्या अंगावर व डोक्यावर चिलखत घातलें असून सोंडेंत साखळदंड दिला होता. असा तो हत्ती अर्जुनावर धांवला, तेव्हां, अर्जुनानें इतक्या जोरानें त्याच्या मस्तकावर बाण मारले कीं, ते त्याचें कवच फोडून त्याच्या मस्तकांत खोल घुसले. इकडे भगदत्तानें अंकुश वैष्णवास्त्रानें अभिमंत्रून अर्जुनावर फेंकला. पण हत्तींनें त्याच वेळीं कच खाल्ल्यानें तो अंकुश अर्जुनावर न पडतां श्रीकृष्णाच्या छातीवर पडला. त्या वैष्णवास्त्राचें प्रत्यक्ष श्रीविष्णूवरच कांहीं न चालल्यानें तो अंकुश केवळ फुलाच्या माळेसारखा हलका लागून खालीं पडला. तेव्हां भगदत्तानें क्रोधानें अर्जुनावर हत्ती चालविण्याचा यत्न केला. पण दरिद्र्याची स्त्री जशी नवऱ्याची आज्ञा ऐकत नाहीं, त्याप्रमाणें तो हत्ती पुढें पाऊल टाकीना. शेवटीं तो हत्ती धाडकन खालीं मरून पडला. इतक्यांत भगदत्ताचेंही हृदय

---

* मस्त हत्तीस सुद्धां दारूच्या तोट्यांनीं जेरीस आणतात हें प्रसिद्ध आहे. हत्ती दारूच्या सोसाट्यास फार भितो.

अर्जुनानें बाणानें फोडलें.त्यामुळें तोही,हत्ती पडतां पडतां,त्यावरून खालीं मरून पडला. याप्रमाणें नरकासुराचा पुत्र भगदत्त याचा अर्जुनानें नाश केल्यावर सायंकाळ झाल्यानें दोन्हीं सैन्यें सेनापतींनीं रणांगणांतून परत फिरविलीं.

दुसरे दिवसाच्या युद्धांतही द्रोणास आपली प्रतिज्ञा पुरी करतां आली नाहीं; तेव्हां तिसरे दिवशीं त्यानें आपल्या सैन्याची विलक्षण मांडणी चक्र-रूप व्यूहांत केली, आणि आज धर्म सांपडला नाहीं तर दुसरा कोणी महारथी जरूर सांपडेल असें दुर्योधनास आश्वासन दिलें. दुसऱ्या संसप्तक गणांकडून अर्जुनास पुन्हां युद्धक्षेत्रांतून बाहेर काढून द्रोणानें पांडवसैन्याशीं युद्ध चालविलें. तेव्हां त्या सैन्याची चाल बंद पडली. भीम, धृष्टद्युम्न इत्यादि वीरांचें चक्रव्यूहावर चालेना, तेव्हां युधिष्ठिरानें अभिमन्यूस चक्र-व्यूहांत घुसावयास सांगितलें. चक्रव्यूहांत प्रवेश करण्याचें मी शिकलों आहें; पण मला परतणें साधणार नाहीं, ' असें तो म्हणाला. परंतु धृष्टद्युम्न, भीम इत्यादि वीर ' तुझ्या पाठोपाठ आम्ही घुसतों ' असें म्हणाले. भावी होणार टळत नाहीं. त्या दिवशीं मुलांस पुढें करण्याची इच्छा युधिष्ठिरास झाली, हें आश्चर्य नव्हे. अभिमन्यु पराक्रम करून द्रोणावर जाऊन पडला. द्रोणानें त्यास न अडवतां चक्रांत जाऊं दिलें. त्यामागें इतर वीर घुसूं लागले, पण त्यांस त्यानें जाऊं दिलें नाहीं. भीम, धृष्टद्युम्न इत्यादि कित्येक योध्ये कांहीं पुढें घुसले, पण त्यांस जयद्रथानें पक्कें अडवून धरिलें. यामुळें अभिमन्यु शत्रुसैन्याच्या चक्रांत एकटा सांप-डला. पण तो महारथी श्रीकृष्णाचा शिष्य असल्यानें घाबरला नाहीं. त्यानें दिव्य पराक्रम करून शेंकडों वीर ठार मारले. दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण यांसही ठार केलें. तेव्हां दुर्योधनानें क्रोधास येऊन ' मारा ' ' मारा ' असें ओरडत त्यावर चाल केली. त्या वेळीं सहा वीर कृप, कर्ण, अश्वत्थामा, बृहद्बल, कृतवर्मा व दुर्योधन यांनीं त्यांजवर पडून त्याचे घोडे व सारथी मारून त्यांस विरथ केलें. अभिमन्यु गदा घेऊन पायींच लढूं लागला. तेव्हां दुःशासनाचा पुत्र गदा घेऊन त्यासमोर झाला. त्यांनीं एकमेकांस गदेच्या प्रहारांनीं मूर्च्छित केलें. पण थोड्या वेळानें दुःशासनाचा पुत्र प्रथम सावध होऊन अभिमन्यूवर धांवला व त्याचा त्यानें मूर्च्छित असतांना गदेनें प्राण घेतला.

अर्जुनाचा प्रियपुत्र आणि श्रीकृष्णाचा प्रिय भागिनेय अभिमन्यु याप्रमाणें पराक्रम करून स्वर्गास गेला, त्या वेळेस अर्जुन संसप्तकांचा नाश करून परत येत होता. त्याला एकाएकीं रडें कोसळलें. दाबलेल्या अश्रूंनीं त्याचा कंठ दाटून आला. त्याच्या तोंडांतून शब्द निघेनासा झाला. विलक्षण अपशकुनही होऊं लागले. " कांहीं तरी अनिष्ट झालें आहे, राजास द्रोणानें तर पकडलें नाहींना ? " असें त्यानें श्रीकृष्णास विचारलें. " धर्मास कोणतीही इजा होणें शक्य नाहीं, दुसरें कांहीं तरी अनिष्ट असावें, " असें श्रीकृष्णानें उत्तर दिलें. दोन्हीं सैन्यें शिबिरांकडे परतलीं होतीं. पांडवांची सर्व छावणी शोकमय दिसत होती. शिबिरांत पोंचल्यावर आपल्या बंधूंस दुःखांत मग्न झालेले पाहून अर्जुनानें कारण विचारलें; तेव्हां युधिष्ठिरानें उत्तर केलें, " बाबा अर्जुना, द्रोणानें रचलेल्या चक्रव्यूहांत मूर्खपणानें मीं अभिमन्यूस शिरकाविलें. द्रोणानें माझ्यावर चाल करून मला पकडण्याचा पुष्कळ यत्न केला पण तो सिद्धीस गेला नाहीं. पण, तिकडे भीम, धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद वगैरे सर्व वीरांस अभिमन्यूच्या मागें जात असतां, एकट्या जयद्रथानें शंकराच्या वराच्या जोरानें अडवून धरलें आणि अभिमन्यु एकटाच व्यूहांत शिरून अत्यंत पराक्रम करीत असतां कौरववीरांनीं विरथ करून त्याला मारलें. " हे शब्द ऐकून अर्जुन एकदम मूर्च्छा येऊन खालीं पडला. थोड्या वेळानें सावध होऊन तो म्हणाला, " अरेरे ! माझ्या अभिमन्यूला कोणीं मारलें ? सुभद्रेचा, द्रौपदीचा, आई कुंतीचा लाडका बाळ कोणीं मारला ? मृदुकुंचित केसांचा, मृगासारख्या डोळ्यांचा, मत्त हत्तीप्रमाणें चालणारा बाळवीर मेला काय ? त्याचें तें सुंदर नाक, कान, डोळे व कपाळ असलेलें तोंड माझ्या पुन्हां दृष्टीस पडणार नाहीं काय ? त्याच्या मदतीस तुम्ही धांवला असतां तुम्हां सर्वांना त्या एकट्या जयद्रथानें अडवून धरलें ? आम्हीं त्यास पूर्वी जीवदान दिलें, त्याचे उपकार त्यानें असे फेडले काय ? उद्यां सायंकाळपावेतों जर मी त्यास ठार न मारीन तर अग्निकाष्ठें भक्षण करून प्राण देईन. जिवाच्या भीतीनें युद्ध सोडून मृत्यूपासून सुटून जाण्याचा जयद्रथानें यत्न केला नाहीं, तर मी त्यास उद्यां खचित ठार करतों, न करीन तर मला पुण्यगति मिळणार नाहीं. " म्हणून अर्जुनानें गांडीव धनुष्याची दोरी ओढून सोडली;

तेव्हां त्या दोरीच्या आवाजानें दिशा भरून गेल्या. श्रीकृष्णानें अर्जुनाच्या शपथेस अनुमति देण्यासाठीं आपला पांचजन्य जोरानें फुंकला. त्याबरोबर सर्व वीरांनीं गर्जना करून आपआपले शंख फुकले. पांडवांच्या सैन्यांतून शोकाचा कल्लोळ ऐकूं येण्याऐवजीं आनंदानें फुंकलेला शंखांचा आवाज ऐकूं येतो हें काय ? असें कौरववीर आश्चर्य करीत आहेत, तोंच हेरांनीं अर्जुनाच्या प्रतिज्ञेची बातमी जयद्रथास सांगितली. ती ऐकतांच घाबरून त्यानें दुर्योधनाकडे जाऊन युद्ध सोडून तात्काळ निघून जाण्याची त्याजपाशीं परवानगी मागितली; पण दुर्योधनाने त्यास आश्वासन देऊन त्यास द्रोणाकडे नेलें. द्रोणानें त्याचें स्वागत करून सर्व हकीकत ऐकून म्हटले, "जयद्रथा, मी तुझें रक्षण करीन. तूं भिऊं नकोस. मी उद्यां असा व्यूह रचतो कीं, अर्जुनास तो व्यूह भेदून तुला मारणें कठीण पडेल. याशिवाय क्षत्रियास, विशेषतः ज्यानें वेदाचें अध्ययन करून यथाशास्त्र प्रजेचें पालन केलें आहे, आणि अनेक दक्षिणायुक्त यज्ञ केले आहेत, त्यास रणांगणात मरण्याची मुळींच भीति वाटूं नये. कौरव, पांडव, वृष्णि, मी, माझा पुत्र अश्वत्थामासुद्धां, आपण सर्व केव्हां तरी मरणारच आहों. युद्धांत मेलेले क्षत्रिय वीर तपस्व्याच्या तपानें मिळणाऱ्या पुण्यलोकास जातात, हें तूं लक्षांत ठेव. तर मृत्यूस न भितां स्थिर होऊन युद्ध कर " असें द्रोणाचें आश्वासन व प्रोत्साहन ऐकून दुर्योधन व जयद्रथ समाधान पावले, आणि आपआपल्या शिबिरास परत गेले.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं म्हातारा द्रोण शंख फुंकीत व आपल्या लाल घोड्याचा रथ इकडून तिकडे फेकीत कौरवसैन्याची शकटव्यूहात मांडणी करतांना दृष्टीस पडला. त्या व्यूहाची लांबी चोवीस कोस असून मागच्या बाजूनें रुंदी दहा कोस होती. शकटाच्या अग्रभागीं द्रोण स्वतः उभा राहून निरनिराळ्या वीरांना निरनिराळ्या भागात त्यानें उभे केलें. विशेषतः त्या शकटाच्या चक्राच्या ठिकाणीं मोठमोठे सैन्याचे भाग त्यानें लावले. या व्यूहास सोडून मागें तीन कोसांवर दूर राहण्यास जयद्रथास त्यानें सांगितलें, व त्याच्या रक्षणासाठीं सौमदत्ति, कर्ण, अश्वत्थामा, शल्य, वृप व कृप असे सहा वीर दिले, आणि पुष्कळसें गजसैन्य व अश्वसैन्यही दिलें. याप्रमाणें बंदोबस्त करून कृतान्ताप्रमाणें तो शुभ्र कवच व उष्णीष घातलेला द्रोण

धनुष्य विस्फारून शकटाच्या अग्रभागीं उभा राहिला, तेव्हां त्याजकडे कोणाच्यानें पाहवेना. पण आपली भयंकर प्रतिज्ञा सिद्धीस नेण्यासाठीं सज्ज झालेला, सुवर्णकवच घातलेला, कृष्णसारथी अर्जुन ही तयारी पाहून घाबरला नाहीं. श्रीकृष्णाच्या सल्ल्यानें त्यानें द्रोणास नमस्कार करून त्यास वळसा घातला. " अरे, शत्रूला जिंकल्याशिवाय पुढें जावयाचें नाहीं, अशी तुझी प्रतिज्ञा आहेना ? " असें अर्जुनास द्रोणानें म्हटलें. तेव्हां अर्जुनानें उत्तर केलें, " तुम्ही माझे आचार्य आहां, शत्रु नाहीं. " जातां जातां द्रोणानें अर्जुनावर अनेक बाण सोडले त्यांस न जुमानतां श्रीकृष्णानें दुःशासनाच्या गजसैन्यावर अर्जुनाचा रथ घालून थोड्याच वेळांत शत्रुसैन्याची फळी फोडली. दुर्योधनाच्यानें तें पाहवेना. त्यानें द्रोणापाशीं जाऊन विनंति केली, " गुरुजी, एवढी सेना फोडून अर्जुन आंत घुसला. द्रोणास जिंकून आंत कोणी घुसूं शकणार नाहीं अशी सर्वांची खातरी, पण ती फुकट गेली. तुम्हीं जयद्रथास व मला आश्वासन देऊन फसवलेंत असेंच म्हटलें पाहिजे. तुम्ही मला आपला अभिप्राय स्पष्ट सांगता तर मीं जयद्रथास ठेवून घेतलें नसतें. " द्रोणानें राग न करतां उत्तर केलें, " बा दुर्योधना, तुझ्या कठोर भाषणाचा मला राग नाहीं. तूं माझ्या पुत्रासारखा आहेस. अरे, अर्जुनाच्या रथाचा वेग तूं पाहतोस ना ? श्रीकृष्णासारखा कुशल सारथि आणि त्याचे श्वेत दिव्य घोडे. प्रसंगीं अर्जुनानें फेंकलेले बाण त्याच्याच रथाच्या मागें पडतात. थोडेसें विवर करून अर्जुनाचा रथ आंत घुसतो. त्याचा पाठलाग माझ्या म्हाताऱ्याच्यानें कसा करवणार ? शिवाय तो माझ्याशीं युद्धास उभाच रहात नाहीं तेथें माझा इलाज काय ? असो, तूं जाऊन त्याला गांठून त्याशीं युद्ध कर. मी तुला दिव्य कवच असें बांधतों कीं, अर्जुनाचे बाणही ते कवच फोडूं शकणार नाहींत. " असें म्हणून द्रोणानें अभिमंत्रण करून दुर्योधनाचें कवच पुन्हां बांधलें; आणि दुर्योधन त्वेषानें अर्जुनाच्या रथामागें धांवला. दुर्योधनाचा रथ अर्जुनाच्या रथावर धांवून येत आहे हें पाहून श्रीकृष्णास आनंद झाला. त्यानें म्हटलें, " हा सुयोग दवडूं नको, हा अत्यंत मानी व सुखांत वाढलेला दुर्योधन आयता समोर येत आहे, त्यास ठार करून युद्धाचा निकाल लाव. निदान तुझा पराक्रम काय आहे हें तरी यास आज दाखव."हें ऐकून अर्जुनानें ठीक

म्हणून आपल्या बाणांचा ओघ दुर्योधनावर चालविला; पण आश्चर्य हें कीं, अर्जुनाच्या बाहूनें त्वेषानें टाकलेले बाण दुर्योधनाच्या कवचावर पडून निरुपद्रवपणें खालीं घसरले. श्रीकृष्णानें हें आश्चर्य पाहून थट्टेनें म्हटलें, " अर्जुना, खड्यासारखे बाण खालीं पडतात, कवचांत घुसत नाहींत हें काय ? तुझ्या बाहूचें व मुष्टीचें बल कायम आहे ना ? " त्याचें इंगित अर्जुनाच्या तात्काळ लक्षांत येऊन तो म्हणाला, " द्रोणानें अभेद्य कवचाची धारणा दुर्योधनास दिली आहे. श्रीकृष्णा, तुला सर्व समजत असून तूं मुद्दाम मला भुरळ पाडतोस. असो. पण हा दुर्योधन या धारणेचें मर्म जाणत नाहीं. जसें स्त्रीला कवच घालावें तसें याला हें घातलें आहे. याचे डोळे मी आतां उघडतों. " असें म्हणून अर्जुनानें दुर्योधनावर बाण न टाकतां सारथ्यावर टाकून त्यास ठार केलें. याप्रमाणें दुर्योधनास विरथ करून त्यानें त्याच्या दोन्ही तळहातावर जेथें कवच नव्हतें तेथें बाण मारले. त्या विलक्षण कौशल्यानें मारलेल्या बाणांनीं दुर्योधनास तळहातांत अतिशय वेदना होऊं लागल्या, व त्या वेदना असह्य होऊन त्यानें शेवटीं पलायन केलें.

दुर्योधनाची संशयित स्थिति पाहून अनेक वीर अर्जुनावर धांवले; तेव्हां तेथें भयंकर कंदन सुरू झालें. इकडे भीमही कौरवसैन्याशीं दुसऱ्या ठिकाणीं झगडून शकटव्यूह फोडीत होता. त्या दिवशींचें युद्ध युद्धाच्या सर्व दिवसांत अति भयंकर झालें. शेवटीं भीमार्जुनांनीं कौरवसैन्याचा पुष्कळ नाश करून व्यूहरचना फोडली. सायंकाळच्या सुमारास अर्जुनाचा रथ व्यूहाच्या मागें जयद्रथ सहा महारथींच्या आश्रयाखालीं निर्भय बसला होता तेथें पोंचला. तेथें त्या सहा वीरांचें आणि अर्जुनाचें पुन्हां भयंकर युद्ध सुरू झालें. तें संपेना, यामुळें अर्जुनाची प्रतिज्ञा सिद्धीस नेण्यासाठीं श्रीकृष्णानें माया रचिली. सायंकाळच्या सूर्यावर अभ्र पसरून काळोख पडूं लागला, तेव्हां जयद्रथ निर्भय होऊन लढाईच्या क्षेत्रांत गैरसावध फिरूं लागला. कदाचित् सूर्यास्त झाल्यानें लढाई थांबण्याच्या तुताऱ्या आतां वाजतील आणि अर्जुनाची प्रतिज्ञा खोटी पडल्यानें त्यास प्राणत्याग करावा लागेल अशी त्यास अकाळीं आनंदाची स्फूर्ति झाली असावी. इतक्यांत एकदम सूर्य ढगांतून बाहेर पडून रणांगणावर किरणें पडलीं. त्यांच्या

प्रकाशांत अर्जुनानें एका बाणानें जयद्रथाचें शिर तात्काळ उडविलें. याप्रमाणें जयद्रथाचा वध झालेला पाहून कौरवांनीं हाय म्हटलें आणि पांडवांनीं जयाच्या आरोळ्या ठोकल्या. श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ तात्काळ मार्गे फिरवून झपाट्यानें धर्मापाशीं आणला. धर्मानें त्यांस पाहतांच रथांतून उडी टाकून दोघांही कृष्णांना कवटाळिलें. तिघांच्या डोळ्यांतून आनंदाचे अश्रु वाहत होते. धर्मानें म्हटलें, " श्रीकृष्णा, तुझ्या प्रसादानें अर्जुनानें आपली दुस्तर प्रतिज्ञा पुरी केली. तुझ्या कृपेनें आम्ही शत्रूस जिंकूं यांत संशय नाहीं. " तेव्हां श्रीकृष्णानें उत्तर केलें, " युधिष्ठिरा, तुझ्या तपानें, तुझ्या धर्मशीलतेनें, तुझ्या साधुत्वानें, तुझ्या ऋजुत्वानेंच जयद्रथ मेला असें समज. " याप्रमाणें पांडवांच्या सैन्यांत आनंदाचीं भाषणें चाललीं होतीं, तों तिकडे कौरवसैन्यांत दुःखाचीं व रोषाचीं भाषणें होत होतीं. जयद्रथ मेल्यानें दुर्योधनास मेल्याहूनही मेल्यासारखें झालें. दात तोडलेल्या सर्पाप्रमाणें सुस्कारे टाकीत द्रोणास गांठून दुःखानें व रोषानें तो म्हणाला, " आचार्य, भीमार्जुनांनीं केलेलें हें क्षत्रियांचें भयंकर कंदन पहा. सात अक्षौहिणी ठार होऊन सरते शेवटीं जयद्रथही ठार झाला. विजयासाठीं धडपडणाऱ्या माझ्या नादास लागून मेलेल्या या वीरांचें ऋण मी कसें फेडूं ? या लाखों जीवांना ठार मारविल्याचें पातक मी सहस्र अश्वमेध केले तरीही नाहींसें होणार नाहीं. लाखों मित्रांचा द्रोह करणाऱ्या मला दुष्टाला पृथ्वीनें त्या राजसभेंतच गिळून कां टाकलें नाहीं ? असो. माझ्याकरतां प्राण देणाऱ्या माझ्या मित्रांच्या मागें मीही यमसदनाला जातों. तुम्ही मात्र आपल्या प्रिय शिष्याची अशीच उपेक्षा करीत जा. " हे अप्रिय भाषण ऐकून द्रोणास अतिशय राग आला. मुहूर्तभर ध्यानस्थ राहून तो शेवटीं म्हणाला, ' दुर्योधना, अशा वाक्शल्यांनीं मला कां टोंचतोस ? अर्जुन युद्धांत अजिंक्य आहे हें मीं तुला शेंकडोंदां सांगितलें. ज्यास आम्ही त्रैलोक्यांत शूर श्रेष्ठ समजत होतों त्या भीष्मासही अर्जुनानें मारलें, यापेक्षां जास्त पुरावा काय पाहिजे ? बाबा, शकुनीनें जे द्यूतांत फांसे टाकले ते फांसे नव्हते, अर्जुनाचे बाण होते. जो मूर्ख मनुष्य आईबापांचें, आप्तांचें, मित्रांचें भाषण अव्हेरून आपलेंच मत चालवतो तो लवकरच शोक करतो. सती द्रौपदीला सभेंत खेंचून आणण्याचा जो तुम्हीं

अधर्म केलांत त्याचें आतां फळ भोगा. बरें, मला तूं दूषण कां देतोस ? तुम्ही सहा वीर जयद्रथाला संभाळून होतां ते सर्व तुम्ही जिवंत आहां. अश्वत्थामा जिवंत आहे, कर्ण जिवंत आहे, कृप जिवंत आहे, आणि जयद्रथ मेला याची लज्जा तुम्हांस पाहिजे. असो. मीही आज कवच काढीत नाहीं. तुझी युद्ध चालू ठेवण्याची इच्छा आहे तीच पुरी होऊं दे. अश्वत्थाम्याला सांगा कीं, पांचाल सृंजयांना आपला जीव वांचवून जिवंत सोडूं नको. मीही जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुझ्या शत्रूंना ठारच करतों. क्षुब्ध झालेले कौरव आणि सृंजय रात्रींसुद्धां युद्ध करतील." असें म्हणून द्रोणानें आपला रथ पांडवांच्या सैन्याकडे हाकला. रणांगणांतून परत जाण्याच्या तुताऱ्या कौरवांकडे वाजल्या नाहींत, यामुळें पांडवांचें सैन्यही रणांगणांतून परतलें नव्हते. दुर्योधनानें रागाच्या आवेशांत युद्ध चालू ठेवणेंच पसंत केलें व सेनापतींना आपआपलीं हतशेष सैन्यें हलवण्याविषयीं हुकूम केले. सर्व पायदळांना शस्त्रें ठेवून मशाली घेण्याची त्यानें आज्ञा केली, त्याप्रमाणें त्यांनीं मशाली घेऊन पेटवल्या. प्रत्येक रथाजवळ पांच, हत्ती-जवळ तीन, आणि घोड्याजवळ एक याप्रमाणें पायदळ लोक मशाली धरून चालूं लागले. पांडवांकडेही तशीच व्यवस्था होऊन पायदळांचें युद्ध बंद झालें; आणि रथी, गज आणि अश्व यांचें युद्ध रात्रीच्या काळोखांत मशालींच्या उजेडांत सुरू झालें. द्रोण दुर्योधनाच्या व्यर्थ निंदेनें चवताळला होता, पण कर्ण द्रोणाच्या वास्तविक दूषणानें अधिक क्षुब्ध झाला होता. त्याने क्रोधास पेटून पांडवसैन्याशीं भयंकर युद्ध चालविलें. त्याच्यापुढें कोणाचा टिकाव लागेना. पांडवांकडील पायदळ वीर भीतीनें मशाली टाकटाकून पळून जाऊं लागले. या प्रसंगीं श्रीकृष्णानें अर्जुनाचा रथ कर्णावर घातला नाहीं, याचें मर्म अर्जुनाच्या लक्षांत आलें नाहीं. त्यानें या वेळीं घटोत्कचास पुढें केलें. "बाळा, घटोत्कचा, तुझ्या पित्याची व चुलत्याची सेवा करण्याची वेळ आज आहे. राक्षसांना रात्रियुद्धांत अधिक जोर असतो, तर या कठीण प्रसंगीं तूं आपला पराक्रम दाखीव." याप्रमाणें श्रीकृष्णानें घटोत्कचास प्रोत्साहन दिलें; तेव्हां त्यानें आपली भयंकर राक्षसी माया प्रगट करून कर्णावर चाल केली. अदृश्य होऊन त्यानें कौरवसैन्यावर दगडांचा व शस्त्रांचा वर्षाव चालविला. आकाशाच्या अंधा-

यांतून हजारों बाण, शक्ति, तोमर, पट्टिश पडून कौरवसैन्याचा फडशा होऊं लागला. कर्ण यथाशक्ति त्याचा प्रतिकार करीत होता. परंतु प्रबळ झालेल्या राक्षसी मायेपुढें अंधारांत त्याचें कांहीं चालेना. घटोत्कचाच्या अदृश्य वर्षावानें कौरवसैन्यांत इतका हाहाःकार उडाला कीं, घटोत्कचाच्या रात्रियुद्धांतून वांचूं तर पुढें पांडवांशीं लढूं असें सर्वांस झालें. शेवटीं कर्णास आपली अमोघ शक्ति चालवण्याविषयीं दुर्योधनानें विनंति केली. त्या शक्तीचा प्रयोग नुसता अमक्यावर असें म्हणून करावयाचा होता. कर्णाच्या विलक्षण दातृत्वाबद्दल संतुष्ट होऊन इंद्रानें ती शक्ति एका वीराचा निश्चयानें नाश करील अशा वरासह कर्णास दिली होती. ती शेवटीं कर्णानें घटोत्कचावर चालविली, तेव्हां तो अदृश्य स्थितींतच मारला जाऊन धाड्कन आकाशांतून खालीं पडला. व पडतां पडतां त्याच्या प्रचंड देहाखालीं दोन्हीं सैन्यांतील शेंकडों माणसें मरण पावलीं. याप्रमाणें वीर्यशाली घटोत्कच मरण पावला हें पाहून भीमार्जुनांस फार दुःख झालें. पण श्रीकृष्णास इतका आनंद झाला कीं, त्यानें आनंदाच्या भरांत अर्जुनास आलिंगन दिलें. सिंहनाद करून, रथ उभा करून, खालीं उडी टाकून तो नाचूं लागला. अर्जुनास त्याचें मोठें आश्चर्य वाटून तो म्हणाला, "श्रीकृष्णा, शोकाची वेळ असतां तुझी ही आनंदाची स्थिति पाहून मला मोठें नवल वाटतें. जसा समुद्र आटून जावा किंवा मेरु जाग्यावरून हालावा त्याप्रमाणें तुझ्या नेहमींच्या शांत स्वभावाच्या विरुद्ध हें असें तुझें विलक्षण वर्तन मला चमत्कारिक वाटतें." श्रीकृष्ण म्हणाला, "बाबा अर्जुना, माझ्या अतिहर्षाचें कारण ऐक. ज्या शक्तीच्या भीतीनें मी आजपर्यंत तुला कर्णापासून वांचवीत होतों, ती शक्ति घटोत्कचावर फुकट गेल्यानें आज तूं जिवंत झालास, आणि कर्ण मेला असें मी समजतों. ही कर्णाजवळची शक्ति अशी अमोघ होती कीं, तीपुढें कोणीही वीर जिवंत राहूं शकत नव्हता. तुझ्या गांडीवानें किंबहुना माझ्या चक्रानें सुद्धां तिचा प्रतिकार होणें शक्य नव्हतें. त्या शक्तीचा आपल्यावर विनियोग करून घेऊन घटोत्कचानें तुमच्यावर अगणित उपकार केले आहेत." असो; श्रीकृष्णानें आपल्या बुद्धिप्रभावानें व दैवीमायेनेंच कर्णाची अमोघ शक्ति फुकट घालविली असें म्हटलें पाहिजे. दररात्रीं दुर्योधनाची व कर्णाची सल्लामसलत चाले, व

अर्जुनास द्वैरथास आव्हान करून त्याजवर शक्ति चालविण्याचा त्यांचा संकेत होई. पण प्रातःकाळ झाला कीं तो सर्व बेत विसरला जाऊन निराळीच तऱ्हा होई. युधिष्ठिरास पकडण्याच्या आशेनें तीन दिवस तर अर्जुन संसप्तकाकडेस कौरवांनींच गुंतविला. या चवथ्या दिवशीं जयद्रथास संभाळण्याच्या नादांत शक्तीचा प्रयोग करण्यास कर्ण विसरला; आणि शेवटीं रात्रियुद्धाचा प्रसंग येऊन घटोत्कच आपल्या राक्षसी मायेनें रात्रि-युद्धांत अनावर झाल्यानें या शक्तीनें ठार मारावा लागला. कदाचित् कर्णाच्या पोटांत हेंही असेल कीं, मी सेनापति होईन तेव्हां अर्जुनास द्वैरथास बोलावून ठार मारीन आणि स्वतंत्र यश घेईन. या संसारांत शेकडों असे प्रसंग घडून येतात. अमुक गोष्ट पूर्वी कां केली नाहीं याचें आपणांसच मागून आश्चर्य वाटतें, व दुःख होतें. सुलभ असूनही गोष्ट वेळेवर सुचत नाहीं, आणि सुचली तरी वेळेवर ध्यानांत राहत नाहीं, भलताच नाद भरतो. अशी ही दैवी माया विलक्षण आहे. धृतराष्ट्रानें या गोष्टीचें आश्चर्य केलें. तेव्हां संजयानें त्यास सांगितलें, " श्रीकृष्णाच्या मायेनें आम्हीं रात्रीं केलेला बेत रोज विसरावा आणि अर्जुनास होतां होईल तों श्रीकृष्णानें कर्णापासून वांचवावें. " असो; घटोत्कच मेल्यावर दोन्हीं सैन्यें अत्यंत थकून गेल्यानें अर्जुनाच्या सूचनेवरून दोन्ही सेनापतींनीं चंद्रोदय होईपर्यंत आपआपल्या सैन्यास रणांगणावरच झोंप घेण्यास परवानगी दिली. तेव्हां सर्व मनुष्यें व जनावरें त्या दिवसाच्या भयंकर परिश्रमानें थकली असल्यानें क्षणभरांत मेल्यासारखीं रणांगणावरच झोंपीं गेलीं. सर्वत्र सामसूम होऊन हजारों घोड्यांच्या व हत्तींच्या मोठमोठ्या श्वासोच्छ्वासाशिवाय रणांगणावर एक शब्दही ऐकूं येईनासा झाला.

शकपूर्व ३१७९ च्या मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशीस भारती युद्धास प्रारंभ झाला. दहा दिवस भीष्मानें पराक्रम करून वद्य अष्टमीस देह ठेविला. पुढें चार दिवस द्रोणाच्या आधिपत्याखालीं भयंकर युद्ध होऊन सायंकाळीं जयद्रथ व रात्रियुद्धांत घटोत्कच मारले गेल्यावर दोन्हीं सैन्यें रणांगणावर झोंपीं गेलीं. त्या रात्रीं पहाटेच्या चार वाजण्याच्या सुमारास वद्य द्वादशीचा चंद्र उदयोन्मुख होऊन त्या कुमुदिनीनाथाचें नेत्रांस आनंद देणारें बिंब कामिनीच्या कपोलाप्रमाणें जात्या गौर असूनही उदयरागानें आरक्त झालेलें

पूर्वेकडे क्षितिजावर हळूहळू आलें. थोड्याच वेळानें चांदीच्या चूर्णासारखी स्वच्छ पांढरी चंद्राची ज्योत्स्ना रणांगणावर पसरली. रथाच्या मागच्या बाजूस टेकून निजलेले रथी, रथाच्या पुढच्या दांड्यास टेकून निजलेले सारथी, उभ्या उभ्याच झोंप घेणारे घोडे, घोड्याच्या पागा हातांत धरून जमिनीवर सपशेल पडलेले घोडेस्वार, सोंड गुंडाळून जमिनीवर झोंपी गेलेल्या हत्तींच्या गंडस्थलावर डोकें टेकून निजलेले हत्तीवरचे वीर आणि ढालांवर डोकें टेकलेले पायदळ शिपाई चंद्रकिरणांनीं जागे झाले. चंद्र उदय पावला म्हणजे जसा समुद्र उचंबळूं लागतो त्या-प्रमाणें तो सैन्यसागरही थोड्याच अवकाशांत उचंबळूं लागला, व तीं दोन्हीं सैन्यें एकमेकांवर तुटून पडण्यास तयार झालीं. तेव्हां दुर्योधनानें द्रोणास म्हटले, " आचार्य, प्रिय शिष्याच्या प्रेमानें किंवा माझ्या मंद भाग्यानें तुम्ही पांडवांची गय करतां; पण आतां मुळींच करूं नका. माझ्यासाठीं, थकलेले न थकलेले, जाणणार गैरजाणणार, कोणाचीही कींव न करतां शत्रूच्या सैन्याचा फडशा करा. " द्रोणानें उत्तर केलें, " जे माझ्यानें शक्य होतें तें मी आतांपर्यंत करीतच आलों. पण आता तुझ्या-साठीं आणखी हें करतों कीं, जे अस्त्र न जाणणारे आहेत, त्यांसही अस्त्रानें ठार मारतो. मी सर्व पांचाळांना ठार मारल्याशिवाय आज कवचच काढीत नाहीं. पण अर्जुनावर तूंच जाऊन धसर. तूं या वैराचे मूळ आहेस; तूं इतर क्षत्रियांचा कां घात करवतोस? अर्जुन थकलेला आहे तर तूंच त्याच्या-वर जाऊन आपलें वैर उगवून घे." असें म्हणून द्रोणानें रागानें व त्वेषानें रणाचा मध्य सोडून उत्तरेकडच्या पक्षास होऊन पांचालावर अस्त्रें टाकण्यास सुरवात केली. पाचालाच्या मदतीला चेदि मत्स्य धावले; त्या सर्वांसही द्रोणानें परास्त करून द्रुपदाचे तीन पुत्र ठार करून प्रत्यक्ष द्रुपद आणि विराट यांस यमलोकास पाठविलें. ते पाहून धृष्टद्युम्नानें प्रतिज्ञा केली, "आज मी द्रोणास सोडीन तर माझें इष्टापूर्ताचें, क्षात्राचें आणि ब्राह्मण्याचें सर्व पुण्य नष्ट होवो." अशी प्रतिज्ञा सर्व क्षत्रियांसमक्ष करून धृष्टद्युम्न द्रोणा-वर उठला. इतक्यांत सूर्य क्षितिजावर आल्यानें सर्व क्षत्रियांनीं जागच्याजागीं युद्ध थांबवून संध्यागत आदित्याचें उपस्थान केलें आणि नंतर पुन्हां प्राणां-तिक युद्ध सुरू केलें.

मरेन किंवा मारीन अशा निश्चयानें युद्ध करणाऱ्या द्रोणाचा प्रतिरोध कसा करावा याची पांडवपक्षास मोठी चिंता पडली. पांडवांच्या उजव्या पक्षावर द्रोणानें असा भयंकर मारा चालविला कीं, हा पक्ष समूळ नाहींसा होतो कीं काय असें त्यास वाटूं लागलें. ज्या पक्षास मदतीची आवश्यकता असेल तेथें अर्जुनाचा रथ श्रीकृष्णानें न्यावयाचाच; परंतु द्रोणापुढें अर्जुनाचें कांहीं चालेना. तोही मागें झाला. अस्त्र न जाणणारावरही अस्त्रें सोडण्याचा सपाटा द्रोणानें चालविल्यानें, पांचाळसैन्य बहुतेक नाहींसें झालें, व धृष्ट-द्युम्नाची प्रतिज्ञा व्यर्थ जाण्याची वेळ आली. अशा स्थितींत श्रीकृष्णानें कूटयुद्ध करण्याची सल्ला दिली. " धर्मयुद्ध सोडून कूटयुद्ध केल्याशिवाय हा द्रोण आटोपणार नाहीं. याचा हात ढिला पडण्यास एक युक्ति आहे. अश्व-त्थामा डाव्या पक्षाकडे लढत आहे; तो मेला अशी हूल उठवा, म्हणजे हा म्हातारा पुत्रशोकानें हतवीर्य होईल. " ही श्रीकृष्णाची सल्ला बहुतेकांस पसंत पडली. अर्जुनास मात्र तें म्हणणें रुचलें नाहीं. पण युधिष्ठिरानें प्रसंग कठीण आहे हें पाहून मोठ्या कष्टानें रुकार दिला. तेव्हां मालवाचा राजा इंद्रवर्मा याचा एक अश्वत्थामा नांवाचा बलाढ्य हत्ती पांडवांकडेसच होता तो भीमानें गदेनें ठार मारिला, आणि अश्वत्थामा मेला, अशी हूल उठ-विली. चोहींकडे अश्वत्थामा मेला अशी आवई चालली; तेव्हां द्रोणाच्या कानावरही ती जाऊन त्यानें शस्त्र थांबविलें, व युधिष्ठिराचा रथ समोर पाहून त्याजकडे चौकशीसाठीं घोड्यावरचा स्वार पाठविला. धर्मास खोटें बोलण्याचें संकट पडलेलें पाहून श्रीकृष्ण दुःखानें म्हणाला, "धर्मा, मध्यान्हपावेतों द्रोण असाच युध्द करीत राहील तर पांडवपांचालांची सर्व सेना नष्ट होईल;तर तूं या वेळीं आमच्याकडे पहा. धर्मा, पांच प्रसंगीं सत्याहूनही असत्य जास्त आदरणीय असतें. सर्वस्वनाशाच्या वेळीं, विवाहाच्या वेळीं, रतिप्रसंगीं, गाईसाठीं किंवा ब्राह्मणासाठीं अनृत बोललें तर पातक नव्हे." हें गोविंदाचें वचन ऐकून एकीकडे जयाच्या आशेनें तर दुसरीकडे अनृताच्या भीतीनें ओढाताण होणारा धर्म पुढें होऊन म्हणाला, " बाबा, अश्वत्थामा मेला मग हत्ती कीं मनुष्य तें कळलें नाहीं. " धर्मानें आजवर अनृत भाषण केलें नव्हतें; यामुळें त्याचा रथ जमिनीला स्पर्श न करितां अधांतरीं चालत असे. हे शब्द त्याच्या मुखांतून निघतांच त्याचा रथ जमिनीला टेंकला.

द्रोणास स्वाराकडून धर्माचा जबाब ऐकून आश्चर्य वाटलें. त्याचा हात चालेनासा झाला. अगोदरच चार दिवसांचा थकवा, त्यांत पुत्राबद्दल ही वाईट बातमी ऐकिली, यामुळें त्यास अस्त्रेंही आठवेनाशीं झालीं. धृष्टद्युम्नावर तो बाण टाकीत होता, ते बाण निघेनासे झाले. तेव्हां द्रोणानें धनुष्य खालीं ठेवून क्षणभर समाधि लावली. तो अवसर पाहून धृष्टद्युम्नानें रथाखालीं उडी टाकून धांवत जाऊन द्रोणाच्या रथावर चढून ध्यानस्थ असलेल्या द्रोणाचे केस धरून चोहों बाजूंनीं लोक हां-हां-हां म्हणत असतां तलवारीनें त्याचें मस्तक उडविलें. द्रोणाचा शेवट झाला!

श्रीकृष्णानें दिलेली ही सल्ला वाजवी किंवा गैरवाजवी असा प्रश्न येथें उपस्थित होतो. हें धर्मयुद्ध नव्हे असें त्यानेंही म्हटलें. धर्माचा रथ अधांतरीं चालत होता तो या वेळीं पृथ्वीला टेंकला हें व्यासानें केलेलें कवित्वाचें वर्णनही हेंच सिद्ध करतें कीं, धर्मानें केली ती गोष्ट चांगली नव्हे. किंबहुना रामाला जसा वालिवधाचा अक्षय्य कलंक लागला, तसा युधिष्ठिराला हा कलंक लागला असेंही त्यानें पुढें वर्णन केलें आहे. परंतु व्यवहार किंवा राजनीति यांच्या दृष्टीनें जें धर्मानें केलें तें प्रशस्त नाहीं, तरी पण क्षम्य आहे. 'Every thing is fair in love and war;' असा पाश्चात्यांचाही सिद्धांत आहे. जे पांच प्रसंग श्रीकृष्णानें असत्य आदरण्याचें सांगितलें त्यांव्यतिरिक्त असत्य आदरणें निंद्य होय, ही मर्यादा मात्र लक्षांत ठेविली पाहिजे. जावई किंवा बायको रुसली असतां खोटें बोलून राजी करावें या मतास कोणी हरकत घेणार नाहीं; गोब्राह्मणांचा जीव बचावण्याकरितां म्हणजे केवळ परार्थ खोटें बोलणें नीतिदृष्ट्या योग्य दिसतें, आणि सर्वस्व नाश होण्याच्या प्रसंगीं खोटें बोलणें व्यवहारदृष्टया क्षम्य आहे. पीटर धि ग्रेटनें अशा एका प्रसंगीं तुर्कांस शरण जाऊन जीव वांचाविला; आणि पुन्हां सैन्य जमवून वचन मोडून युद्ध सुरू केलें. अधर्मानें आपल्यावर चाल करून आपला सर्वस्व घात करणाऱ्याचा असा प्रतिरोध करणें मनुष्याच्या सदसद्विवेकबुद्धीस क्षम्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. चोर आपल्यास लुटीत असतां खोटें बोलणें कोणासही पाप वाटणार नाहीं, किंवा शत्रूनें आपल्यावर शस्त्र चालविलें असतां मेल्याचा बहाणा करून एकदम शत्रूवर तुटून पडणेंही पाप नाहीं, हें उघड आहे. या वेळेस द्रोण स्वतः

धर्मयुद्ध सोडून अधर्मानें पांडवांच्या सैन्यावर अस्त्रांचा प्रयोग करीत होता, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अशा स्थितीत अधर्माचा प्रतिकार अधर्मानें करणें निंद्य नव्हे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हीच गोष्ट व्यासानेंही पुढील वादविवादावरून खुबीनें दाखविली आहे.

धृष्टद्युम्नानें द्रोणाचे केस धरून त्याचें डोकें उडवून सिंहनाद करीत रणांगणांत उडी टाकलेली पाहून द्रोणाचें सैन्य पळूं लागलें. शल्य त्याच बाजूला लढत होता, तोही भयानें या वेळीं मागें निघाला. शकुनीनेंही भयानें पाय काढला. मध्यावर कर्णदुर्योधन लढत होते, तेही ती बातमी ऐकून भयानें परत फिरले. डाव्या पक्षाकडे अश्वत्थामा लढत होता, तेथेंही पळापळी सुरू झाली, तेव्हां अश्वत्थाम्यास आश्चर्य वाटलें. त्यानें दुर्योधनास गांठलें व आहे तरी काय असें त्यास विचारिलें, तेव्हां त्यास सर्व हकीकत कळली. ती ऐकून त्याच्या पायांची आग मस्तकास गेली. "धर्मानें अधर्मानें माझ्या पित्यास मारवलें काय ? मी जिवंत असतां माझ्या पित्याची त्या क्षुद्र धृष्टद्युम्नानें शेंडी धरली ! रणांत जयापजय ईश्वराधीन आहेत. पण शस्त्र ठेवल्यावर असा अयशस्कर मृत्यु येणें म्हणजे महद् दुर्भाग्य होय. तुम्ही भिऊं नका. अर्जुनाला, वासुदेवाला सुद्धां येत नाहीं असें अस्त्र मजजवळ आहे. मी धर्माचा धृष्टद्युम्नासह आज नाश करतों." असें म्हणत अश्वत्थामा पुढें झाला. तेव्हां सर्व कौरवसैन्य जयाच्या आशेनें त्वेषानें पुन्हां परतलें. प्रतिपक्षाकडे आनंदानें फुंकलेल्या शंखाचें स्फुरण ऐकूं येऊं लागलें, तेव्हां पांडवांकडील लोकांस नवल वाटलें. कौरवांचें पळत सुटलेलें सैन्य कोण उलट फिरवीत आहे असा युधिष्ठिराचा प्रश्न ऐकून धृष्टद्युम्नाच्या निंद्य कृतीनें संतप्त झालेला अर्जुन म्हणाला, "हा द्रोणाचा पुत्र अश्वत्थामा तुमच्यावर येत आहे. ज्यांच्या जन्मोत्सवात द्रोणानें हजारों गाई दिल्या, ज्यानें जन्मल्याबरोबर अश्वासारखा आवाज काढून सर्व त्रैलोक्यास कंपित केलें, आणि ज्यास पुत्रप्रेमानें द्रोणानें सर्व अस्त्रें शिकविलीं, तो अश्वत्थामा आपल्या बापाची तुम्हीं केलेली दुर्दशा ऐकून गर्जना करीत तुम्हांवर येत आहे. तुम्हीं धर्माचें पांघरूण घेऊन अधर्मानें द्रोणास फसविलें; आणि या धृष्टद्युम्नानें त्या माझ्या न्यस्तशस्त्र गुरूचा नृशंसाप्रमाणें गळा कांपला ! तर आतां त्यास अश्वत्थाम्यापासून वांचाविणें तुम्हांला शक्य असेल तर

वांचवा. अरेरे, या माझ्या वृद्ध गुरूचा राजलोभानें मीं असा घात केला! यापेक्षां मीच मेलों असतों तर बरें झालें असतें!" असें म्हणत असतां अर्जुनाच्या डोळ्यांतून टिपें पडूं लागलीं. हे अर्जुनाचे उद्गार ऐकून सर्व मंडळी क्षणभर स्तब्ध झाली. कोणीच प्रिय किंवा अप्रिय कांहीं बोलेना. शेवटीं भीम संतप्त होऊन म्हणाला, "अर्जुना, तुझी ही धर्मशीलता प्रशंसनीय आहे. तेरा वर्षें भोगलेलें दुःख गिळूनही तूं धर्माचीच कास धरीत आहेत, हें पाहून कोण तुझी प्रशंसा करणार नाहीं? पण ज्या वेळीं शत्रूनें अधर्मानें आमचें राज्य हरण केलें, आमची सती भार्या सभेंत खेंचून आणली आणि लंगोटी नेसवून आम्हांस वनांत पाठविलें, त्या वेळीं मला जें दुःख झालें नाहीं तें या वेळीं तुझी धर्मपरता पाहून होत आहे. शत्रूचा सर्व अधर्म सहन करून तूं आपला धर्मच कायम ठेवतो आहेस हें पाहून माझें हृदय फाटत आहे. आणि जो अश्वत्थामा तुझ्या षोडशांश्याही बरोबर नाहीं त्याच्या पराक्रमाची तारीफ या वासुदेवासमोर करतोस तेव्हां आश्चर्य आहे. अश्वत्थाम्याची एवढी भीति कशाला घालतोस? मी त्याचा या गदेनें समाचार घेतों." भीमाचें, हें आवेशाचें भाषण ऐकून धृष्टद्युम्नासही बोलण्याचें अवसान आलें, आणि तो म्हणाला, "अर्जुना, द्रोणानें आमच्या सर्व सैन्याचा अधर्मानें फडशा केला; अस्त्र न जाणणाऱ्यांस अस्त्रानें ठार केलें, त्याजबद्दल तूं कांहींच बोलत नाहींस आणि मीं या दुष्ट ब्राह्मणाचें क्रोधाच्या आवेशांत डोकें उडविलें, या अधर्माबद्दल तेवढें अकांडतांडव करतोस? हत्ती जसा नम्र होऊन माहुतास डोकीवर चढूं देतो, त्याप्रमाणें द्रौपदीसाठीं मीं संबंधामुळें अवनत होऊन हें तुझें तीव्र भाषण शिरसा धारण केलें आहे; नाहींतर याचा मीं केव्हांच वचपा काढला असता." धृष्टद्युम्नाचें हें गर्विष्ठपणाचें भाषण ऐकून अर्जुनाचा गुरुबंधु सात्यकि संतापानें म्हणाला, "अरे, असा कोणी वीर येथें नाहीं काय कीं जो या महापापी नराधमाला असलें अभद्र भाषण करण्याबद्दल देहान्त प्रायश्चित्त देऊं शकेल? ध्यानस्थ, न्यस्तशस्त्र सद्गुरूची तुझ्यावांचून कोण नराधम शेंडी धरील व सर्व लोकांत असलें निंद्य कर्म करून पुन्हां सभेमध्यें निर्लज्जासारखा कोण वल्गना करील? पुन्हां असलें भाषण करशील तर या गदेनें तुझ्या मस्तकाचे तुकडे करून टाकीन समजलास!"

धृष्टद्युम्नानें लागलेंच उत्तर केलें,"मी ऐकून घेतों म्हणून तुम्ही अधिकच बोलतां. क्षमा करणें प्रशंसनीय खरें;पण पाप्याला क्षमा करणें योग्य नाहीं.कारण पापी मनुष्य क्षमा करणाऱ्याला मीं जिंकलें असें समजतों. तूं स्वतः इतका पापी आहेस कीं, दुसऱ्यांचीं छिद्रें काढण्याचा तुला अधिकार नाहीं. प्रायोपवेशन करून बसलेल्या भूरिश्रवाचे तूं परवांच अधर्मानें प्राण घेतलेस. तुझ्यासारख्या पाप्याला माझ्या अधर्माबद्दल कठोरपणानें बोलतांना लाज वाटली पाहिजे. गप्प बस;नाहीं तर द्रोणाप्रमाणें तुझेंही डोकें उडवून देईन.''तें ऐकून क्रोधानें लाल झालेला सात्यकि उत्तर देण्याच्या भानगडींत न पडतां गदा उगारून धृष्टद्युम्नावर धांवला. श्रीकृष्णानें भीमास तात्काळ मध्यें पडल्याची सूचना केली, म्हणून हें भांडण तेथेंच थांबलें. आणि भीमानें रथावरून उडी टाकून सात्यकीस कवाट्यांत धरून मागें फिरविलें.

पांडवांकडील वीरांचें असें भांडण चाललें आहे तों अश्वत्थाम्यानें पांडवांच्या सैन्यावर नारायणास्त्राचा प्रयोग केला. त्या अस्त्रामुळें सर्व अंतरिक्ष शस्त्रांनीं व्याप्त झालें. हजारों बाण, मुसल, पट्टिश शतघ्नी पांडवांच्या सैन्यावर पडूं लागल्या. प्रतिकार करणारे पांडवांकडील वीर मरून पडूं लागले. अर्जुन अजूनही मध्यस्थ राहून धनुष्य उचलीना असें पाहून धर्मास फार वाईट वाटलें. तो ओरडून म्हणाला, " धृष्टद्युम्ना, तूं रण सोडून स्वदेशीं जा. सात्यकि, तूंही द्वारकेला जा. अहो सर्व राजेहो, तुम्हीही रण सोडून जा, आणि आपले प्राण वांचवा. वासुदेवही आपल्या कल्याणाचा मार्ग स्वीकारील. सर्व जगताचें कल्याण जो करतो त्यास मला कांहीं सांगण्याची जरूरी नाहीं. मीं आपल्या बंधूंसह येथेंच राहून मरून जातों. भीष्मद्रोणांसारखे समुद्र तरून या अश्वत्थाम्याच्या तळ्यांत मी आज बुडून जातों. मीं फार पातक केलें आहे. ज्यानें बाल अभिमन्यु सहा वीरांकडून विरथ करून मारविला; ज्यानें सभेंत ओढलेल्या दुःखित द्रौपदीच्या प्रश्नाचा जबाब दिला नाहीं; ज्यानें ब्रह्मास्त्रानें ही पांचालसेना बहुतेक निःशेष केली त्या द्रोणाला मीं मारविलें या पातकाबद्दल मी येथेंच रणांगणावर देह ठेवतों. '' हें धर्माचें निराशेचें भाषण ऐकून भीम संतापानें गदा घेऊन अश्वत्थाम्यावर निघाला. तेव्हां श्रीकृष्णानें मोठ्यानें म्हटलें," अहो सर्व राजेहो, सर्व वीरहो, ह्या नारायणास्त्राला नमस्कार करा. याचा प्रतिकार करूं नका. प्रतिकार कराल तर

मराल." भीम वासुदेवाचेंही ऐकेना,तेव्हां अर्जुन ओरडून म्हणाला,"भीमा! भीमा! नारायणास्त्रासमोर, ब्राह्मणासमोर व गाईसमोर मी गांडीव खालीं ठेवतों. बाबा, लढूं नको." तें ऐकून सर्व लोकांनीं शस्त्रें खालीं ठेवून नारायणास्त्रास नमस्कार केला, तेव्हां तें अस्त्र आपोआप शमलें आणि अंतरिक्ष थोड्या वेळानें शांत झालें. अश्वत्थाम्यास तें पाहून अत्यंत राग आला; त्यानें आग्नेय अस्त्र पांडवसेनेवर टाकलें तेव्हां पांडवांचें सबंध सैन्य अग्नीच्या प्रचंड ज्वाळेंत गुरफटून गेलें. चोहोंकडे अग्निज्वालांशिवाय कांहीं दिसेनासें झालें. पण अर्जुनानें ब्रह्मास्त्राचा त्यांजवर प्रयोग केला तेव्हां तेंही अस्त्र शांत झालें. हजारों लोक पांडवांकडील जळून गेले, पण श्रीकृष्ण व अर्जुन आपल्या रथावर सुरक्षित आहेत हें पाहून, "धिक्कार धिक्कार," "असत्य असत्य" असें म्हणत अश्वत्थामा रथाखालीं उडी टाकून दुःखानें निःश्वास टाकीत रणांगण सोडून चालता झाला.

ते दिवशीं दोन प्रहरींच दोन्ही सैन्यें रणांतून परतलीं. दोहोंकडे दुःखाचा पूर्ण अम्मल बसला होता. धृष्टद्युम्नाच्या नीच कृतीनें, आपसांतील तंट्यानें व अग्न्यस्त्रामुळें झालेल्या क्षयानें पांडव त्रस्त होते, तर तिकडे याहूनही भयंकर हानि झाल्यानें, द्रोणाच्या मरणानें व अश्वत्थाम्याच्या निराशेनें कौरव ग्रस्त झाले होते. राहिलेला अर्धा दिवस व सबंध रात्र दोन्ही सैन्यांनीं दुःखांत घालविली. दुसरे दिवशीं नित्याप्रमाणें स्नान करून अग्नि व सूर्य यांची उपासना करून कौरवांकडील क्षत्रिय रणांगणावर आले. कर्ण पांडवांस अजूनही मारील असा दुर्योधनास भरंवसा होता. किंबहुना आजपर्यंत त्याच्याच भरंवशावर त्यानें पांडवांशीं उग्र वैर चालविलें होतें. "शार्ङ्ग व गांडीव धनुष्यें धारण करणाऱ्या त्या दोघां कृष्णांचा पराभव आजपर्यंत कोणीं केला नाहीं; पण मी त्या दोघांसही एका रथावरून ठार करून खालीं पाडतों. तूं भितोस कां ?" अशी कर्णाची वल्गना दुर्योधनाच्या कानांत नेहमीं दुमदुमत असे. चिरसंभृत आशा आज फलोन्मुख होणार अशा कल्पनेनें दुर्योधनानें कर्णास सेनापति केलें. सुवर्ण–कुंभांतून व गव्याच्या शिंगांतून पडणाऱ्या गंगाजलानें सर्व राजांनीं कर्णास सेनापत्याचा विधियुक्त अभिषेक केला, तेव्हां नेहमींप्रमाणें कर्णानें "राजा, तूं स्थिर हो; आज पांडव जित झाले असेंच समज" असा आश्वासनपर गर्वाचा उद्गार काढला. तों

ऐकून सर्व सेनापतींनीं आनंदानें शंख फुंकले. मग शुभ्र पताका लावलेल्या बगळ्यासारखे शुभ्र वर्णाचे घोडे जोडलेल्या व अनेक शस्त्र, धनुष्यें, बाण इत्यादि आयुधांनीं भरलेल्या रथांत बसून शंख फुंकीत इकडून तिकडे धांवत कर्णानें आपल्या सैन्याचा मकरव्यूह रचला; आणि पांडवांवर चाल केली. पांडवांचें सैन्यही तयार होतेंच. त्या दिवशीं पुन्हां पिशाच्च, कोल्हे, लांडगे यांस आनंद देणारें युद्ध सुरू झालें. हत्ती, रथ, अश्व यांजवरून हजारों वीर, क्षीणपुण्य स्वर्गांतून पडतात तसे खालीं पडूं लागले. पद्माप्रमाणे कांतिमान् व सुगंधयुक्त अशा क्षत्रियांच्या मुखांनीं पृथ्वी आस्तीर्ण झाली. रथी, पायदळ, घोडेस्वार, हत्तींवरचे वीर या सर्वांना सारखा मार देत कर्ण क्षणांत येथें तर क्षणांत तेथें असा सर्व रणमैदानभर विद्युत्तेजाप्रमाणें चमकत धांवत होता. कांहीं वेळ त्याचें व अर्जुनाचें द्वैरथ म्हणजे रथावरचें द्वंद्वयुद्धही झालें. पण कोणी कोणास हार गेला नाहीं. याप्रमाणें दिवसभर युद्ध चालून दोन्ही सैन्यें शेवटीं हार न खातां, रात्रि-युद्ध किती भयंकर आहे याचा अनुभव असल्यानें संध्याकाळीं आपआपल्या शिबिरास परतलीं.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सैन्यें पुन्हां रणांगणावर आलीं, तेव्हां कर्णानें दुर्योधनास म्हटलें, " आज मी अर्जुनास खाचित मारतों. धनुर्विद्येंत, लाघव, लक्ष्यभेद, दूरपातन आणि सौष्ठव यांत अर्जुन माझी बरोबरी करूं शकत नाहीं; प्राण, शौर्य, विक्रम आणि विज्ञान यांतही तो माझ्या बरोबरचा नाहीं. सर्व धनुष्याचे सरदारच असें हें विजय धनुष्य इंद्राकरितां उत्पन्न केलेलें परशुरामानें मला दिलें आहे; तें मी आज युद्धाकरितां आणिलें आहे, याची बरोबरी गांडीव करूं शकत नाहीं. पण माझी एक न्यूनता आहे, ती मी तुला सांगतों. अर्जुनाचा जसा गोविंद सारथि आहे तसा मला नाहीं. वासुदेव अश्वाचें हृदय उत्तम जाणतो, आणि तो क्षणोक्षणीं अर्जुनास विषमांतून वांचवतो. जर हा शल्य माझा सारथि होईल तर मग माझी बरोबरी अर्जुन कशांतही करणार नाहीं. हा शल्यही सारथ्यात व अश्वहृदयाच्या ज्ञानांत अप्रतिम आहे. यासाठीं शल्यास तूं माझ्याकरितां विनंति कर आणि त्याजकडून माझें सारथ्य करीव. " दुर्योधनानें तात्काळ जाऊन शल्याची विनंति केली. त्यानें प्रथम दुर्योधनास झिटकारिलें. " मी मूर्धाभिषिक्त राजा, मी स्वतः पराक्रमी, मी अनेक महायज्ञ करणारा, मी त्या सूतपुत्राचें सारथ्य

करूं ? दुर्योधना, तूं माझा अपमान करतोस, " असें शल्यानें प्रथम रागानें म्हटलें; पण शेवटीं कार्याचें महत्त्व जाणून व मी वाटेल तें बोलेन, कर्णाचा अंकित राहणार नाहीं. अशा अटीवर त्यानें दुर्योधनासाठीं कर्णाचें सारथ्य कबूल केलें. याप्रमाणें सज्ज होऊन कर्ण निघाला तेव्हां नेहमीं-प्रमाणें वल्गना करूं लागला. ' अरे, अर्जुनाचा रथ कोठें आहे, मला दाखवा, मी तुम्हांस हें देतों ते देतों, ' असे तो बडबडूं लागला. तेव्हां " बाबा, अर्जुन आतां दिसेल, त्याला बक्षीस कशाला पाहिजे ? वृथापुष्ट काकासारखा बडबड करूं नकोस. " अशी शल्यानें कर्णाची हेटाळणी केली. तेव्हां त्या दोघांचें वाग्युद्ध जुंपलें. व त्यांनीं परस्परांची मनसोक्त निंदा केली. पण शेवटीं " हा पहा, अर्जुनाचा रथ दिसतो, सांभाळ आतां ! ' असें म्हणत शल्यानें अर्जुनाच्या रथावर कर्णाचा रथ चालविला. तिकडे श्रीकृष्णानें कर्णाचा रथ आपल्या रथावर येत आहे, हें पाहून अर्जुनाचें उत्साहबल वाढविण्याच्या हेतूनें म्हटलें, " अर्जुना, हा कर्ण तुझ्यावर आपण होऊन येत आहे, यास तूं आज सोडूं नको. हा मोठा योद्धा आहे हें खरें आहे. तुझ्या बरोबरीचा, किंबहुना तुझ्याहून जास्त हा वीर आहे. आठ वितीं उंच, महाबाहूंचा मजबूत छातीचा व दिसण्यांत स्वरूप असा हा वीर अस्त्रें शिकलेला आहे; चित्रयुद्ध खेळ-णारा आहे; आणि कसलेला आहे. याला तूं कमी समजून गाफिल राहूं नको. ह्यास तूं आपल्या पूर्ण सामर्थ्यानें आज ठार कर. हा गर्विष्ठ अस-ल्यानें तुझ्या कचाट्यांत खाचित सांपडेल. या दुष्टानें आजपर्यंत दुर्योधनास वाईट मसलती देऊन हें भयंकर वैर चालविलें आहे. याच्या साह्यानें तुम्हांस त्यानें जतुगृहांत जाळलें. अभिमन्यूला सहा रथींनीं वेष्टून ठार केलें त्यांत हा प्रमुख होता. द्रौपदीला सभेंत आणून, " द्रौपदी, पांडव अस्तास गेले, तर आतां आपलें सौंदर्य फुकट घालवूं नको. दुसरे नवरे कर ! " असें हा नीच बोलला. मी शम करण्यासाठीं हास्तिनापुरास गेलों तेव्हां यानें मला कैद करण्याची युक्ति दुर्योधनास सुचविली. अर्जुनास व वासुदेवास जिंकुन मी त्यांस ठार करीन अशी हा दुर्योधनाशी नेहमीं वल्गना करीत असतो; तर तुझ्या तीक्ष्ण बाणांनीं उडवलेलें याचें शिर हाहाःकार करणाऱ्या कौरवांच्या आज तूं दृष्टीस पाड, आणि दुर्योधनाच्या

राज्य मिळविण्याच्या आशा आज समूळ उपटून टाक. " हें श्रीकृष्णाचें उत्साहजनक भाषण ऐकून अर्जुनाची धागधुगी नाहींशी झाली; त्यास अतिशय त्वेष आला व त्यानें आपल्या गांडीव धनुष्याच्या दोरीचा टणत्कार केला. थोड्याच वेळांत दोन्ही रथ समोरासमोर येऊन कर्णार्जुनांचें द्वैरथ युद्ध सुरू झालें.

सैन्याच्या दुसऱ्या भागांत भीमदुःशासनाचें भयंकर युद्ध होऊन भीमानें दुःशासनास ठार मारून त्याचे कंठांतील रक्त आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें याच वेळीं प्राशन केलें. ती हकीकत ऐकून कर्ण केवळ चवताळून अर्जुनावर धांवला. कर्ण त्वेषानें अर्जुनावर चालला आहे हें पाहून कौरवांकडील वीर आनंदानें दंड थोपटूं लागले व वस्त्रें उडवूं लागले. आज अर्जुन खचित मरतो, असें वाटून त्यांनीं रणभेरी ठोकल्या. पांडवांकडील लोकांनींही अर्जुनाच्या प्रोत्साहनासाठीं तूर्य व शंख वाजविले. दोन्हीकडील वीर तटस्थ होऊन कर्णार्जुनांचें रणद्यूत पाहूं लागले. आकाशांत देव, दानव, गंधर्व, पिशाच व राक्षसही तें युद्ध पाहण्यास तयार झाले. देव, गंधर्व, उरग अर्जुनाकडे झाले. दानव, राक्षस, पिशाच कर्णाकडे झाले. " मला अर्जुनानें मारलें तर तूं काय करशील ? " असें कर्णानें शल्यास विचारलें, तेव्हां माधव-पांडवांस दोघांसही मी ठार करीन, असें त्यानें उत्साहवर्धक उत्तर दिलें. इकडे गोविंदानेंही अर्जुनास कर्ण-शल्यास मी मारीन असेंच सांगितलें. याप्रमाणें रथीसारथ्यांचीं भाषणें होऊन युद्धास सुरवात झाली, तेव्हां दोन्ही वीरांनीं परस्परांस शेंकडों बाणांनीं ताडन केलें. पण दोघांचींही चिलखतें मजबूत असल्यानें त्यांत बाणांचा प्रवेश झाला नाहीं. कृष्णशल्यांवरही बाण पडले; पण त्यांचींही कवचें मजबूत होतीं. याप्रमाणें कित्येक तासपर्यंत त्यांचें युद्ध चाललें. त्यांनीं परस्परांवर अनेक अस्त्रेंही टाकिलीं; त्यांचा परस्परांनीं प्रत्यस्त्रानें प्रतिकार केला. दोघेही ब्रह्मास्त्र जाणणारे होते. यामुळें कोणाचाच विशेष होईना. कर्णानें शेवटीं एक सर्पमुख बाण त्याजवळ होता तो काढला. हा बाण अर्जुनाचा कंठनाळच छेदील अशा वल्गनेनें कर्णानें तो त्वेषानें सोडला; पण नेम थोडक्यांत चुकून तो त्याच्या मुकुटावर लागला आणि मुकुट छिन्नभिन्न होऊन खालीं पडला. अर्जुनानें आपल्या डोक्यास उत्तरीय

बांधले आणि युद्ध चालू केलें. कधीं कर्ण अधिक तर कधीं अर्जुन अधिक, असें होतां होतां शेवटीं दुर्दैवानें कर्णाच्या रथाचें डावीकडचें चाक एका भेगेंत खोल गेलें; आणि रथ अडकून कलता झाला. इतक्यांत कर्णास अस्त्रेंही आठवेनाशीं झालीं. अशी अनर्थपरंपरा ओढवलेली पाहून कर्णास मोठा संताप आला. रागानें रथाखालीं उडी टाकून तो रथाचें चाक वर उचलूं लागला, पण अर्जुनाचे बाण त्यास हात पुढें करूं देईनात तेव्हां तो विव्हल होऊन, ओरडून म्हणाला, " अर्जुना, मी या वेळेस शस्त्र ठेविलें आहे; आणि युद्ध न करतां हें रथाचें चाक वर उचलून घेत आहें, तोंपर्यंत कृपा करून तूं थांब. तूं रणकर्मांत प्रख्यात आहेस. शरणागत, न्यस्तशस्त्र, याचमान व भ्रष्टकवच अशांवर शूर साधुव्रत वीर बाण टाकीत नाहींत, तर धर्माला अनुसरून युद्ध कर आणि मी हें चाक वर उचलतों तोंपर्यंत बाण टाकूं नकोस. " त्या वेळेस श्रीकृष्णानें उत्तर केलें, " कर्णा, या वेळीं तुला धर्म बरा आठवला ! नीच व्यसनांत पडले म्हणजे मग धर्माची आठवण करतात. बाबा, एकवस्त्रा द्रौपदीला सभेंत दुःशासनाकडून खेंचीत तूं आणवलीस, त्या वेळेस तुला धर्म आठवला नाहीं ! शकुनीकडून कपट–फांसे टाकवून धर्मास वनवासास पाठविलेंस, तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता ? अभिमन्यूला सहा वीरांनीं वेढून तुम्हीं मारलेंत तेव्हां तुझा धर्म कोठें लपला होता ? आतां धर्म धर्म म्हणून घसा कोरडा करण्यांत काय अर्थ आहे ? " हें ऐकून कर्णानें लज्जेनें तोंड खालीं घातलें, कांहीं एक उत्तर केलें नाहीं. त्वेषानें व रागानें ओंठ फुर-फुरत तो कलत्या रथावरच चढला; आणि धनुष्यबाण घेऊन लढूं लागला. ब्रह्मास्त्रानें बाणांचा वर्षाव करून पुन्हां उडी टाकून तो रथाचें चाक उचलूं लागला. इतक्यांत अर्जुनानें ब्रह्मास्त्राचा ब्रह्मास्त्रानेंच प्रतिघात करून एका अति तीक्ष्ण बाणानें कर्णाचें शिर उडविलें. याप्रमाणें दोघांचें तें भयंकर युद्ध अपराण्हाच्या वेळीं समाप्त झालें, आणि कर्ण रथाचें चाक उचलीत असतां मारला जाऊन धाडकन खालीं जमिनीवर पडला. छिन्नविच्छिन्न झालेल्या रथाला घेऊन मद्रराज कर्णाचें शव तेथेंच टाकून दुर्योधनाकडे गेला आणि अश्रु डोळ्यांत आणून म्हणाला, " बा दुर्योधना, आपलें दैव विपरीत आहे; तें आपल्यास टार मारीत आहे, आणि पांडवांस तारीत

आहे. कर्णानें भयंकर युद्ध केलें, पण शेवटीं पृथ्वीनें चाक गिळल्यामुळें तो मारला गेला. शौर्य, बल, तेज इत्यादि गुणांनीं अप्रतिम असे तुझ्या-कडचे वीर एकामागून एक पडत आहेत. तेव्हां दैव बलवत्तर आहे असेंच म्हटलें पाहिजे ! " अशा रीतीनें शल्यानें दुर्योधनाचें समाधान केलें; पण दुर्योधनास दुःखाचा उद्वेग येऊन तो ' हा कर्णा ! हा कर्णा ! ' असा अनिवार शोक करीत दुःखाचे सुस्कारे टाकीत मागें फिरला. इकडे पांडवांचा आनंद गगनांत मावेना.भीमानें दंड थोपटून नाचून गदा उसळीत आकाशपाताळ एक केलें. रक्तानें भरलेल्या कर्णाच्या शरीरास स्पर्श केल्यानेंच जणूं काय रक्तकिरण झालेला सूर्य अस्तास गेला ! तरी पण मेलेला कर्ण पाहाण्याच्या प्रबल इच्छेनें आनंदित झालेला युधिष्ठिर मशाली पेटवून रणांगणावर जेथें कर्ण पडला होता तेथें आला. युद्धांत पडलेल्या वीरास रणांगणांतच पडूं देऊन हिंस्र श्वापदांकडून खाववणें हाच त्यांचा अंत्यविधि; त्यांची क्रिया नाहीं, त्यांचें सुतक नाहीं; असा त्या वेळीं भारतीय आर्यांचा युद्धांतील विलक्षण कठोर सांप्रदाय होता. मशालींच्या उजेडांत कर्णाचें रणांगणावर अलग अलग पडलेलें धड व शिर पांडव पाहूं लागले. ठिकाठिकाणीं फुटलेलें त्याचें तनुत्राण रक्तानें भरलें होतें, तरी त्याच्या देहावर व मुखावर अतिशय कांति चमकत होती. त्यास खरोखर मेलेला पाहून युधिष्ठिरास इतका आनंद व इतकें समाधान झालें कीं, त्यानें श्रीकृष्णास आलिंगन देऊन म्हटलें, " गोविंदा ! आज तुझ्या कृपेनें मी राजा झालों. माझ्या बंधूंसह आज मला पृथ्वीचें राज्य मिळालें. जनार्दना, तुझ्या साहाय्यानेंच अर्जुनानें हा अप्रतिम वीर मारला;तुझ्या प्रसा-दानें आम्हांस सर्व गोष्टी प्राप्त होतील. आज मला रात्रीं गाढ झोंप येईल." असें म्हणत कर्णाचें शव तसेंच तेथें टाकून पांडवांकडील वीर श्रीकृष्णासह आपल्या शिबिरास परत आले.

शोकानें, भीतीनें व वैराग्यानें कौरवांकडील वीर जे मागें फिरले ते कित्येक कोस जाऊन हिमालयाच्या पायथ्यापाशीं सरस्वतीतीरावर पोंचून तिच्या पुण्यजलाचें स्नान व पान करून शांतचित्त झाले. ह्या वेळीं कृपानें आपल्या पक्षाचें दुर्दैव व दैन्य पाहून दुर्योधनास पांडवांशीं सल्ला करण्या-विषयीं आग्रह केला. " आतां लढणें केवळ कुत्र्याच्या मरणानें प्राण देणें

आहे; धृतराष्ट्राच्या मध्यस्थीनें युधिष्ठिर किंबहुना श्रीकृष्णही प्रसन्न होऊन तुला अर्धे राज्य देईल; तर तूं आपला व या हतशेष वीरांचा प्राण आतां व्यर्थ बळी देऊं नकोस." हें कृपाचें कळकळीचें व प्रेमाचें भाषण ऐकून दुर्योधन थोडा वेळ स्तब्ध राहून म्हणाला, "आचार्य, तुम्ही माझ्या प्रेमानें जें म्हणतां तें मीं ऐकिलें; पण सर्व राजांच्या शिरोभागीं चमकून मी आतां युधिष्ठिराची थुंकी झेलीत त्याच्या मागें चालूं! कृष्णाचा भयंकर अपराध करून त्याची मी आतां समजूत करूं! माझ्याकरिता हजारों वीर मारवून मी आतां आपला जीव वांचवूं! भीष्म, द्रोण, कर्ण, दुःशासन मेले; आतां हें राज्य नमून मिळावलें तरी तें काय सुखाचें! क्षत्रियानें घरांत अंथरुणावर हगत मुतत मरावें यासारखी दुर्गति नाहीं. त्यानें रणांत तरी देह ठेवावा किंवा अरण्यांत तरी ठेवावा. यासाठीं आतां मला पृथ्वीची इच्छा नाहीं. माझ्याकरितां जे लाखों वीर रणांगणांत देह ठेवून गेले, त्यांचें ऋण फेडून मीही रणांगणांत देह ठेवीन आणि स्वर्गास जाईन." हें दुर्योधनाचें तेजस्वितेचें व निर्वाणीचें भाषण ऐकून सर्व क्षत्रियांस स्फुरण चढलें, व त्यांनी "उत्तम" "उत्तम" असें म्हणत त्यास धन्यवाद दिला. पुन्हां युद्धाच्याच ईर्षेनें भरलेलें तें सैन्य त्या अमावास्येच्या काळोख्या रात्रीं आपल्या शिबिरास परत आलें आणि स्वस्थ मनानें झोपीं गेलें. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं नित्याप्रमाणें ते वीर स्नानादि कर्मे आटोपून व अग्निसूर्याची उपासना करून रणांगणावर आले. व त्यांनीं शल्यास आपला सेनापति नेमिलें. मग शल्यानें "संहत युद्ध करा, एकमेकाला सोडून द्वंद्व युद्ध करूं नका," अशी ताकीद देऊन कौरवसैन्यास सज्ज केलें. इकडे पांडवांचें सैन्यही सज्ज होतेंच. दोन्ही सैन्यांची पुन्हां थडक होऊन भयंकर युद्ध सुरू झालें. त्या दिवशींचें युद्ध म्हणजे केवळ शेवटच्या पानिपतच्या युद्धाची पूर्वावृत्तिच होय. पौष शुद्ध १ च्या दिवशींची कौरवपांडवांची ही लढाई मराठे—दुराणीच्या लढाईसारखीच झाली. कौरवांकडे ११००० रथ, १०७० हत्ती, व दोन लाख घोडेस्वार शिवाय पायदळ शिल्लक राहिलें होतें; व पांडवांकडे ६००० रथ, ६००० हत्ती व १०००० स्वार शिवाय पायदळ शिल्लक होतें. पण पांडवांकडे अर्जुन, भीम, सात्यकि व धृष्टद्युम्न असे बलाढ्य योद्धे व नेते होते; त्यामुळें शेवटीं त्यांचाच जय झाला. मध्यान्हाच्या सुमारास

विश्वासरावाप्रमाणें कौरवांचा सेनापति शल्य युधिष्ठिराच्या हातून मारला गेला; तेव्हां दुर्योधनानें भाऊसाहेबांप्रमाणें दांतनिकीस येऊन युद्धाच्या ऐन गर्दींत आपला रथ घातला. इकडे शकुनीनें आपल्या कंधारी घोडेस्वारानिशीं पांडवांच्या पिछाडीला जाऊन हल्ला केला. पण हा पुढून व मागून झालेला निकराचा हल्ला समोरून अर्जुनानें व मागून सहदेवानें तोडून टाकला. इकडे सहदेवानें शकुनि व त्याचा पुत्र उलूक यास ठार केलें तर तिकडे दुर्योधनाचा सारथि व घोडे ठार मारून अर्जुनाने त्याचा रथही छिन्नभिन्न केला; तेव्हां भाऊसाहेबांप्रमाणें पायदळ होऊन एकट्या गदेसह युद्धाच्या गर्दींत शिरून दुर्योधन दिसेनासा झाला. मुख्य मालक दिसेनासा झाला, तेव्हां कौरवांकडे जे भ्याड योद्धे होते ते पळत सुटले; अर्धे कच्चे होते ते दुर्योधनाची चौकशी करीत फिरूं लागले;जे कांहीं कट्टे मजबूत छातीचे होते ते, " दुर्योधनाची चौकशी न करतां, सध्यां पुढें पहा. " असें म्हणत पांडवांवर तुटून पडले. पण शेवटीं बहुतेक मारले जाऊन कौरवांकडील बाजू मोकळी दिसूं लागली. तीन वाजण्याच्या सुमारास दुर्योधन एकटाच रणांगणापासून बराच दूर पोंचून संजयाच्या हातीं धृतराष्ट्रास अखेरचा निरोप पाठवून एका ऱ्हदांत गुप्त झाला. इकडे अश्वत्थामा, कृप व कृतवर्मा हे तिघे वीर इकडे तिकडे फिरत होते; त्यांस संजयाची गांठ पडून दुर्योधनाची हकीकत कळली. तेव्हां ते त्या ऱ्हदाच्या कांठीं जाऊन दुर्योधनास बाहेर निघण्याविषयीं विनंती करूं लागले, " आम्ही अजून जिवंत आहों, अजून आपण पांडवांशीं लढूं. ' अशी त्यांची विनवणी ऐकून दुर्योधनानें पाण्यांतून उत्तर केलें, " तुमची राजनिष्ठा व धमक पाहून मी संतुष्ट आहें. पण मी या वेळीं थकलों आहें; उद्या आपण खचित लढूं. " हें त्यांचें संभाषण त्या तळ्यावर मासे मारीत असलेल्या धीवरांनीं ऐकिलें, व ते पांडवांकडील नोकर असल्यानें तात्काळ पांडवांस बातमी दिली. पांडव अत्यंत उत्सुकतेनें दुर्योधनाचा सर्व रणांगणभर तपास करीत फिरतच होते. ती बातमी ऐकून ते त्या तळ्याच्या कांठीं धांवतच आले; व दुर्योधनाची परोपरी निर्भर्त्सना करूं लागले. तेव्हां क्रोधाने लाल डोळे झालेला दुर्योधन त्वेषानें पाण्याच्या बाहेर आला; आणि गदा भिरकावीत, " मी युद्धास तयार आहें; पण मी एकटा, तुम्ही अनेक; मी पादचारी, तुम्ही

रथांत बसलेले; धर्मयुद्ध करील असाल तर मी एकेकाशीं गदायुद्ध करतों. ” असें म्हणाला. तें ऐकून युधिष्ठिर म्हणाला, “ दुर्योधना, एकटा आहेस तरी तूं भिऊं नकोस. आमच्यापैकीं कोणाएकाशीं युद्ध कर, आणि ही तुला आणखी सवलत देतों, तूं जिंकलास तर तूं राज्य कर. ” विजयानें उन्मत्त झालेल्या युधिष्ठिराचें हें द्यूतासारखें भाषणें ऐकून श्रीकृष्ण त्वेषाने व दुःखानें म्हणाला, “ काय, पांडू व कुंतीच्या संततीच्या कपाळीं वनवास कायमचा लिहिला आहे ! अरे धर्मा, एवढी प्राणहानि करून तुझ्या बंधूंनीं जो हा पराक्रम केला, तो तूं एका द्वंद्वयुद्धांत नाहींसा करून टाकणार, आणि पाहिजे त्याशीं त्याला युद्ध करूं देणार ! नशीब तुमचें, तुम्ही काय कराल !” हें ऐकून दुर्योधन गर्वानें म्हणाला, “ कृष्णा, मी ह्या गदेनें भीमाशीं लढतों; तों माझ्या बरोबरीचा आहे; मग तर कांहीं हरकत नाहीं ना ! ” भीमानेंही म्हटलें, “ गोविंदा, तूं भिऊं नको. ही माझी गदा दुर्योधनाच्या दिढी आहे. हिने त्याचा प्राण घेतल्याशिवाय मी रहात नाहीं. ” याप्रमाणें भाषणें होऊन भीम-दुर्योधनाचें गदायुद्ध ठरलें; आणि सर्व मंडळी मंडळ धरून युद्ध पाहण्याकरितां मिळाले तशा आसनावर बसली.

इतक्यांत सरस्वतीच्या यात्रेस गेलेला बलराम तेथें आला. त्यास पाहतांच सर्वांस मोठा आनंद झाला, व सर्वांनीं त्याचा सत्कार केला. भीम-दुर्योधनांनीं तर आपल्या गुरूचें पादवंदन केलें. ते दोघेही गदायुद्ध त्याजपाशींच शिकले होते. बलराम म्हणाला, “ कृष्णा, मला द्वारकेहून निघून आज बेचाळिसावा दिवस आहे. मी पुष्यनक्षत्रावर निघालों होतों. आज श्रवण आहे. *सरस्वतीतीरावर ब्राह्मणांनीं सांगितलें कीं, भीम-दुर्योधनांचें युद्ध जवळच होत आहे. म्हणून मुद्दाम वांकडा रस्ता करून मी येथें आलों. माझ्या समक्ष होऊं द्या हें युद्ध. ” असें बलरामानें म्हटलें, तेव्हां त्यास सर्वांनीं मुख्य स्थानावर बसविलें. मग ते दोघे वीर भरतखंडाचें साम्राज्य पणास लावलेलें आपलें प्राणांतिक गदायुद्ध खेळूं लागले. दोघांच्याही अंगांत मजबूत चिलखतें होतीं व डोक्यावर मजबूत मुकुट होते.

* यावरूनही दुर्योधनाच्या गदायुद्धाचा दिवस पौष शु० १ हाच ठरतो. या दिवसाचे आसपास श्रवण नक्षत्र नेहमीं जावयाचेंच.

दोघांच्याही अंगांत त्वेषानें व वैरानें वारें भरलें होतें; व डोळ्यांत क्रोधानें व आकसानें इंगळासारखी आग भरली होती. दुर्योधन शरीरानें हलका पण चपळ होता. भीम शरीरानें प्रचंड पण बोजड होता. एकमेकांस प्रथम सलामी देऊन पुन्हां दूर होऊन वेगानें गदा उगारून ते मंडळें फिरूं लागलें, उत्तर हिंदुस्थानांत अजूनही असलें गदायुद्ध नव्हे तरी लाठीयुद्ध पहावयास सांपडतें. उलट सुलट वेगानें मंडळांत फिरत व एकमेकांचा डोळा चुकवीत ते एकमेकांस थडाथड गदा मारूं लागले, तेव्हां प्रेक्षकांचे प्राण उत्कंठेनें डोळ्यांत आले. शेवट काय होतो हें पाहण्यास उत्सुक झालेल्या प्रेक्षकांचे श्वासोच्छ्वास स्तब्ध होऊन पापणी हालेनाशी झाली. इतक्यांत अर्जुनानें श्रीकृष्णास उत्कंठेनें हलक्या स्वरांत " कोण जिंकील ?" असा प्रश्न केला. श्रीकृष्णानें म्हटलें, " भीम खास बळकट आहे, पण दुर्योधन अधिक चपळ आहे. दोघांस सारखेंच शिक्षण मिळालें आहे, पण दुर्योधनाची कसरत जास्ती आहे. त्यानें आज तेरा वर्षे लोखंडाचा भीम करून त्याजवर सतत गदायुद्धाची कसरत केली आहे. तो लोखंडी भीम दुर्योधनाच्या शिबिरांत असलेला तूं ऐकिलाच असशील. याशिवाय जो वीर हिंस्र पशूप्रमाणें मार खाऊन परतला व कोंडींत सांपडला त्यासमोर उभें राहणें कठीण आहे. धर्मानें युद्ध होईल तर दुर्योधन जिंकील; आणि शेवटीं धर्मराजानें केलेला मूर्खपणा तुमच्या शाश्वत दुर्गतीस कारण होईल; यासाठीं येथेंही छलयुद्ध केलें पाहिजे. भीमानें दुर्योधनाच्या मांडीवर प्रहार करावा. त्याची तशी प्रतिज्ञाही आहे." ही श्रीकृष्णाची सल्ला ऐकून अर्जुनानें ते योद्धे मंडळ फिरत असतां, दुर्योधनाची पाठ आपल्याकडे पाहून भीमास मांडीचा इषारा केला. इतक्यांत दुर्योधनानें झपाट्यानें एक तडाखा भीमाच्या मस्तकावर हांटला; तो भीमास वर्मी लागला. पण तो पिऊन भीम त्वेषानें जो उसळला तो दुर्योधनावर झपाट्यानें जाऊन त्यानें त्याच्या छातीवर गदेचा प्रहार टाकला. दुर्योधनानें उसळी मारून फटका चुकवावयाचा यत्न केला; यामुळें त्याची छाती बचली, पण भीमानें आपला तडाखा आवरला नाहीं; दुर्योधनाच्या मांडीवर पुन्हा वेगानें तसाच हांटला; त्याबरोबर त्याच्या मांडीचा चुराडा झाला, आणि मूर्च्छा येऊन दुर्योधन धाडकन खालीं पडला! याप्रमाणें त्यांच्या गदायुद्धाचा

शेवट झाला, तेव्हां तेथें जमलेल्या सर्व लोकांनीं ते पांडवांकडचेच असल्यानें प्रचंड जयघोष केला. भीमानेंही विजयाच्या धुंदींत दुर्योधनाजवळ जाऊन त्याच्या डोक्यावर लत्ताप्रहार केला व 'द्रौपदीला "गाय" "गाय" म्हण, पुन्हां म्हण!' असें ओरडत त्याच्या मुकुट घातलेल्या डोक्याला पायानें लाथाडलें. इतक्यांत बलराम क्रोधानें आपलें लांगल वर करून एकदम भीमावर उठला. बलरामाच्या पोटांत अंतर्यामीं दुर्योधनाविषयीं प्रेम होतें. याशिवाय कमरेच्या खालीं गदेचा फटका मारावयाचा नाहीं असा गदायुद्धाचा नियम होता. "दुष्टा भीमा, अधर्मानें युद्ध करून पुन्हां राजाचा असा उपमर्द करतोस?" असें म्हणत बलराम भीमावर धांवला, तेव्हां श्रीकृष्णानें मध्यें पडून आपल्या वेंगेंत बलरामास बळकट धरलें. त्या वेळेस ते दोघे बंधु नील व गौर वर्णाचे, परंतु सारख्या रूपानें अमावास्येच्या सूर्यचंद्राप्रमाणें एकमेकांस लिपटलेले पाहून पहाणारांस मोठें कौतुक वाटलें! श्रीकृष्ण काकळूत करून म्हणाला, "रामा, पांडवांना तूं क्षमा कर. हे आपल्या आत्याचे पुत्र आहेत; यांची वृद्धि ती आपली वृद्धि हें तूं लक्षांत घे. दुर्योधनानें कपटानें यांच्याशीं आरंभापासून वर्तन केलें. शेवटीं कपटद्यूतानें यांचें राज्यही हरण केलें. द्रौपदीला सभेंत आणून यानें आपली मांडी दाखविली; तेव्हां माझी गदा तुझ्या मांडीवर बसेल अशी भीमानें प्रतिज्ञा केली होती, ती यानें या वेळीं पुरी केली. क्षत्रियानें आपली प्रतिज्ञा पुरी करावी; हा त्याचा धर्म आहे. या सर्व गोष्टी ध्यानांत आणतां यानें अधर्म केला नाहीं. शिवाय रामा, आतां कलियुग लागलेंच असें समजून यास तूं क्षमा कर." ही श्रीकृष्णाची प्रार्थना ऐकून बलराम म्हणाला, "बरें, झालें तें झालें, पण हा भीम जिम्हयोधी म्हणून जगतांत निंदा पावेल, आणि हा बिचारा दुर्योधन ऋजुयोधी मारला गेल्यानें यज्ञांत अवभृथस्नानानें जसा पापी मनुष्यही पवित्र होतो, तसा धर्मयुद्ध करीत असतां मरण पावल्यानें हा पवित्र होऊन स्वर्गास जाईल!" असें म्हणत बलरामानें आपल्या रथावर आरोहण करून द्वारकेकडे प्रयाण केलें. इकडे पांडव व श्रीकृष्ण दुर्योधनाचें शव तेथेंच टाकून कौरवांच्या शिबिराकडे निघाले. तेथून सर्व स्त्रिया नोकरचाकरांसह पाहिल्या पळापळीबरोबरच सर्व संपत्ति टाकून हास्तिनापुरास पळून गेल्याच होत्या. पांडवांस तेथें अगणित

रत्नें व शिबिरांचें मौल्यवान् सामान मिळालें तें त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलें. पांडवांकडील वीरांनींही आपआपलीं ठाणीं सायंकाळीं त्या शिबिरांतच दिलीं. पांच पांडव व द्रौपदी हीं मात्र श्रीकृष्णाच्या सल्ल्यानें श्रीकृष्ण आणि सात्यकि यांसह मंगलासाठीं शिबिरापासून दूर सरस्वतीतीरावर जाऊन राहिलीं.

सूर्यास्तसमयींच लाल किरण रणांगणावर पडून हिंस्र श्वापदें हळुहळू बाहेर पडूं लागलीं. इतक्यांत दुर्योधनाची मूर्च्छा उतरून तो फुटलेल्या मांडीच्या वेदनेनें विव्हळूं लागला. याच सुमारास पांडवांची भीति नाहींशी झाल्यामुळें परतलेला संजय दुर्योधनाची काय अवस्था आहे हें पाहण्यासाठीं रणांगणावर आला, आणि आपला राजा अद्याप जिवंत आहे हें पाहून त्याजपाशीं बसून विलाप करूं लागला. तेव्हां दुर्योधन त्यास म्हणाला, " संजया, दैव दुरतिक्रम आहे. अकरा अक्षौहिणी मजजवळ असून, भीष्म, द्रोण, कर्ण, अश्वत्थामा असे नामांकित योद्धे माझ्या बाजूचे असून, मांडी फुटून मी येथें मरत पडलों आहें ! तेव्हां दैव बलवत्तर आणखी काय ? असो. तूं शोक करूं नकोस. सागरान्त पृथ्वीचें राज्य करून मी अनेक यज्ञ केले; शत्रूंच्या डोक्यावर नाचलों; मित्रांना संपत्ति दिली; माझ्याहून कोणाचा अंत अधिक चांगला असेल ? वेदाध्ययन करून धर्माचें आचरण केलें; रोगरहित व बलयुक्त असें आयुष्य जाऊन शेवटीं धर्मानें युद्ध करीत असतां मला रणांत मृत्यु येत आहे; माझ्यापेक्षां कोणाचा अंत प्रशस्यतर आहे ? हें माझें सुदैवच होय, कीं मी जिंकलों जाऊन शत्रूंच्या अंकित दासाप्रमाणें वागण्यास जिवंत राहिलों नाहीं ! सुदैवच होय कीं, माझ्या जिवंतपणीं माझी लक्ष्मी शत्रूंच्या हातीं लागली नाहीं ! संजया, भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, दुःशासन इत्यादि वीरांच्या मागोमाग मी स्वर्गास सुखानें जात आहे, तूं जाऊन माझ्या माता-पितरांचें शांतवन कर. त्यांची मात्र मला धडगत दिसत नाहीं ! तीं अंध माता-पितरें पुत्रविहीन होऊन शत्रूंच्या तावडींत सांपडून कशीं काळ कंठतील ? माझी प्रिय भगिनी दुःशला, बंधु, पुत्र आणि पतीही मरण पावल्यानें कोणत्या गतीला जाईल ! बिचाऱ्या लक्ष्मणाच्या मातेची पति-पुत्रावांचून काय अवस्था होईल ! " असा दुर्योधनाचा आक्रोश ऐकून रणांगणांतील झाडें सुद्धां रडूं लागलीं, व

हिंस्र श्वापदें अश्रु गाळीत दाही दिशा पळून गेलीं. इतक्यांत अश्वत्थामा, कृप व कृतवर्मा बातमीदारांकडून सर्व हकीकत कळल्यानें शोक करीत दुर्योधन पडला होता तेथें आले. त्याचा तो आक्रोश ऐकून व त्याची ती भयंकर अवस्था पाहून अश्वत्थामा संतापानें थरथर ओठ कांपत म्हणाला, " जगतांत खरोखर सत्य उरलें नाहीं. हे पुरुषव्याघ्र, तूं समस्त पृथ्वीचा धर्मशील भर्ता असून असा अधर्मानें मांड्या फुटून दगडामातींत विव्हळत पडला आहेस ! ! हें तुझें दुर्धर व्यसन पाहून लक्ष्मी खाचित अध्रुव आहे असेंच म्हटलें पाहिजे." दुर्योधनानें आपले डोळे हातांनीं पुसून म्हटलें, " असाच हा लोक परमेश्वरानें निर्माण केला आहे. कालपर्यायानें सर्वांचा विनाश आहे. तुमच्या समक्ष तो काळ मला आज प्राप्त झाला आहे. त्यांतल्यात्यांत समाधान हें कीं, मी युद्धांतून कधींही परावृत्त झालों नाहीं; आणि त्या दुष्टांनीं माझा छलानेंच वध केला. तर तुम्ही माझ्या स्नेहानें दुःख करूं नका. जर वेद प्रमाण असतील तर मला अक्षय लोक खाचित मिळतील. कृष्णाच्या मध्यस्थीनेंही मी क्षात्रधर्मास सोडलें नाहीं. तुम्हीही आपलें कर्तव्य उत्तम करून सदृश पराक्रम केलात. दैव विपरीत आहे, त्यास तुमचा व माझा इलाज नाहीं. " याप्रमाणें राजाचें अढळ निश्चयाचें भाषण ऐकून अश्वत्थामा म्हणाला, " राजा, शत्रूनें केवळ अधर्मानें आपल्यास जिंकलें. माझ्या पित्यास अधर्मानें मारल्याबद्दल मला जितका त्वेष आला नाहीं, तितका तुला त्यांनीं अधर्मानें मारलें हें पाहून मला आज आला आहे. राजा, तुझी परवानगी असेल तर मी अजूनही पांचालपांडवांना ठार मारीन. " हें ऐकून दुर्योधन आनंदानें म्हणाला, " कृपाचार्य, आणा जल, लवकर आणा; आणि माझा जीव आहे तों याला माझ्या सेनापत्याचा अभिषेक करा. " कृपानें दुर्योधनाच्या आज्ञेनें सरस्वतीचें जल आणून अश्वत्थाम्यास अभिषेक केला. तेव्हां दुर्योधन म्हणाला, " राजाच्या आज्ञेनें प्रत्येकानें अवश्य लढावें; विशेषतः क्षात्रधर्मानें राहणाऱ्या ब्राह्मणानें जरूर युद्ध करावें. तर तूं माझ्याकरितां युद्ध कर. " असें म्हटल्यावर दुर्योधनानें डोळे मिटले आणि क्षणभरानें सर्व भूतांना भयंकर असलेल्या कल्पनातीत अंधकाराच्या प्रदेशांत त्यानें प्रवेश केला.

सूर्याचा व दुर्योधनाचा अस्त बरोबरच झाला; आणि ते तिघे वीर रण-

भूमि सोडून आपल्या रथांत बसून दक्षिणेकडे जाऊन एका अरण्यांत शिरले. तेथें एका प्रचंड न्यग्रोधवृक्षाखालीं जलसंचय पाहून घोडे सोडून त्यांनीं संध्यावंदन केलें, व नंतर ते जमिनीवरच पहुडले. सर्व दिवसाचा थकवा असल्यानें कृप व कृतवर्मा तात्काळ झोपीं गेले. पण अश्वत्थामा थकला असूनही संतापानें झोपीं गेला नाहीं. अंगांतून कवच न काढतां तो तसाच ध्यानस्थ आकाशाकडे पहात पडला होता. ग्रह.नक्षत्र आणि तारा यांनीं खचित असलेलें आकाश त्या काळोख्या रात्रीं खडी काढलेल्या चंद्रकलेप्रमाणें रमणीय दिसत होतें. पण अश्वत्थाम्याचें लक्ष आकाशाच्या रमणीयतेकडे नव्हतें. जयानें उदीर्ण झालेल्या पांडवांचा नाश उघड लढाईंत होणे शक्य नाहीं; तेव्हां त्यांच्या नाशाची जी मीं प्रतिज्ञा दुर्योधनाजवळ केली, ती केवळ अग्नींत पतंगाप्रमाणें उडी घातली असें त्यास राहून राहून वाटत असल्यानें तो चिंतेनें ग्रस्त झाला होता. इतक्यांत एक भयंकर घुबड पिंगट रंगाचा, मोठ्या शरीराचा व वाटोळ्या डोळ्यांचा, बारीक बारीक शब्द करीत, त्या विस्तीर्ण न्यग्रोधवृक्षावर कावळे निजले होते त्यांच्या जागेंत घुसला; आणि कावळ्यांच्या माना कुरतडून रक्त प्राशन करून त्यांचे पंख व पाय खालीं टाकूं लागला. ती त्या घुबडाची दारुण कृति पाहून अश्वत्थाम्यास कल्पना सुचली, 'या वेळेस पांडव व पांचाल कौरवांच्या शिबिरांत विजयाच्या धुंदींत निजले असतील; तो शिबिर माझ्या पायाखालचा आहे, त्यांत या घुबडाप्रमाणें घुसून मी त्या कावळ्यांचें मुंडीमोचन करतों;' असा विचार करून त्यानें आपल्या मामास उठाविलें व त्यास म्हटलें, " मामा, या पांडवांनीं पदोपदीं निंदित व कपटी कृत्यें करून आपणाकडचे वीर मारले. तर आपणही त्यांजवर रात्रीं छापा घालूं. थकलेलें, विस्कळलेलें, दुसऱ्या शत्रूनें ग्रस्त झालेलें, शिबिरांतून बाहेर पडत असलेलें किंवा आंत शिरत असलेलें शत्रूचें सैन्य जरूर मारावें, असें युद्धशास्त्रकारही म्हणतात; तसेंच रात्रीं निद्रेंत मग्न झालेलें किंवा सेनापति मेल्यानें नायकहीन झालेलें किंवा आपसांत तंटा माजलेलें किंवा निरनिराळ्या तुकड्या पडलेलें शत्रूचें सैन्य मारण्यास सोपें आहे. " हें ऐकून कृप आश्चर्यचकित झाला. क्षणभर स्तब्ध राहून तो म्हणाला, " अश्वत्थाम्या, तूं हें काय मनांत आणलें आहेस ! तूं आजवर यत्किंचितही पाप केलें नाहींस ! आणि आतां निजलेल्यांना ठार मारण्याचें

भयंकर पातक करणार ? बाबा, उत्थान अथवा पराक्रम प्रशस्त आहे, हें खरें; पण दैव आणि पराक्रम यांच्या सम्मेलनानेंच फळ मिळतें. त्यांत दैव आपल्या हातांत नाहीं, पुरुषकार आपल्या हातांत आहे, तो करणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे हेंही खरें. पण पराक्रम करणें तो विचारानेंच केला पाहिजे, व तो आचारशुद्ध असला पाहिजे. बाबा, दुर्योधनानें पराक्रम केला पण सर्व सुहृदांच्या मताविरुद्ध त्यानें हा भयंकर आविचारानें तंटा केला. तो दुर्दैवानेंच मेला असें नव्हें; तर अविचारानें मेला. यासाठीं तूं अविचार करूं नकोस. धृतराष्ट्र, विदुर, गांधारी यांची उद्यां सल्ला घेऊन आपण लढूं.'' अश्वत्थामा शांतपणें म्हणाला, '' मामा, प्रत्येक घटांत माती भिन्न असते. आणि प्रत्येकास आपआपलें मत मोठें शहाणपणाचें वाटतें. तुम्ही मजला मदत करीत नसाल तर हें कर्म मी एकटा करीन;माझा निश्चय ठरला. ज्या दुष्टांनीं अधर्मानें माझा बाप मारला, आणि राजाची मांडी फोडली, त्याजवर आज रात्री छापा घालून विजयानें धुंद झालेल्या व आमच्या शिबिरांत निद्रेंत चूर झालेल्या शत्रूस मी ठार मारणार ! '' कृप म्हणाला, ''अश्वत्थाम्या, तुला वज्रपाणि इंद्रसुद्धा निवारण करण्यास समर्थ नाहीं. पण माझें जरा ऐक. विश्रांति घेऊन व झोंप घेऊन तुझें डोकें शांत झालें म्हणजे मग उद्यां आपण तिघे मिळून खचित पांडवांशीं लढूं. आपणां तिघां एकवटलेल्याना जिंकणें केवळ दुरापास्त आहे. निजलेल्या वीरांना किंवा शस्त्र टाकून बिनधास्तपणें विश्वासानें फिरणाऱ्यांना ठार मारणें महापातक, केवळ नरकास नेणारें आहे. तूं महाधनुर्धर, सर्व अस्त्रें जाणणारा आहेस, आणि निष्पाप आहेस. तूं दिवसाच्या प्रकाशांत उघडपणें शत्रूंशीं उद्यां खुशाल युद्ध कर.'' अश्वत्थाम्यानें उत्तर केलें, ''अहो मामा, हा मर्यादेचा सेतु शत्रूंनींच शंभरदां फोडला आहे. मग आपल्यास कोणती हरकत आहे ? तशांत धर्म सोडून माझ्या पित्यास व राजास मारणाऱ्यांस सौप्तिकांत मारल्यावर त्या पातकानें मला कीटकाचा किंवा पतंगाचा जन्म आला तरी हरकत नाहीं. वादांत वेळ जातो. मी हा चाललों. तुम्हांस यावयाचें असलें तर या. '' असें म्हणून अश्वत्थाम्यानें उठून आपल्या रथाचे घोडे जोडले. तेव्हां निरुपायानें कृपानें कृतवर्म्यास जागें केलें. आणि त्यांनींही आपले रथ जोडले. मग ते तिघे वीर तीन

प्रदीप्त अग्नीप्रमाणें पांडवांस मारण्यास शिबिरास निघाले. शिबिराच्या निरनिराळ्या बाजूंच्या मुख्य तोंडावर दोघांस उभे करून अश्वत्थामा भलत्या वाटेनें आंत घुसला, आणि प्रथम एका मोठ्या तंबूंत शिरला. तेथें धृष्टद्युम्न पर्यंकावर बिनघोर निजला होता त्याच्या छातीवर बसून अश्वत्थाम्यानें त्याचा गळा दाबला. अं अं अं, असें ओरडत असतां त्यानें त्यास ठार केलें. त्याचे नोकर व बायका त्याच्या धडपडीनें जाग्या झाल्या. त्यांस त्यानें तलवारीनें ठार मारलें. याचप्रमाणें दुसऱ्या तंबूंत शिरून त्यानें तेथें निजलेल्यांच्या माना मुरगळल्या, व जागे होऊन जे आडवे झाले, त्यांस तलवारीनें छाटलें. क्षणभरानें सर्व छावणींत गोंधळ माजला. कोणी भूत किंवा पिशाच्च किंवा राक्षस छावणींत शिरला आहे,अशी ओरडाओरड होऊन भ्याड होते ते पळत सुटले.त्यांस छावणीबाहेर पडतांना कृप व कृतवर्मा यांनीं ठार मारलें. जे शूर होते ते अश्वत्थाम्यावर धांवले, पण त्या वीरानें अस्त्रांनीं व तलवारीनें त्यांस यमलोकास पाठविलें. याप्रमाणें निर्दयकर्म करून छावणींत शिरतांना जशी शांतता होती तशीच शांतता सोडतांना ठेवून ते तिघे वीर पहाटेच्या सुमारास निघून गेले.

त्या भयंकर कत्तलींतून वांचलेल्या एका दोघा मनुष्यांनीं धर्मराजास प्रातःकाळीं वर्तमान सांगितलें, तेव्हां त्यास ती घोर बातमी ऐकून मूर्च्छाच आली. क्षणभरानें सावध होऊन आक्रोश करीत युधिष्ठिर म्हणाला, " श्रीकृष्णा, जगताची गति बुद्धिवानांना सुद्धां समजूं शकत नाहीं. सर्व शत्रूंना जिंकून सरतेशेवटीं आम्हीच जिंकले गेलों. प्रमादासारखें अनर्थकारक दुसरें कोणतेंही नसेल. नुसत्या गाफिलपणानें मनुष्यें अर्थास व जिवासही मुकतात. विद्या, तप, संपत्ति, यश प्रमत्त मनुष्यास मिळणें शक्य नाहीं. असो; जें नशिबीं होतें तें झालें. पण हा पुत्रांचा व बंधूंचा भयंकर वध ऐकून त्या बिचाऱ्या द्रौपदीची काय अवस्था होईल ! नकुला, द्रौपदीला रथांत घालून शिबिरास घेऊन ये, आम्ही पुढें जातों. " असें सांगून युधिष्ठिर, तीन पांडव, श्रीकृष्ण व सात्यकि यांसह शिबिरास आला, आणि पुत्रांचीं व आप्तांचीं छिन्नविच्छिन्न झालेलीं किंवा गळा दाबलेलीं प्रेतें पाहून त्याच्या नेत्रांतून टप टप टप अश्रु गळूं लागले ! इतक्यांत द्रौपदी तेथें आली. ती धर्मराजाजवळ येतांच " महाराज, हें काय झालें ! " असें

ओरडून मूर्च्छित पडली. तिला सर्वांनीं सावध केलें. पुत्रांचीं व भावांचीं प्रेतें पाहून धाय धाय रडत ती म्हणाली, " महाराज, भोगा आतां या पृथ्वीचें निष्कंटक राज्य ! तुम्हांला राज्य करतांना माझ्या प्रिय पुत्रांचीं किंवा सौभद्राची आठवण कशाला होईल ? पण माझा जीव यांच्यासाठीं तिळतिळ तुटतो आहे. त्या दुष्ट द्रोणपुत्राचा तुम्ही वध केल्याशिवाय माझा शोक शांत होणार नाहीं. भीमा, माझे लाड तूं नेहमीं पुरविलेस. हे माझे अन्य पति त्या द्रोणपुत्रास शासन करणार नाहींत; पण तूं करशील. माझ्यावर तुझें प्रेम असेल, तर तूं आतां जा आणि त्यास मारून त्याच्या डोक्यावरचा दिव्य मणि घेऊन ये. या माझ्या लाडक्या पुत्रांना ठार मारणाऱ्यास योग्य शासन झालें असें ऐकिल्यावांचून, मी शपथ वाहून सांगतें, मी अन्न घेणार नाहीं ! " हे तिचे निर्वाणीचे शब्द ऐकून शीघ्र-कोपी भीम रथांत बसला, आणि धनुष्य, बाण व गदा घेऊन निघाला. भीम-अश्वत्थाम्याच्या भांडणांत काय अनर्थ होतो नकळे, असें वाटून श्रीकृष्ण अर्जुनास व धर्मास रथांत घालून भीमामागें धांवला. अश्वत्थाम्याचा शोध करीत व घोडे पिटाळीत भीम धांवला, तो यमुना उतरून भागीरथीतीरावर व्यासाच्या आश्रमांत त्यांचा पत्ता लागल्यानें तेथें पोंचला. भागीरथीच्या तीरावर ऋषींसह व्यास बसले होते, त्यांच्याच जवळ कुशवस्त्रें धारण करून डोक्यावर धृत घालून बसलेला, व धुळीनें सर्वांग भरलेला अश्वत्थामा दुरून दृष्टीस पडतांच " थांब, दुष्टा थांब, पळूं नको " असें ओरडत भीम त्याजवर धांवला. तेव्हां अश्वत्थाम्यानेंही संतापानें व प्राणाच्या भीतीनें दर्भ घेऊन त्याजवर ब्रह्मशिरोस्त्र अभिमंत्रण करून, ' सर्व पांडव मरोत, ' असे म्हणत दर्भ फेंकला. श्रीकृष्णानें अर्जुनास म्हटलें, " अर्जुना, तुला हें अस्त्र द्रोणानें शिकविलेले असेल, तर त्यानेंच या अस्त्राचा प्रतिकार कर. " तेव्हां अर्जुनानें रथाखालीं उतरून अश्वत्थाम्यासह तेथें असलेल्या सर्वांचें अभीष्ट चिंतून त्याच अस्त्राचा त्याजवर प्रयोग केला. याप्रमाणें तीं अस्त्रें एकमेकांवर आपटून अग्निज्वाळा उठूं लागल्या. तेव्हां व्यास अश्वत्थाम्यास म्हणाले, "बाबा, हें अस्त्र आपलें माघारें घे; नाहींतर या ठिकाणीं बारा वर्षें दुष्काळ पडेल. या धर्माला शरण जा, व द्रौपदीच्या समाधानासाठीं हा डोक्याचा मणि काढून त्यास दे. " हो ना करितां त्या हट्टी ब्राह्मणानें शेवटीं तें कबूल

केलें व तें अस्त्र परत घेतां येतां उत्तरेच्या गर्भात असलेल्या भावी पांडव-वंशावर टाकलें. नंतर त्यानें आपला मणि काढून भीमाच्या हवालीं केला. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला, "अश्वत्थाम्या, तूं जें हें अत्यंत नीच कर्म केलेंस, त्याचें फळ तुला मिळाल्यावांचून राहणार नाहीं. अरे, युद्ध सुरू असतां धर्माधर्माचा विचार गौण आहे; पण युद्ध बंद झाल्यावर विश्वासानें निःशस्त्र होऊन निद्रिस्त झालेल्या निरपराधी बाळ–तरुण–वृद्धांना तूं जें ठार मारलेंस तें युद्ध नव्हे. ज्ञानी लोक त्यास अत्यंत निंद्य पाप समजतात. या दारुण पापामुळें तूं तीन हजार वर्षें या पृथ्वीवर एकटा फिरशील. कोणीही, कधींही, किंचितही तुझ्या थाऱ्याला उभा राहणार नाहीं. तुझ्या मस्तकांत किडे पडून व अंगाला सर्व व्याधि होऊन दुर्गंधानें तुझें डोकें भ्रांत होऊन तूं रानावनांत हिंडत राहशील, जा." हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून खिन्न मनानें तेथून सर्वांच्या समक्ष अश्वत्थामा चालता झाला !

त्याच्या डोकीवरचा अमूल्य मणि घेऊन ते वीर रथांत बसून परत निघाले, ते त्वरेनें सायंकाळच्या सुमारास द्रौपदीपाशीं पोंचले. युधिष्ठिराच्या आज्ञेनें भीम तो मणि तिला देऊन म्हणाला, " द्रौपदी, हा मणि अश्वत्थाम्याला जिंकून आम्हीं आणला आहे, घे. ऊठ आतां; तुझ्या पुत्रांचा नाश करणाऱ्या या पापिष्ठाचें शासन केलें आहे. ब्राह्मण म्हणून व गुरुपुत्र म्हणून त्यास केवळ जीवदान देऊन सोडलें आहे. त्याचें शरीर जरी जिवंत आहे तरी त्याचें यश नष्ट झालें, तर आतां तूं आपला शोक आवर." शहाणी द्रौपदी म्हणाली, " गुरुपुत्र माझाही गुरूच आहे, त्यास तुम्हीं जीवदान दिलें, बरें केलें. आतां हा मणि राजाच्या मुकुटावर बांधा म्हणजे मला पुत्रांचे ऋण फिटल्यासारखें वाटेल." तेव्हा धर्मानें गुरूचें उच्छिष्ट म्हणून द्रौपदीच्या समाधानासाठीं तो मणि डोक्यावर धारण केला.

याप्रमाणें भारतीय युद्धाचा शेवट झाला. पांडवांकडील सात अक्षौहिणींतून सात शिल्लक राहिले. कौरवांकडील अकरा अक्षौहिणींतून तीनच राहिले. पृथ्वीचा भार हलका करण्याचें मुख्य अवतारकृत्य श्रीकृष्णानें योध्यांच्या च शौर्यानें, हट्टानें व अनयानें याप्रमाणें करविलें. पांच पांडव, श्रीकृष्ण व सात्यकि अवशिष्ट राहिले, ते हस्तिनापुराकडे जाण्यास निघाले; तों धृतराष्ट्र संजय–विदुरासह व गांधारी, कुंती वगैरे सर्व स्त्रियांसह तेथें

पोंचला. त्यास धर्म दुःखानें सामोरा गेला. त्यानें धृतराष्ट्राचें वंदन केलें, तेव्हां धृतराष्ट्रानें पुत्रशोकानें संतप्त झालेल्या आपल्या मनास कसेंबसें आवरून त्यास आलिंगन दिलें. धर्मामागून भीमानें त्यास नमस्कार केला. आपल्या शंभर पुत्रांना ठार मारणारा हाच, असें मनांत येऊन धृत-राष्ट्राचा क्रोधानल धगधगांत पेटला. त्याचा चेहरा कावराबावरा होऊन शब्द विस्वर झाला व "ये भीमा ये, मला आलिंगन दे ! " असें म्हणत तो पुढें सरसावला. तेव्हां श्रीकृष्णानें त्याचें सामर्थ्य व त्याच्या क्रोधाचें तीव्र कारण मनांत आणून भीमास एकदम बाजूस सारलें व जी भीमाची लोखंडी प्रतिमा दुर्योधनानें आखाड्यांत गदायुद्धाची कसरत करण्यासाठीं तयार केली होती, व जी त्याच्या शिबिरांत त्यास सांपडली होती ती पुढें केली. धृतराष्ट्रानें त्या प्रतिमेस इतकें कडकडून आलिंगन दिलें कीं, आंतून पोकळ असलेली ती मूर्ति कडकड आवाज करीत चिपटी झाली. इकडे धृतराष्ट्रासही त्या भयंकर प्रयत्नानें हृदय फुटून रक्ताची गुळणी आली व तो घेरी येऊन खालीं बसला. " अरेरे, भीमाला कांहीं अपाय झाला नाहीं ना ? " असें उलट ढोंग करून तो म्हातारा दुःख करूं लागला; तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला, " राजा, तूं व्यर्थ श्रमी होऊं नकोस. चुराडा झालेला हा लोखंडी भीम होय, हा प्रत्यक्ष भीम नव्हे. तुझ्या-सारखी शक्ति कोणास आहे ? पुत्रशोकानें तुझा संताप झालेला पाहून मी भीमाला तुझ्या या मृत्युदंष्ट्रातुल्य बळकट बाहूंच्या वेगेपासून वांचविलें. राजा, भीमाला ठार मारण्याचें जें तुझ्या मनांत आलें तें सर्वथैव अयोग्य आहे. तुझे पुत्र हा मेल्यानें जिवंत होतील काय ? मीं शमाकरितां किती प्रयत्न केला तें तुला ठाऊकच आहे. तर आतांपर्यंत जें झालें तें सर्व मान्य करून तूं पोटांत घाल. " इतक्यांत परिचारिकांनीं शुद्धीकरितां पाणी आणिलें, त्यानें धृतराष्ट्रानें गुळणा करून टाकल्यावर श्रीकृष्ण म्हणाला, " राजा, वेद-शास्त्र-पुराणांचें तूं अध्ययन केलें आहेस; तूं सर्व गोष्टी जाणतो आहेस; तुझाच अपराध असून तूं पांडवांवर कोप करतोस हें न्याय्य नव्हे. भीष्म, द्रोण, विदुर, मी यांनीं राजसभेंत हा भावी अनर्थ ओढवेल हें तुला अनेक प्रकारें समजाविलें असतां तूं त्या वेळीं आमचें वचन ऐकिलें नाहींस. तर आतां तूं पांडवांवर क्रोध करूं नको.

हेच तुझे पुत्र आहेत असें तूं आतां समज. " हें केशवाचें भाषण ऐकून धृतराष्ट्र म्हणाला, " श्रीकृष्णा, तूं म्हणतोस तें सर्व सत्य आहे. बलवान् पुत्रस्नेहानें मला धैर्यापासून च्युत केलें. असो; आतां माझा राग शांत झाला आहे. आतां मला भीमास निःशंक भेटव. " तेव्हां भीमानें पुढें होऊन धृतराष्ट्रास आलिंगन दिलें. नंतर अर्जुन-नकुल-सहदेवांसही पोटाशीं धरून त्या अंध म्हाताऱ्यानें सर्वांस " तुमचें कल्याण असो " असा आशीर्वाद दिला. नंतर युधिष्ठिर गांधारीस नमस्कार करण्यास गेला, तेव्हां तिचाही क्रोध अनावर होऊन ती त्यास शाप देण्यास उद्युक्त झाली. तेव्हां युधिष्ठिर म्हणाला, " देवी मातोश्री, या हतभाग्याला तूं बेलाशक शाप दे. पितामह, आचार्य, बंधु यांचा घात करून व स्वतःचे पुत्र व आप्त यांचा नाश करून हें मिळविलेलें राज्य मला विषासारखें वाटत आहे. किंबहुना मला माझा जीव नकोसा झाला आहे. तुझ्या शापानें मी या दुःखोदधींतून व शोकसमुद्रांतून मुक्त होईन ! " हें त्याचें नम्र व दीन भाषण ऐकून गांधारीचा शोक व क्रोध शांत झाला. ती पुढें कांहींही बोलली नाहीं. पण युधिष्ठिर नमस्कार करीत असतां त्याच्या नखांवर तिची क्रुद्ध दृष्टि पडली, त्यामुळें त्याचीं नखें कुरतडून जाऊन वाईट दिसूं लागलीं. नंतर सर्व पांडव आपल्या आईस भेटले. तिनें त्यांस पोटाशीं धरून पुष्कळ विलाप केला. द्रौपदीनें त्या दोघां सास्वांस नमस्कार करून अतिशय शोक केला. तेव्हां गांधारीनें म्हटलें, " बाई, माझेकडे पहा आणि आपला शोक आवर. " याप्रमाणें सर्वांच्या भेटी होऊन तीं सर्व हळुहळू रणभूमि सोडून भागीरथीवर आलीं व तेथें सर्व मृतांस त्यांनीं उदक दिलें.

☆

# उत्तरपर्व

यशस्वी युधिष्ठिर मृतांना जल देऊन मोठ्या कष्टानें भागीरथीच्या तीरावर आला, व हस्तिनापुराबाहेर पुत्रांचें आशौच पाळण्याकरितां एक महिना राहिला. " भीष्म, द्रोण इत्यादि शत्रूंबरोबर तुम्ही जो कर्ण मारलांत तो तुमचा ज्येष्ठ भ्राता होता, " असें मातुश्रीनें तिलांजली देतांना धर्मास सांगितलें, तेव्हांपासून तर त्यास अतिशय दुःख होत होतें. आपले व शत्रूचे सर्व लोक ठार मारवून मिळविलेलें राज्य त्यास विषासारखें भासूं लागलें. शेवटीं एके दिवशीं तो अर्जुनास म्हणाला, " अर्जुना, लोभाच्या नादीं लागून आपली ही भयंकर अवस्था झाली आहे. यापेक्षा वनांत राहणाऱ्या मुनींचें क्षमा, वैराग्य, निर्मत्सरता, अहिंसा, सत्यवचन इत्यादि गुणांनीं युक्त असलेलें आयुष्य फार चांगलें. अर्जुना, त्यागवानाच्या हातून पापच होत नाहीं; यासाठीं राज्याचा त्याग करून मुनि होऊन मी वनांत जातों. तूं हें पृथ्वीचें निष्कंटक राज्य संभाळ ! " हें धर्माचें उद्विग्नपणाचें भाषण ऐकून सर्वांस फार वाईट वाटलें. अर्जुन म्हणाला, " राजा, हजारों क्षत्रियांना मग तूं कशासाठीं मारविलेंस ? निष्कांचनत्व मुनींनाच योग्य आहे, राजांना नाहीं. राजानें द्रव्य मिळवून अश्वमेधासारखे यज्ञ करावे आणि प्रजेचें धर्मानें पालन करावें. दाशरथी रामापासून हा सुमार्ग चालत आला आहे तो सोडून तूं कुमार्गीत जाऊं नको. पाणी, माती, फळफळावळ यांत शेंकडों जंतु आहेत त्यांची हिंसा प्रत्येकास होतेच ना ? हिंसेशिवाय किंवा दुर्घट कर्म केल्याशिवाय महती श्री मिळणें शक्य नाहीं. शिवाय लोकांच्या कल्याणाकरितां जी हिंसा करणें प्राप्त आहे ती करणें हिंसा नव्हे. सर्वतोपरी गुणयुक्त किंवा सर्वतोपरी गुणहीन अशी वस्तूच

जगतांत नाहीं. प्रत्येक कर्मांत चांगलें आणि वाईट यांचें मिश्रण आहेच. अशा या जगतांतील मिश्र व्यवहारांत न्यायानें वागणारे लोक पूर्वीपासून जें करीत आले तें तूं कर." हें ऐकून धर्मानें उत्तर केलें, "असंतोष, मोह, बल, अहंकार, इत्यादि पापगुणांच्या तावडींत सांपडल्यामुळें तूं राज्याचा भुकेला आहेस, पण त्यांत तुला सुख होणार नाहीं. तूं निरिच्छ आणि द्वंद्व-मुक्त होशील तरच तुला सुख मिळेल. द्वंद्वरहित विमुक्त जनकानें काय म्हटलें ते तूं ध्यानांत धर. मिथिला पेटलेली पाहून जनक म्हणाला, 'ज्या मजजवळ यत्किंचित्ही वित्त नाहीं त्या माझें वित्त अनंत आहे. मिथिला जळते आहे पण माझें कांहींच जळत नाहीं!' यासाठीं मन कल्याणाकडे लावून आणि तृष्णेचें नियमन करून मी कर्मपरंपरेचा त्याग करणार आणि निरावलंबन होऊन सुखी होणार." भीमानें, द्रौपदीनें, अर्जुनानें धर्माची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण त्याचें विरक्त झालेलें मन राज्याकडे वळेना. युद्धाच्या पूर्वी संन्यास घेण्याचा जो उमाळा अर्जु-नास आला होता, तोच युद्धाच्या शेवटीं युधिष्ठिरास आला. व्यासांनीं अखेरीस त्यांस म्हटलें, "धर्मा, गार्हस्थ्य सोडून अरण्यांत जाण्यास धर्म-शास्त्राप्रमाणें तूं अद्याप योग्य झाला नाहींस. यज्ञ, विद्या, उद्योग, संपत्ती-विषयीं असंतोष, प्रजापालन, आणि दंडधारण हीं राजांचीं कर्तव्यें आहेत. त्यांत दंडधारण हें सर्वांत श्रेष्ठ कर्तव्य आहे. आपल्या बंधूंसह धर्मार्थकामांचा यथाशास्त्र उपभोग घेऊन प्रथम तूं आपलें कर्तव्य बजाव आणि मग अरण्यांत जा. सुख किंवा दुःख, प्रिय किंवा अप्रिय, जें जें धर्मानें वागत असतां मनुष्यास प्राप्त होईल तें तें अपराजित हृदयानें मनुष्यानें भोगलें पाहिजे. तुझी इच्छा नसतां तुला हें घोर कर्म करावें लागलें तर त्याबद्दल तूं संताप करूं नकोस. पृथ्वीचें राज्य पराक्रमानें तुला मिळालें आहे. त्याचें यथाशास्त्र पालन कर. जे मांडलिक राजे मेले आहेत त्यांच्या पुत्रांचें समाधान करून त्यांस गादीवर बसव. जेथें पुत्र नसतील तेथें कन्याही बसव. याप्रमाणें सर्व राष्ट्रांचें आश्वासन करून तूं अश्वमेध यज्ञ कर, म्हणजे तुझें हिंसाकृत सर्व पाप नाहींसें होईल." धर्मानें प्रश्न केला, "महर्षि! राज्य आणि धर्माचरण यांचा नित्य विरोध आहे. अधर्माशिवाय राज्य करणें शक्य नाहीं. मी फिरफिरून विचार केला तरी मला असेंच वाटतें; तर हा माझा मोह

दूर करा." व्यासानें उत्तर केलें, "राजा, तुझा वृद्ध पितामह भीष्म राजधर्म आणि मोक्षधर्म चांगलें जाणतो. धर्मरहस्यासंबंधानें जे संशय असतील ते तूं त्याला जाऊन विचार." आजोबाचा अधर्मानें घात करून त्यास मी आतां धर्माचे प्रश्न कसे करूं ? असे धर्म आढेवेढे घेऊं लागला. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला, "धर्मा, शोकाचा अति निर्बंध न करितां भगवान् व्यास तुला जें सांगत आहेत तें तूं कर, आणि आम्हां सर्व मित्रांस व द्रौपदीस आनंद देऊन लोकांचें कल्याण कर." हे श्रीकृष्णाचे शब्द ऐकतांच धर्मराज उठला व राज्य स्वीकारण्यास कबूल झाला. मग प्रजाजनांनीं मोठ्या उत्साहानें अलंकृत केलेल्या नगरांत युधिष्ठिराने थाटानें प्रवेश केला. पालखींत पुढें धृतराष्ट्रास करून, सोळा पांढरे बैल जोडलेल्या एका मोठ्या नवीन तयार केलेल्या रथांत धर्मराज निघाला. त्याचें सारथ्य भीम करीत होता. अर्जुनानें त्याजवर पांढरें छत्र धरलें होतें व नकुळ-सहदेवांनीं चवरी आणि पंखा घेतले होते. त्याच्या मागें श्रीकृष्ण सात्यकीसह सुवर्णाच्या रथांत बसून चालत होता. मागें गांधारी, कुंती, द्रौपदी, व इतर कुरुस्त्रिया सुंदर सुंदर रथांत बसून चालत होते. शेंकडों सरदार हत्तीवर व घोड्यावर बसून स्वारीबरोबर चालत होते. रस्ताभर शंख व दुंदुभी वाजत होते. वारंवार प्रजाजन आनंदानें जयशब्दाचा घोष करीत होते. राजवाड्यांत पोंचल्यावर, धौम्यानें तेथें उदङ्मुख वेदी केली होती, त्याजवर व्याघ्रचर्म घालून वर सर्वतोभद्र सिंहासन ठेविलें होतें, सर्व सुवर्णाचें असून अग्नीसारखें चमकत होतें, व त्याजवर अनेक रत्नें बसविलीं होतीं. अशा दीप्त सिंहासनावर धर्मराज व द्रौपदी यांस बसवून श्रीकृष्णानें स्वतः उत्तम शंखांतून गंगोदकानें त्यास पृथ्वीच्या साम्राज्याचा अभिषेक केला. त्या वेळेस मंगल वाद्यांचा प्रचंड जयघोष झाला. ब्राह्मणांनीं धर्मराजास आशीर्वाद दिले. धर्मराजानें सहस्र सहस्र निष्क दक्षिणा प्रत्येक ब्राह्मणास दिली व सरदारांस अमूल्य पोषाक दिले. नंतर तो म्हणाला, "धृतराष्ट्रमहाराज माझे परमपूज्य ज्येष्ठ पिता आहेत; त्यांची आज्ञा तुम्ही पूर्वी पाळीत आलां त्याप्रमाणेंच पाळा, म्हणजे मला अत्यंत प्रिय वाटेल." याप्रमाणे सर्वांस ताकीद देऊन भीमास त्यानें युवराज नेमिलें. सैन्यावर नकुलास नेमिलें. परराज्यावर व दुष्टांचें शासन करण्याच्या कामावर अर्जुनास नेमिलें व

सहदेवास आपला समीपस्थ ( प्रायव्हेट सेक्रेटरी ) नेमिलें. विदुर, संजय, कृप इत्यादिकांस तीं तीं योग्य कामें वांटून दिलीं. याप्रमाणें व्यवस्था लावून धर्म श्रीकृष्णासह कुरुक्षेत्रांत भीष्म शरपंजरीं पडले होते तेथें आला. संध्याकाळच्या सूर्याप्रमाणें तेजस्वी दिसणाऱ्या त्या भीष्माभोंवतीं अनेक मुनि बसले होते. दुरूनच रथांतून उतरून ते सर्व हात जोडून पायींच भीष्मापाशीं आले आणि त्यास नमस्कार करून जागा मिळाली तसे बसले. मग श्रीकृष्ण किंचित् दीनस्वरानें म्हणाला, " भीष्मा, तुझें मन नेहमींप्रमाणें शांत व प्रसन्न आहे ना ? तुझें ज्ञान पूर्वीप्रमाणें उज्ज्वल आहे ना ? तुझ्यासारखा पुरुष या पृथ्वीतलावर मीं पाहिला नाहीं किंवा ऐकिला नाहीं ! ज्ञातींच्या भयंकर क्षयानें संतप्त झालेला हा युधिष्ठिर तुझ्या पायाशीं आला आहे. यास चातुर्वर्ण्य व चातुराश्रम्य यांचे धर्म ऐकण्याची इच्छा आहे. यास धर्माचा उपदेश करून तूं याचा शोक नाहींसा कर. "

हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून भीष्म म्हणाला " श्रीकृष्णा, मी स्वस्थ व सुखी आहें; माझें मन व वाणी हीं दृढ आहेत. तुझ्या प्रसादानें मला सर्व राजधर्म व मोक्षधर्म प्रत्यक्ष गोचर आहेत. पण श्रीकृष्णा, सर्व धर्मांचा प्रवर्तक प्रत्यक्ष श्रीविष्णु तूं असून व धर्मराजाजवळ तूं नेहमीं असून, धर्म पुसण्यासाठीं तो मजकडे आला हें आश्चर्य नव्हे काय ? श्रीकृष्णा, कार्यकारणापलीकडे असणारें सत्य, अद्वितीय, आदिमध्यांतरहित असें जें परब्रह्म तें तूं आहेस. अदितीच्या पोटीं द्वादशरूपानें अवतीर्ण होणारा सुवर्णकांति सूर्य तूं आहेस. शुक्लपक्षांत देवांना आणि कृष्णपक्षांत पितरांना तृप्त करणारा रजतकांति चंद्र तूं आहेस. ज्यांचे बृहदादि उक्थांत व अग्निष्टोमादि यज्ञांत ब्राह्मण स्तवन करतात, तो वेदरूपी परमेश्वर तूं आहेस. सहस्र फणांनीं शोभणाऱ्या शेषाच्या पर्यंकावर योगाचा अवलंब करून निद्रा घेणारा निद्रास्वरूपी परमेश्वर तूं आहेस. वेदोक्त साधनांनीं संसारांतून तरून जाण्याचा मोक्षमार्ग उत्पन्न करणारा सत्यस्वरूपी परमेश्वर तूं आहेस. निरनिराळ्या धर्मांचें आचरण करणारे लोक ज्या एका प्रभूचें निरनिराळ्या तऱ्हेनें पूजन करितात, तो धर्मस्वरूपी परमेश्वर तूं आहेस. निरनिराळ्या मनोरथांनीं प्राणिमात्रांस उन्मत्त करून सोडणारा कामनारूपी ईश्वर तूं आहेस. सर्व सृष्ट पदार्थांत व्यापून राहिलेला आणि प्राणिमात्रांच्या

शरीरांत जीवस्वरूपानें असणारा परमात्मा तूं आहेस. त्या तुला नमस्कार असो. जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांत सारखा राहणारा आत्मा, पांच महाभूतें व मनासह अकरा इंद्रियें या सोळा तत्त्वांना धरून जो सतरावा आहे असें ज्ञानी म्हणतात, त्या सांख्यरूपी परमात्म्याला तुला नमस्कार असो. निद्रेचा त्याग करून व प्राणवायूंचा जय करून सत्वगुणांत नित्य स्थित होणारे योगी ज्याला तेजोरूपानें नेहमीं पाहतात, त्या योगस्वरूपी परमात्म्याला नमस्कार असो. पापपुण्याचा क्षय झाल्यानें पुनर्जन्मापासून मुक्त झालेले संन्यासी ज्याच्या ठिकाणीं लीन होतात त्या मोक्षस्वरूपी परमात्म्याला तुला नमस्कार असो. उत्पत्ति आणि नाश यांनीं विशिष्ट असलेल्या सर्व कार्यरूप वस्तूंचा ज्याच्यापासून उगम आहे आणि ज्याच्या ठिकाणीं लय आहे, त्या कारणस्वरूपी परमात्म्याला तुला मी नमस्कार करतों. अग्नि हें मुख, स्वर्ग हें मस्तक, आकाश ही नाभि, भूमि हे चरण, सूर्यचंद्र हे नेत्र, आणि दिशा हे कर्ण अशा अवयवांनीं युक्त असलेल्या विश्वरूपी परमात्म्याला तुला मी नमस्कार करतों. जो सृष्टि चालविण्यासाठीं स्नेहरूपी पाशानें प्राण्यांस मोहांत टाकितो त्या मोहरूपी परमेशाला तुला नमस्कार आहे. ज्यास मुमुक्षु लोक ज्ञानसाधनाच्या योगानें प्राप्त करून घेतात त्या ज्ञानस्वरूपी परमेशाला तुला नमस्कार आहे. जटा आणि दंड यांनीं युक्त, लंबोदर, कमंडलु धारण करणारा, ब्रह्मा तूंच आहेस. शूलधारी, भस्मचर्चित, ऊर्ध्वलिंग, त्रिनेत्र, देवाधिपति रुद्र तूंच आहेस. हे विश्वकर्मन्, हे विश्वात्मन्, हे विश्वसंभव, हे पंचभूतातीत, तुला नमस्कार असो. जे श्रीकृष्णनिष्ठ होऊन रात्रंदिवस बोलतां चालतां श्रीकृष्णाचें भजन करितात ते श्रीकृष्णस्वरूप होऊन त्याच्याच ठिकाणीं प्रविष्ट होतात. श्रीकृष्णा, ह्या माझ्या वाग्रूपी यज्ञानें मी तुझें आराधन करीत आहे. तूं मजवर प्रसन्न हो. " याप्रमाणें भीष्मानें श्रीकृष्णाचा स्तव केला. तो ऐकून श्रीकृष्ण सद्गदित होऊन म्हणाला, " भीष्मा, मी तुझ्यावर संतुष्ट आहें. तूं परमगतीला जाशील यांत तिळमात्र संशय नाहीं. या युधिष्ठिरास राजधर्मांचा व मोक्षधर्मांचा तूंच उपदेश कर. गुरुस्थानीं असलेल्या या राजास उपदेश करण्याचा माझा अधिकार नाहीं. यासाठीं मीं त्यास तुझ्याकडे आणिलें आहे. तूं निःशंक मनानें त्यास ज्ञान सांग. तुझ्या मुखांतून जें

उपदेशामृत निघेल तें या लोकीं स्मृतिशास्त्राप्रमाणें आदरणीय होईल." ही श्रीकृष्णाची आज्ञा ऐकून भीष्मानें धर्मास, तुला जे जे संशय असतील, जे जे प्रश्न विचारणें असतील ते ते विचार. मी यथामति त्यांचें उत्तर देतों " असें सांगितलें. नंतर युधिष्ठिरास त्याच्या अनेक प्रश्नानुरूप राजधर्मांचे व मोक्षधर्मांचें रहस्य भीष्मानें समजावून दिलें. सर्व महर्षीनीं व राजांनीं ते धर्म मोठ्या आदरानें व एकाग्रतेने ऐकले. भीष्माचा समग्र उपदेश ऐकून सर्व ऋषि व इतर श्रोते रोमांचित झाले. शेवटीं भीष्म म्हणाला, " युधिष्ठिरा, तूं हस्तिनापुरास जाऊन प्राप्त झालेल्या पृथ्वीचें राज्य चालव आणि निरनिराळे यज्ञ करून पितरांचें व देवांचें ऋण फेड. प्रजेचें सर्व तऱ्हेनें रंजन करून प्रकृतींना आणि सुहृदांना दान व विभव यांनीं संतुष्ट ठेव. तूं आतां जा आणि सूर्य उत्तरायणाकडे वळेल तेव्हां माझें उत्तरकार्य करण्यास येथें परत ये." याप्रमाणें भीष्माची आज्ञा झाली, तेव्हां धर्म, श्रीकृष्ण व इतर मंडळी यासह हस्तिनापुरास परत आला. नंतर धर्मानें श्रीकृष्णाची रवानगी द्वारकेस अत्यंत प्रेमानें केली. " गोविंदा, तुझ्या प्रसादानें ही पृथ्वी आम्हांस मिळाली आहे. यांतील वाटेल तीं रत्नें तूं घे आणि आपल्या पित्यास भेटावयास जा." असें धर्मानें म्हटलें तेव्हां " मला रत्नें काय करावयाचीं आहेत ? माझ्या येथें आहेत तींही तुझींच आहेत." असें म्हणून श्रीकृष्णानें धर्माचा, अर्जुनाचा, इतर पांडवांचा व कुंतीचा निरोप घेतला, आणि सुभद्रेस माहेरपणाकरितां रथांत घेऊन व अश्वमेधाकरितां सर्व मंडळीसह पुन्हां येतों असें अभिवचन देऊन द्वारकेस प्रयाण केलें.

द्वारकेस परत आल्यावर सर्व यादवमंडळी भोजकट नगरास अनिरुद्धाच्या विवाहाकरिता गेली. रुक्मीची बहीण रुक्मिणी श्रीकृष्णानें वरली होती; रुक्मीची मुलगी प्रद्युम्नास दिली होती, आणि आतां रुक्मिणीच्या आग्रहानें रुक्मीनें आपल्या मुलाची मुलगी रोचना अनिरुद्धास दिली. याप्रमाणें यादव-भोजांचा हा तीन पिढ्या संबंध चालला. रुक्मी श्रीकृष्णाचा कट्टा शत्रु होता, तरी त्यांचा हा असा शरीरसंबंध प्राचीन रिवाजाप्रमाणें तीन पिढ्या झाला. भोजकट नगरास अनिरुद्धाचें लग्न मोठ्या थाटानें झालें. लग्नानंतर व्याही व्याही मंडळी क्षत्रियांच्या चालीप्रमाणें द्यूत खेळण्यास बसली. द्यूत खेळतां खेळतां

द्यूताचें भूत खेळणारांवर चढलें. दुर्योधनाप्रमाणें मीही यादवांस नागवतों अशी दुष्ट कल्पना या वेळीं रुक्मीच्या डोक्यांत शिरली; व जेव्हां बलराम पणावर पण हरूं लागला तेव्हां कलिंगाचा राजा प्रेक्षक बसला होता, तो हसूं लागला. शत, सहस्र, अयुत, लक्ष, नियुत, कोटि निष्काचे दहाच्या गणित-श्रेढीनें चढलेले पणावर पण बलराम हरला. तेव्हां त्यानें क्रोधानें अर्बुद म्हणजे दशकोटींचा पण लावला. तो मात्र पण त्यानें जिंकला. रुक्मी कपटानें " मी जिंकला, प्रेक्षकांस विचारा, " असें ओरडूं लागला. त्याचा साथी कलिंग हंसून ' रुक्मीनेंच जिंकला ' असें म्हणाला. रुक्मीचा गर्विष्ठ-पणा भारतीय युद्धाच्या प्रसंगीं वाचकांस दिसलाच आहे. " तुम्ही यादव बोलून चालून गुराखी, तुम्हांला फाशांत काय समजतें ? द्यूत क्षत्रिय राजां-नींच खेळावें." असें निंदेनें भरलेलें भाषण त्यानें खोट्या वादाच्या समर्थनार्थ आणखी केलें. तेव्हां सरळ स्वभावाच्या बलरामास क्रोधाचें वारें आलें. त्यानें तेथल्या तेथेंच सुवर्णानें भरलेली खेळावयाची हस्तिदंती फळी उचलून रुक्मीच्या डोक्यांत घातली ! त्याबरोबर त्या म्हाताऱ्याचा प्राणच गेला. कलिंग पळूं लागला, त्यास दहाव्या पावलींच धरून बलरामानें त्याचे दांत पाडले. दुर्योधनानें द्यूतांत युधिष्ठिराची दुर्दशा केली त्याऐवजीं रुक्मीची याप्रमाणें उलटी दुर्दशा झाली. रुक्मिणीनें भावाबद्दल पुष्कळ शोक केला, पण श्रीकृष्णानें तोंडावाटें अवाक्षर काढलें नाहीं. दुष्ट मंडळीपैकीं रुक्मी शिल्लक होता, त्याचा परस्पर निकाल लागला हें पाहून श्रीकृष्णास समाधानच वाटलें. असो. यादवमंडळी तात्काळ अनिरुद्ध व त्याची नववधू रोचना हिला घेऊन द्वारकेस परत आली ( भाग. ६१ द० ).

याच महिन्याच्या आरंभीं श्रीकृष्ण सर्व यादवमंडळीसह युधिष्ठिराचा अश्वमेध संपादण्यासाठीं पुन्हां हस्तिनापुरास गेला. पांची पांडव द्रव्य आणण्या-करितां व्यासांच्या सूचनेप्रमाणें हिमालयांत गेले होते ते अद्याप परत आले नव्हते. त्यांच्या पश्चात् व श्रीकृष्ण हस्तिनापुरास पोंचल्यावर अभि-मन्यूची गर्भवती स्त्री उत्तरा बाळंत झाली. तों मूल मेलेलें निघालें. त्या वेळीं कुलस्त्रियांच्या आक्रोशाचा जो ध्वनि सूतिका-गृहांतून बाहेर पडला तो काय वर्णन करावा ! सर्व कौरववंशाचा भावी अंकुर हाच शिल्लक होता. तो मेलेला निघाला; तेव्हां वंश चालण्याची आशाच खुंटली. म्हातारी कुंती

"श्रीकृष्णा, अरे तुझा नातु उपजतांच मेला आणि हा कौरववंश बुडाला!" अशा करुण स्वरानें आक्रोश करीत श्रीकृष्णापाशीं धावत आली. सासूच्या मागोमागच द्रौपदी व सुभद्राही धायधाय रडत आल्या. त्या सर्वांनीं श्रीकृष्णाचे पाय धरले. "श्रीकृष्णा, अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रानें हा तुझा नातु मेला आहे, याला तूं पहा आणि आपल्या कृपादृष्टीनें जिवंत कर." अशी त्यांनीं त्याची करुणा भाकली. तेव्हां श्रीकृष्ण दयेनें उठला. तो सूतिकागृहाशीं येतांच द्रौपदी म्हणाली, "उत्तरे, तुझा आजेसासरा आला आहे. यास नमस्कार कर. हा तुला दुःखसमुद्रांतून खाचित बाहेर काढील." उत्तरेनें त्वरेनें उठून श्रीकृष्णास मनोभावानें वारंवार नमस्कार केला आणि म्हटलें, "पुंडरीकाक्षा, माझा आणि अभिमन्यूचा सारखाच नाश झाला. माझी सर्व आशा तुटली." असें म्हणत असतां मूर्च्छा येऊन ती धाडकन खालीं पडली. तेव्हां त्या सूतिकागृहांत रडण्याचा पुन्हां आकांत झाला! क्षणभरानें उत्तरा शुद्धीवर येऊन म्हणाली, "मुला, तूं धर्मज्ञाचा पुत्र असून गोविंदाचें मधुर हास्यानें आतिथ्य करीत नाहींस हें काय! खरोखर मनुष्याला मरण मागितल्यानें येत नाहीं. ही मी पति व पुत्र दोन्ही गेल्यानें अनाथ झालें असून अजून जिवंत आहे. धर्मराजाची आज्ञा घेऊन मी विष पिऊन, नाहीं तर अग्निकाष्ठें खाऊन प्राण देईन." हा उत्तरेचा विलाप ऐकून श्रीकृष्णाचें हृदय अधिकच कळवळलें. त्यानें आचमन करून, आसन घालून त्या मृत बालकास मांडीवर घेतलें, आणि सर्व जगास ऐकूं जाईल, अर्थात् सर्व जगानें नेहमीं ध्यानांत ठेवावें अशा हेतूनें शपथ करून म्हटलें, "मीं आजपर्यंत थट्टेनें सुद्धां असत्य भाषण केलें नाहीं व युद्धांतून माघारी फिरलों नाहीं; त्या माझ्या पुण्यानें हा मृत बालक जिवंत होवो. ज्याअर्थीं मला धर्म नेहमीं प्रिय आहे आणि धर्माचे अधिष्ठाते ब्राह्मण प्रिय आहेत, त्याअर्थीं अभिमन्यूचा पुत्र जिवंत होवो. मी विजयांत सुद्धां दुसऱ्याचा विरोध केला नाहीं हें जर सत्य असेल तर त्या सत्यानें या बालकाचा प्राण परत येवो. कंस आणि केशी यांचा मी धर्मानें नाश केला ही गोष्ट खरी असेल तर त्या सत्यानें हा मृत बालक पुन्हां सचेतन होवो!" असें श्रीकृष्ण म्हणत असतां हळूहळू त्या बालकाचा श्वास चालू झाला व थोड्याच वेळांत तो जिवंत होऊन 'क्यांहां क्यांहां' असें बालकाचें मधुर स्वराचें रुदन करूं

लागला! त्या रडण्याचा तो गोड आवाज ऐकून कुरुस्त्रियांना जो आनंद झाला तो कोठवर वर्णन करावा! त्यांनीं श्रीकृष्णाची पराकाष्ठेची प्रशंसा केली. उत्तरेनें उठून बालकासह श्रीकृष्णास नमस्कार केला. श्रीकृष्णाच्या आज्ञेनें ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करविलें व त्यांस पुष्कळ दक्षिणा देवविली. असो; श्रीकृष्णानें हा जो चमत्कार केला तो आपल्या ईश्वरी सामर्थ्यानें नव्हे तर केवळ सदाचरणाच्या सामर्थ्यानें केला हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. " सर्वं विश्रावयन् जगत्, " " सर्व जगताला ऐकवीत " असें. जें व्यासमहर्षींनीं येथें म्हटलें आहे, त्यांतील रहस्य ध्यानांत घेण्यासारखें आहे सत्यवचन, धर्मप्रीति, धार्मिष्ठ ब्राम्हणांचा आदर आणि धर्मानेंच दुष्टांचा निरोध ही श्रीकृष्णाची धर्मपरायणता त्यानें या वेळीं उपयोगांत आणली व अशा धर्मपरायणतेंत ईश्वरी सामर्थ्य आहे हें त्यानें जगताच्या निदर्शनास आणून दिलें ( भा० अश्व० ).

एक महिन्यानें पांडव मरुत्तानें संवर्तऋषींकडून पूर्वी यज्ञ केलेल्या ठिकाणीं पडलेल्या अपार यज्ञभांडारापैकीं धनभार घेऊन आले, तेव्हां श्रीकृष्ण त्यांस सामोरा गेला. पांडवांस श्रीकृष्णानें केलेला उपकार समजला तेव्हां त्यांस अतिशय धन्यता वाटली, व त्यांनीं त्याचें अंतःकरणपूर्वक वारंवार स्तवन केलें. नंतर श्रीकृष्णाच्या आज्ञेनें धर्मानें अश्वमेधाचा निश्चय करून व्यास महर्षींस व इतर अनेक विद्वान् ब्राह्मणांस बोलाविलें. चैत्री पौर्णिमेला त्यांनीं धर्मराजास द्रौपदीसह यज्ञदीक्षा देऊन अर्जुनाच्या संरक्षणाखालीं याज्ञिय अश्व सोडला. जे जे राजे भेटतील त्यांस सांत्वपूर्वक यज्ञास निमंत्रण कर आणि होतां होईतों विरोध करूं नको अशी धर्मानें अर्जुनास ताकीद केली होती. तो अश्व निरनिराळ्या देशांत फिरून एक वर्षानें परत आला. इकडे हास्तिनापुरांत वर्षभर निरनिराळ्या पशूंचे यज्ञ होत होते, व लक्षावधि ब्राह्मण जेवीत होते. जे क्षत्रिय, वैश्य वगैरे लोक यज्ञ पहावयास येत, त्यांचेंही आतिथ्य उत्कृष्ट होत होतें. यज्ञांतील स्तंभ, भांडीं इत्यादि सर्व वस्तु सोन्याच्या होत्या. ती अपार संपत्ति पाहून सर्व लोक आश्चर्यचकित होत. सर्व राजांस सांत्वानें अथवा पराक्रमानें जिंकून अश्वासह अर्जुन सुरक्षित परत आला, ही बातमी पोंचताच धर्मास अतिशय आनंद झाला. त्यानें व श्रीकृष्णानें अर्जुनास सामोरे जाऊन त्यास समारंभानें यज्ञमंडपांत आणिलें.

नंतर यथाशास्त्र अश्वाचा मेध होऊन सर्व राजांसह अवभृथस्नान झालें. शेवटीं दाक्षिणा द्यावयाची वेळ आली तेव्हां युधिष्ठिर म्हणाला, " अश्वमेधाची दाक्षिणा पृथ्वी होय. अर्जुनानें जिंकलेली पृथ्वी मी सर्व ब्राह्मणांना देतों. त्यांनीं विभागून घ्यावी ! मी चारी बंधूंसह व द्रौपदीसह वनांत जातों." तेव्हां चारी बंधूंनीं व द्रौपदीनें " मान्य " " मान्य " म्हणून अनुमोदन दिलें. या वेळेस तो बंधुप्रेमाचा व पतिनिष्ठेचा अत्युत्कर्ष पाहून सर्वांच्या अंगावर रोमांच उभे राहिले ! शेवटीं व्यास म्हणाले, " धर्मा, आम्हांस दिलेली पृथ्वी आम्ही तुला परत करतों ती तूं स्वीकार, आणि आम्हांस धन दे." श्रीकृष्णानेंही धर्मास व्यासांचें म्हणणें मान्य करण्याविषयीं सांगितलें, तेव्हां कोटि कोटि दक्षणा युधिष्ठिरानें ब्राह्मणांस दिली. यज्ञांतील सर्व सुवर्णभांड त्यांचेंच होतें. सारांश, मिळालेल्या सुवर्णाच्या विभागानें ब्राह्मण अतिशय आभारी झाले. व्यासानें आपला भाग कुंतीला देऊन टाकला व तिनेंही त्याचा पुढें दानधर्मच केला. युधिष्ठिरानें सर्व राजांना अपार धन देऊन संतुष्ट करून घरोघर पाठविले. श्रीकृष्ण, बलराम, प्रद्युम्न इत्यादि यादवांनाही अमूल्य रत्नें देऊन त्यानें मोठ्या दुःखानें त्यांची बोळवण केली ( भारत, अश्व० ).

हा युधिष्ठिराच्या जन्मांतील परमोत्सव श्रीकृष्णाच्या कृपेनें व साहाय्यानें पार पडल्यावर श्रीकृष्ण द्वारकेस परत आला, व अंतापर्यंतचें त्याचें पुढील आयुष्य बहुतेक तेथेंच गेलें. युधिष्ठिरानें अश्वमेधानंतर छत्तीस वर्षें राज्य केल्यावर श्रीकृष्णाचा अंत झाला असें भारतांत वर्णन आहे. यावरून श्रीकृष्णाचा अंत यानंतर छत्तीस वर्षांनीं झाला असें दिसतें. पण बहुधा १८।१९ वर्षांनींच हा प्रसंग झाला असावा असा माझा तर्क आहे. या ३६ किंवा १८ वर्षांच्या अवधींत श्रीकृष्णानें अनेक प्रसंगीं जिज्ञासूंस ज्ञानाचा उपदेश केला व गोब्राह्मणांचें अत्यंत मनोभावानें पालनपोषण केलें. सारांश, ब्रह्मण्यदेव व गोब्राह्मणहित हीं विशेषणें त्यास यथार्थ शोभूं लागलीं. ज्ञानार्थी व अर्थार्थी सत्पात्र याचक त्याजकडे नेहमीं येत, त्यांची तो कामना पुरी करी. अशा याचकांपैकीं सुदामदेवाची कथा येथें देण्यासारखी आहे. सुदामा हा श्रीकृष्णाचा सहाध्यायी होता. उज्जयिनीस गुरुगृहीं कृष्णाबरोबर त्यानें विद्याभ्यास केला होता. तो श्रीकृष्णाचा

परम भक्त असून अत्यंत संतुष्ट असे. श्रीकृष्णाचें वाढतें ऐश्वर्य ऐकून तो आनंदानें त्याची आठवण काढी. तो आपल्या व श्रीकृष्णाच्या बाळपणच्या गोष्टी बायकोस सांगे. वाढलेल्या कुटुंबाची संसारयात्रा म्हातारपणीं त्या जोडण्यास फारच कठीण जाऊं लागली; तेव्हां त्याची स्त्री त्यास म्हणूं लागली " तुम्ही नेहमीं श्रीकृष्णाची आठवण करतां आणि त्याची व आपली मैत्री आहे म्हणून सांगतां; तर आपल्या या पोराबाळांचें दैन्य नाहींसें करण्यासाठीं तुमच्या त्या वैभवशाली मित्रापासून कांहीं द्रव्य मागून आणा. " कित्येक वर्षें चाललेला हा भार्येचा आग्रह एक दिवस सुदाम देवाच्या मनास आला. " निदान उत्तमश्लोकाचें दर्शन तरी होईल " असा हेतु धरून बायकोनें भिक्षा मागून आणलेले दोन मुठी पोहे भेट म्हणून घेऊन पुरचुंडींत बांधून सुदाम्याची स्वारी निघाली, ती द्वारकेस श्रीकृष्णाच्या अत्यंत समृद्धीनें भरलेल्या मंदिरापाशीं येऊन पोंचली. दरवाजावर ब्राह्मणास मनाई नव्हतीच. यामुळें तो दरिद्री, दीन, कृश, चिंध्या नेसलेला ब्राह्मण पहारेकऱ्यांच्या हृदयांत आश्चर्य उत्पन्न करीत आंत शिरून तीन कक्षा ओलांडून गेला. तों एका मोठ्या महालांत श्रीकृष्ण रुक्मिणीच्या पर्यंकावर बसला आहे व रुक्मिणी त्यास वारा घालीत उभी आहे, असें त्याच्या नजरेस पडलें. श्रीकृष्णानें सुदाम्यास पाहातांच आनंदानें पर्यंकाखालीं उडी टाकली व धांवत पुढें होऊन ' मित्रा, फार वर्षांनीं भेटलास ' असें म्हणत सुदाम्यास कडकडून आलिंगन दिलें. त्या दोघांच्याही डोळ्यांतून त्या वेळीं आनंदाचे अश्रु वाहूं लागले. श्रीकृष्णानें सुदाम्यास पर्यंकावर बसवून रुक्मिणीनें घातलेल्या ऊन पाण्यानें त्याचे पाय स्वतः धुतले व त्या पाण्याचा नेत्रस्पर्श केला. नंतर मधुपर्कानें त्याची पूजा करून त्याचें स्वागत केलें. याप्रमाणें मलिन, कृश वर आलेल्या शिरांनीं व्याप्त झालेल्या शरीराच्या त्या ब्राह्मणाचें प्रेमातिरेकानें आदरातिथ्य केलें, हें पाहून अंतःपुरांतील लोकांस मोठें गूढ पडलें. पण त्यांच्या गुरुगृहींच्या गोष्टी जेव्हां सुरू झाल्या तेव्हां त्यांचें गूढ नाहींसें झालें. श्रीकृष्ण म्हणाला, " सुदाम्या, गुरुगृहाहून निघाल्यावर तूं लग्न केलेंस काय ? तुझा विरक्तपणा संसारांतही कायम आहे असें दिसतें. गुरुगृहीं असतां एक्या रात्रीं वादळामुळें आपण रानांतच अडकून राहिलों आणि गुरु आपल्या प्रेमानें

सकाळीं आपला शोध करीत आले तें तुला आठवतें काय ? सुदाम्या, अहाहा, ते आनंदाचे पोरपणाचे दिवस आठवले म्हणजे हृदय सद्गदित होऊन जातें. सांदीपनी महर्षींची आपल्यावर केवढी ममता. ” ज्याप्रमाणें एक हायकोर्ट जज्ज झालेला व एक गरीब शाळामास्तर राहिलेला असे दोघे कॉलेजांतील समवयस्क प्रेमी मित्र बारा वर्षांनीं भेटले असतां एकमेकांस अरे तुरे करून आनंदानें बोलत रात्रची रात्र जागून काढतात, त्याप्रमाणें गुरुगृहींच्या आठवणी काढीत श्रीकृष्ण व सुदामा यांची स्थिति झाली. शेवटीं श्रीकृष्ण म्हणाला, “ सुदाम्या, माझ्या वहिनीनें मला कांहीं तरी भेट पाठविली असेल. काढ लवकर. शुद्ध अंतःकरणाचा पुरुष जी अल्पस्वल्पही भेट भक्तीनें मला देईल ती मी स्वत: खाईन अशी माझी प्रतिज्ञा आहे. दाखव काय आणलें आहेस तें. ” हे श्रीकृष्णाचे आग्रहाचे शब्द ऐकून बिचाऱ्या सुदाम्यानें लाजत लाजत ती पोह्यांची पुरचुंडी काढिली. श्रीकृष्णानें ती सोडून त्यांतील पोहे हातांत घेतले, आणि “ वा:, असे पोहे मला कधींही खावयास मिळाले नाहींत, ” असें म्हणत एक मूठ तोंडांत टाकली. दुसरी मूठ टाकणार तों रुक्मिणीनें हात धरला. “ महाराज, एक मूठ आपल्या संतुष्टतेसाठीं इहलोकीं व परलोकीं पुरे आहे. माझा वांटा आपल्या भेटींत अर्धा आहे तो मला द्या. ” त्या पतिपत्नींचें हें सारखें प्रेम व औदार्य पाहून सुदाम्यास धन्यता वाटली. असो. ती रात्र आनंदानें गेल्यावर दुसरे दिवशीं स्नानादिकांनीं कृष्णास्त्रियांनीं त्या ब्राह्मणाची सेवा केल्यावर व त्यास सुमृष्ट भोजन दिल्यावर सुदामा घरीं जावयास निघाला. तेव्हां श्रीकृष्ण त्यास बराच दूर पोंचवावयास गेला, व त्यास त्यानें अनेक प्रिय भाषणांनीं संतुष्ट केलें. सुदाम्यानें लाजेनें द्रव्याची याचना त्याजपाशीं केली नाहीं आणि श्रीकृष्णानेंही तुला कांहीं द्रव्य पाहिजे काय असें विचारिलें नाहीं. घरीं परत जात असतां आपली बायको आपल्यास मुखस्तंभ म्हणेल आणि आपली अतिशय नाचक्की करील असें सुदाम्यास वारंवार वाटूं लागलें. “ श्रीकृष्णाचा केवढा थोरपणा ! तो मला विसरला नाहीं इतकेंच नव्हे, तर मला ब्रह्मबंधूला आलिंगन देऊन त्यानें आपल्या पर्यंकावर बसवलें ! त्या धन्य स्त्रीपुरुषांनीं माझी देवासारखी सेवा केली ! बहुधा श्रीकृष्णानें हा मूळचा अधन, यास एकदम धन दिलें तर हा उन्मत्त होऊन ईश्वरभक्ति

विसरेल, अशा समजुतीनें मला धन दिलें नसावें.'' असे नानाप्रकारचे विचार करीत तो आपल्या गांवापाशीं आला तों त्यास सर्वच विपरीत दिसूं लागलें. शहरचे सर्व लोक गीतवाद्यांसह आनंदानें त्यास सामोरे आले होते. त्यांनीं त्यास सुवर्णाच्या रथांत बसवून त्याच्या घरीं पोंचविलें. घरीं येतांच मोतीं, हिरे, लाल, पाच इत्यादि रत्नांच्या दागिन्यांनीं भरलेल्या त्याच्या पत्नीनें घराबाहेर येऊन त्यास पंचारतीनें ओवाळून नमस्कार केला व मनोमय आलिंगन दिलें. उत्तम वस्त्रें नेसलेले पुत्रपौत्रही पुढें येऊन त्यास बिलगले. शेंकडों दास व दासी घरांत उभ्या होत्या, त्यांनीं त्यास गडगंज संपत्तीनें भरलेल्या गृहांत नेऊन त्याचे श्रम परिहार केले. ही सर्व संपत्ति श्रीकृष्णानें आपल्या न कळत आपल्यास दिली हें जेव्हां त्यास समजलें तेव्हां त्याच्या नेत्रांतून खळखळ प्रेमाश्रु वाहूं लागले. ''श्रीकृष्णा, धन्य तुझी ब्राह्मणाविषयींची भक्ति! मला द्वारकेंत कांहींच कळूं दिलें नाहींस, पण हा अपर्यंत धनौघ तूं आपल्या दीन, दरिद्री गुरुबंधूला देऊन तूं त्यास आपल्यासारखें केलेंस ! केवढें तुझें औदार्य ! '' असें म्हणत त्यानें श्रीकृष्णाचें प्रीतीनें व भक्तीनें ध्यान केलें व त्याचें मनोमय स्तवन केलें. असो. त्या धन्य पतिपत्नींनीं धनानें उन्मत्त न होतां श्रीकृष्णाच्या भजनांतच आपला काळ घालविला आणि शेवटीं तीं परम पदास् गेलीं. ( भाग० अ० ८१ ).

अशा अनेक रीतींनीं ब्राह्मणांचा परामर्श घेत, संसारसुख अनुभवीत व पुत्रपौत्रांचा सोहळा पहात श्रीकृष्णाचें पुढचें आयुष्य गेलें. केवळ लीलेनें नरदेह धारण केलेल्या त्या परमात्म्यानें गृहस्थाश्रम कसा चालवावा याचें जगतास उदाहरण घालून दिलें. शेवटीं अवतार समाप्त करण्याचा समय आला व देवांशधारी यादवांचीही पृथ्वी सोडून जाण्याची वेळ येऊन पोंचली, पण श्रीकृष्णाच्या प्रभावानें वैभवाच्या शिखरास पोंचलेल्या यादवांचा अंत व्हावा कसा ? परशत्रूकडून त्यांचा नाश होणें शक्यच नव्हतें. भूमीचा भार हरण करण्याची श्रीकृष्णाची प्रतिज्ञा होती मी भारतीयुद्धानें पूर्ण झाली. पण पृथ्वीस यादवांचा भार झाला; त्यांचा नाश त्यांच्याच हातून होणें शक्य होतें. परमेश्वर बहुधा स्वतः कोणासच मारीत नाहीं. ज्यांचा नाश व्हावा अशी त्याला इच्छा होते त्यांची प्रथम तो बुद्धि हरण करतो किंवा त्यांच्यांत विशेष दुर्गुण उत्पन्न करतो. ऐश्वर्याच्या कळसास पोंचलेल्या यादवांत हळूहळू ब्रह्मद्वेष व

मद्यप्रीति हे दुर्गुण कळसास जाऊं लागले.क्षत्रियांत हेच दोष इतिहासांत वारं-वार विकोपास गेलेले दृष्टीस पडतात;पण श्रीकृष्णाच्या प्रत्यक्ष ह्यातींत,त्याच्या समक्ष, त्याच्या नगरांत, त्याचें दिव्य उदाहरण डोळ्यांसमोर असतां व त्याचा उदात्त उपदेश कानांत दुमदुमत असतां यादवांत हे दोष उत्पन्न होऊन कळसास जावे हें एका प्रकारानें आश्चर्य होय ! असो. यादवांचा नाश होण्यास कांहीं तरी दोष त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होणें जरूर होतें. कालवशानें श्रीकृष्णाचा ब्राह्मणाविषयींचा आदर त्याच्याच पुत्रास वेडेपणा-सारखा भासूं लागला. कलियुगाचा प्रादुर्भाव झाल्यानें वाडिलाची धर्मश्रद्धा व संतसेवा चिरंजीवांस म्हातारचळासारखी वाटूं लागते हे पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतें. एके प्रसंगीं विश्वामित्र, कण्व, नारद इत्यादि महर्षि श्रीकृष्णाचा अवतार संपण्यापूर्वी त्याचें दर्शन घ्यावें ह्या इच्छेनें त्यास भेटावयास आले. ह्या ब्राह्मणांचें उगीच प्रस्थ माजलें आहे, यांची कांहीं तरी कुचेष्टा करूं या, अशी सल्ला ठरून सारणप्रभृति यादव श्रीकृष्णाचा सुंदर तुंदिल पुत्र सांब यास स्त्रीचा वेष देऊन त्या ऋषींकडे जाऊन म्हणाले, "ऋषीहो, आपण त्रिकालज्ञ आहां. ही पुत्रेच्छु बभ्रूची स्त्री गर्भार आहे, हिला पुत्र होईल कीं नाहीं तें सांगा." हें ऐकून नारदप्रभृति ऋषींस संताप आला व ते म्हणाले, "ही स्त्री नाहीं, हा ब्राह्मणाविषयीं अत्यादर असलेल्या श्रीकृष्णाचा ब्रह्मद्वेषी पुत्र सांब आहे. याला उद्यां सकाळीं घोर मुसळ होईल व तेंच तुम्हां उन्मत्त यादवांचा समूळ नाश करील." दुसरे दिवशीं सांबाला खरोखरच मुसळ झालें तेव्हां सर्व यादव घाबरले व विषण्ण-वदनानें ती हकीकत त्यांनीं राजास सांगितली. वसुदेवाच्या आज्ञेनें त्या मुसळाचें चूर्ण करून त्यांनीं समुद्रांत नेऊन फेंकून दिलें. याप्रमाणें मनाचें समाधान करून यादव मद्याच्या व्यसनांत मग्न झाले व त्यास दारूच्या धुंदींत नाना प्रकारचीं पातकें करतांना लाजही वाटेनाशी झाली. पितर आणि देव यांची निंदा व द्वेष तर वाढलाच, पण पति–पत्नींच्या पवित्र संबंधाचाही परस्परें उच्छेद होऊं लागला. हा घोर प्रकार पाहून यादवांचा विनाशकाल समीप आला, असें जाणून श्रीकृष्ण उद्विग्न झाला. दिवसानु-दिवस भयंकर अपशकुन होऊं लागले. रस्त्यांतून व घरांतून असंख्य वाढलेले उंदीर दिवसाढवळ्या फिरूं लागले. पिंजऱ्यांतील मैना आपला सुंदर शब्द

विसरून वीची कूची असा अभद्र शब्द काढूं लागल्या. मोठ्या बकऱ्या कोल्ह्यासारख्या ओरडूं लागल्या. मंदिरांतून मूर्तीच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. असे घोर उत्पात पाहून वसुदेवानें यादवांची सुधारणा करण्याचा पुष्कळ यत्न केला. सुरा कोणींही पिऊं नये अशी त्यानें दवंडी पिटवली. पण लोक चोरून सुरा पिऊं लागले व यादवांचा उन्मत्तपणा कमी झाला नाहीं.

त्या यादवांतही कित्येक सत्त्वस्थ, निरिच्छ व अनपानप म्हणजे सुरेस कधींही स्पर्श न करणारे असे होते. त्यांमध्यें उद्धव अग्रणी होता. तो श्रीकृष्णाचा चुलत भाऊ म्हणजे वसुदेवाचा बंधु देहभाव याचा पुत्र असून श्रीकृष्णाचा परमभक्त होता. श्रीकृष्णाचा अंत समीप आला असें वाटून श्रीकृष्णाच्या मुखांतून शेवटला अमृततुल्य उपदेश ऐकावा या हेतूनें उद्धव श्रीकृष्णापाशीं गेला व त्यास साष्टांग नमस्कार करून गद्गद स्वरानें म्हणाला, "प्रभो, देवदेवेशा श्रीकृष्णा, तूं या कुलाचा संहार घडवून आणून लवकरच परलोकास जाणार असें दिसतें. तर तूं मला आपल्या निजधामास ने. खान, पान, आसन, शय्या इत्यादिकांत आम्ही तुझी आजवर प्रेमानें सेवा केली. तुझ्यावांचून आमची काय गति होईल !" असें उद्धवाचें भाषण ऐकून श्रीकृष्ण म्हणाला, "उद्धवा, तूं म्हणतोस तें खरें. या कुलाचा लवकरच नाश होणार आहे. देवांच्या इच्छेप्रमाणें मींही लवकरच हा लोक सोडणार आहें. पण तूं निराश होऊं नकोस. तुझ्यासारखे ज्ञानी कधींही निराश होत नाहींत. तूं स्वजनांचा स्नेह सोडून माझ्या ठिकाणीं मन लावून युक्तचित्त हो आणि सर्व जगत् आपल्या ठिकाणीं व आपल्यास माझ्या ठिकाणीं पहा. सर्व भूतांशीं प्रेम ठेवणारा, शांतचित्त, ज्ञानविज्ञानाचा निश्चय झालेला आणि सर्व विश्वांत माझा आत्मा पहाणारा मनुष्य कधींही विपन्न होत नाहीं." उद्धवानें म्हटलें, "हे योगेशा, योगसंभवा, श्रीकृष्णा, संन्यासरूपी त्याग आम्हां विषयांत आसक्त असलेल्या पुरुषांस कामाच्या तडाक्यामुळें दुष्कर आहे. तुझ्याच मायेनें मनुष्य मूढ होऊन तो मी, हा माझा, इत्यादि कल्पनांनीं ग्रस्त होऊन संसारांत बद्ध होतो, याला तरणोपाय कोणता तें मला सांग." श्रीकृष्णानें उद्धवास या वेळीं जो दिव्य उपदेश केला तो भगवद्गीतेच्या उपदेशाच्या खालोखाल महत्त्वाचा असून भागवतांत एकादशस्कंधांत

दिला आहे. त्याचा सारांश येथें देणें शक्य नाहीं. अर्जुनास जसा कर्तव्याचा उपदेश करून श्रीकृष्णानें युद्ध करण्यास तयार केलें, त्याचप्रमाणें उद्धवास कर्तव्य जो संन्यास त्याचा उपदेश करून श्रीकृष्णानें शेवटीं त्यास म्हटलें, " उद्धवा, माझ्या आज्ञेनें तूं बदरिकाश्रमाला जा व तेथें वल्कलें धारण करून वन्य फलमूल इत्यादि खाऊन माझ्या ठिकाणीं चित्त लाव, म्हणजे अंतीं परमगतीस जाशील. " श्रीकृष्णाची आज्ञा उद्धवानें शिरसावंद्य केली व त्याच्या चरणावर सद्गदित कंठानें मस्तक ठेवून त्याचा निरोप घेतला व तो तात्काळ बदरिकाश्रमास तपश्चर्या करण्यासाठीं निघून गेला.

श० पू० ३१४४ वर्षी भारती–युद्ध–वर्षाप्रमाणेंच कार्तिक वद्य अमावास्येस सूर्यग्रहण पडलें व तो वद्यपक्ष १३ दिवसांचाच झाला. शहरांत होणारे उत्पात व हा ग्रहणाचा कुयोग मनांत आणून श्रीकृष्णानें सर्वांस पर्वासाठीं प्रभासतीर्थी जाण्याची सल्ला दिली. त्याप्रमाणें सर्व यादव आपआपल्या वैभवानुरूप ध्यानांत बसून जेथें सरस्वतीनदी समुद्रास मिळाली आहे, त्या प्रभासतीर्थावर बायकामुलांसह गेले. ग्रहणाचें पर्वस्नान वगैरे झाल्यावर एके दिवशीं यादवांनीं दानमहोत्सव केला. नानाप्रकारचीं भक्ष्यें तयार करवून भोजनें केलीं. अर्थातच मेजवानीनंतर नटनर्तकांसह महापान सुरू झालें. द्वारकेंत कित्येक दिवस मद्याची बंदी असल्यासें साहजिकच प्रभासक्षेत्रांत सुरापानाचा अतिरेक झाला. श्रीकृष्णासमोर बलराम, कृतवर्मा, सात्यकि, बभ्रु इत्यादि यादववीर अतिशय सुरा प्याले. सुरेचा अंमल चढला म्हणजे मार्गील उखाळ्यापाखाळ्या निघावयाच्याच. गोष्टी भारती युद्धाच्या चालल्या. दारूच्या धुंदींत असलेला सात्यकि कृतवर्म्याची निंदा करून म्हणाला, " झोपीं गेलेल्या लहान बालकांना तुझ्यावांचून कोण नीच क्षत्रिय ठार मारील ! " प्रद्युम्नानें त्याच्या म्हणण्यास दुजोरा दिला; तेव्हां कृतवर्मा रागानें सात्यकीकडे अवज्ञेनें हात करून म्हणाला, " प्राणायाम करून बसलेल्या भूरिश्रव्याला मारणारा नीच मनुष्य तूंच का हा बोलतो आहेस ! " तेव्हां श्रीकृष्णानें निर्भर्त्सनासूचक मुद्रेनें कृतवर्म्याकडे पाहिलें. सात्यकीनें उत्तर केलें, " स्यमन्तक मण्याची चोरी करविणारा हाच, सत्राजिताला ठार मारविणारा हाच आणि द्रौपदीच्या पांच पुत्रांचे गळे दाबणारा हाच. द्रौपदीचीं मुलें, शिखंडी, प्रसेन, सत्राजित अशा कित्येक लोकांच्या

खुनाचें उसनें हें मी फेडतों. " असें म्हणून सात्यकीनें एकदम सभेत उठून तरवार उपसून कृतवर्म्याचें शिर उडविलें. तो भयंकर प्रकार पाहून कृतवर्म्याचे भोज, अंधक मित्र सात्यकीवर तरवार काढून धावले. सात्यकीच्या मदतीला प्रद्युम्न अनिरुद्ध धांवले. याप्रमाणें दोहोंकडे वीर होऊन आपसांत काटाकाटी सुरू झाली. दारूच्या धुंदींत मित्रांनीं मित्र पाहिले नाहींत, बंधूंनीं बंधु पाहिले नाहींत, व पुत्रांनीं पितरांस पाहिलें नाहीं. हजारों यादव—भोज एकमेकांशीं लढून मरण पावले. आपले पुत्र, पौत्र, मित्र मेलेले पाहून श्रीकृष्णासही राग आला. समुद्रकिनाऱ्यावर उगवलेल्या जाड व लांब एरका तृणाची एक काडी त्यानें उपटली, तों ती लोखंडाचे मुसळासारखी झाली. त्यानें जो जो मनुष्य त्याचे समोर आला त्यास त्यानें झोडपून मारलें. तें पाहून ज्यांच्या हातांत शस्त्र नव्हतें त्यांनीं त्या एरकास उपटून लोखंडाच्या मुसळाप्रमाणें मार देण्यास सुरवात केली. याप्रमाणें दारूच्या धुंदींत आपसांत मारामारी करून पांच लाख *यादव, भोज, अंधक, वृष्णि वीर मरण पावले. केवळ मुलें व बायका शिल्लक राहिल्या.

श्रीकृष्णानें दारुकास बोलावून त्यास ही भयंकर हकीकत हस्तिनापुरास जाऊन पांडवांस कळविण्याविषयीं सांगितलें. व अर्जुनानें येथें येऊन यादव-स्त्रियांना व मुलांना तिकडे घेऊन जावें असा त्याजबरोबर निरोप पाठविला. दारुकानें श्रीकृष्णास मोठ्या दुःखानें नमस्कार करून त्याचा रिकामा रथ तात्काळ हांकला. इकडे श्रीकृष्णानें प्रभासांत यादवांच्या स्त्रिया व पोरें जिवंत राहिलीं होतीं तीं जमा करून यानांत बसवून द्वारकेस पोंचविलीं. वृद्ध वसुदेव व देवकी अद्याप जिवंत होतीं त्यांच्या पायांवर मस्तक ठेवून श्रीकृष्णानें त्यास म्हटलें, " बळराम वनांत योगानें प्राणाचा अवरोध करून बसला आहे. मीही तेथें जाऊन योगानें प्राणावरोध करून हा लोक सोडतों. पूर्वी कौरवपांडवांच्या युद्धांत मीं क्षत्रियांचा भयंकर क्षय पाहिला. आतां हा यादवांचा पाहिला. यापुढें आतां माझ्यानें पृथ्वीवर राहवत नाहीं. अर्जुनास बोलावणें पाठविलें आहे तो येईल आणि मुलांस व स्त्रियांस घेऊन

* हतं पंचशतं तेषां सहस्रं बाहुशालिनाम् (भार० मो०).

जाईल. तोंपर्यंत तुम्ही त्यांचें रक्षण करा." असें सांगून श्रीकृष्ण पुन्हां त्यास नमस्कार करून शहराबाहेर पडला. त्या वेळेस सर्व स्त्री-कुमार द्वारकेंत रडूं लागले, परंतु त्या रडण्याकडे लक्ष न देता श्रीकृष्ण जेथें बलराम योगमुक्त होऊन बसला होता तेथें आला व आपणही योगानें इंद्रियांसहित मनाचा निरोध करून झाडाला टेकून डाव्या उभ्या गुडघ्यावर उजवा पाय ठेवून ब्रह्मासनांत डोळे मिटून पडला. इतक्यांत एका भिल्लानें दुरून त्या पायाच्या तळव्याला मृगाचें तोंड समजून त्याजवर नेमका बाण मारला. तेव्हां श्रीकृष्णाचा आत्मा देह सोडून निघून गेला ( भा० मो० ).

पांडवांस श्रीकृष्णाच्या निधनाची व यादवांच्या भयंकर यादवीची हकीकत दारुकाकडून कळली; तेव्हां त्यास पराकाष्ठेचें दुःख झालें. 'काल ! काल ! काल !' असा उद्गार काढीत त्यांनीं आल्या प्रसंगाचा निर्गम केला. अर्जुन एक क्षणाचा विलंब न करतां श्रीकृष्णाच्या आज्ञेप्रमाणें द्वारकेस आला. त्या निःशब्द झालेल्या निरानंद नगरांत शिरतांना त्यास अतिशय दुःख झालें. त्यास पाहून श्रीकृष्णाच्या स्त्रियांचा 'स्वजनस्य हि दुःखमग्रतो विवृतद्वारमिवोपजायते' या कालिदासाच्या उक्तीप्रमाणें तोफेच्या गोळ्यासारखा एकदम बाहेर पडलेला शोकाचा उमडा ऐकून त्याचें हृदय विदीर्ण झालें व "हा ! श्रीकृष्णा !" असें म्हणत तो मूर्च्छा येऊन खालीं पडला. सावध झाल्यावर कसेंबसें त्यांचें सांत्वन करून अर्जुन आपल्या मामाच्या भेटीस गेला. अत्यंत वृद्ध झालेला वसुदेव पुत्रशोकानें संतप्त होऊन अंथरुणास खिळला होता. त्याचे पाय अर्जुनानें धरले तेव्हां तो म्हणाला, "ज्यांनीं हजारों शत्रु जिंकले ते सर्व वृष्णिवीर आपसांत लढून मेले. पुत्र, पौत्र, मित्र, ज्ञाति, बंधु सर्व मेलेले पाहून श्रीकृष्ण येथें येऊन मला म्हणाला, "अर्जुन येथें येईल आणि तुमचा बंदोबस्त करील.जो अर्जुन तो मी,जो मी तो अर्जुन.असें समजा.मी व राम योगानें आपला प्राण सोडतों." असें सांगून श्रीकृष्ण गेला. अर्जुना, त्या पुत्रश्रेष्ठांचें मरण ऐकूनही मी अद्याप जिवंत आहे हे आश्चर्य नव्हे काय ? असो. तूं आला आहेस बरें झालें. या सर्व बायकामुलांचा बंदोबस्त कर. मी तेव्हांपासून अन्न वर्ज करून तुझीच वाट पहात होतों. मीही एकाद्या दिवसाचाच सोबती आहें." अर्जुनानें उत्तर केलें, "या शून्य नगरींत जरूरीपेक्षां क्षणभर-

सुद्धां जास्त मला राहवणार नाहीं. अनिरुद्धाचा पुत्र वज्र यास यादवांचा राजा करून मी तुम्हां सर्वांस इंद्रप्रस्थांत नेऊन बसवितों. सात दिवसांत सर्व तयारी करून आपण येथून निघूं." याप्रमाणें ठरवून अर्जुन त्या रात्रीं तेथेंच राहिला. तों पहाटेस वसुदेवाचा शोकानें काळ झाला. तेव्हां शेंकडों स्त्रियांच्या रडण्याचा वसुदेवाच्या अंतर्गृहांतून आवाज आला. निरुत्साह अर्जुनानें वसुदेवाचें और्ध्वदैहिक, त्याचें आश्वमेधिक छत्र व गृहस्थाश्रमाचे अग्नि पुढें करून यथासांग केलें. नंतर प्रभासतीर्थी जाऊन तेथें छिन्नविच्छिन्न प्रेतांनीं भरलेली यादवांच्या युद्धाची भूमि त्यानें पाहिली. श्रीकृष्ण व बलराम यांचीं प्रेतें शोधून काढून त्यांचें और्ध्वदैहिक वज्राकडून करविलें. इतर यादव-कुमारांनीं इतरांचीं प्रेतें सांपडलीं तशीं दहन केलीं. याप्रमाणें सर्वांचें प्रेतकार्य संपादून सातवे दिवशीं अर्जुन, स्त्रिया, कुमार, वृद्ध व सेवक यांसह रथादिक द्रव्य घेऊन द्वारकेच्या बाहेर पडला, तों एकदम समुद्र वाढून समग्र द्वारका पाण्यांत बुडून नाहींशी झाली. तो अद्भुत प्रकार प्रत्यक्ष पाहून सर्वांस आश्चर्य वाटलें. श्रीकृष्णाच्या प्रभावानें रत्नपुरी द्वारका निर्माण झाली होती ती त्याच्या अभावानें नाहींशी झाली असें वाटून धन्य श्रीकृष्ण ! श्रीकृष्ण !! असे उद्गार काढीत तीं माणसें आपल्या प्रवासास मोठ्या कष्टानें लागलीं.

काननें, पर्वत, नद्या अशा ठिकाणीं मुक्काम करीत अर्जुन पंचनद अथवा पंजाबच्या मुलखाजवळ येऊन पोंचला. हजारों सुंदर स्त्रिया व लक्षावधि सुवर्णाचें धन केवळ वृद्ध व कुमारांच्या संरक्षणाखालीं एकटा अर्जुन घेऊन जात आहे हें पाहून चोरट्यांच्या तोंडास पाणी सुटलें. ते दस्यु एके दिवशीं लाठ्या घेऊन त्या मंडळींवर घसरले. अर्जुनानें मोठ्या मुष्किलीनें आपल्या गांडीव धनुष्यास दोरी चढविली आणि तो अस्त्रांचें स्मरण करूं लागला, तों एकाचेंही स्मरण होईना. भात्यांतून बाण काढून सोडले तों त्याचा अक्षय्य बाणांचा भाता असून बाण संपले. शेवटीं अर्जुनानें नुसत्या धनुष्याच्या टोकानें दस्यूंस मारण्यास सुरवात केली. श्रीकृष्णाच्या अभावीं आपलाही पराक्रम नष्ट झाला, असें वाटून लज्जेनें मुख खालीं करून अर्जुन आणि यादवांचे नोकरचाकर व कुमार यांच्यानें जेवढें द्रव्य बचाविलें व स्त्रियांचें रक्षण करतां आलें तेवढें त्यांनीं केलें, बाकी दस्यूंनीं पळवून नेलें.

पंजाबांतून अर्जुन कुरुक्षेत्रांत आला तेव्हां ते निर्भय झाले. मग हार्दिक्य भोजाचा म्हणजे कृतवर्म्याचा पुत्र भोज त्याच्या मंडळीसह त्यानें मार्तिकावत नगरांत राजा स्थापन केला; युयुधान सात्यकीच्या पुत्रास त्याच्या मंडळीसह सरस्वतीतीरावर स्थापन केलें, आणि पांडवांची जुनी राजधानी इंद्रप्रस्थ येथें सर्व यादवांसह त्यानें वज्राची स्थापना केली. रुक्मिणी, गांधारी, शैब्या, हैमवती व जांबवती या श्रीकृष्णाच्या पांच पट्टस्त्रिया इंद्रप्रस्थास सती गेल्या; व सत्यभामा, लक्ष्मणा आणि मित्रविंदा या तीन तपाचा निश्चय करून अरण्यांत गेल्या. याप्रमाणें सर्व व्यवस्था लावून अर्जुन हस्तिनापुरास आला व युधिष्ठिरास त्यानें अश्रु ढाळीत सर्व हकीकत सांगितली. पांची पांडव व द्रौपदी यांनीं श्रीकृष्णाच्या शोकानें उद्विग्न होऊन विलंब न करितां परिक्षितीस राज्यावर बसविलें व सुभद्रेस हस्तिनापुरांत परिक्षितीचा व इंद्रप्रस्थांत वज्राचा सांभाळ* करण्याविषयीं ताकीद करून ते महाप्रस्थास निघून गेले !

श्रीकृष्णानंतर यादव द्वारका सोडून जे उत्तरेस गेले, ते पुन्हां द्वारकेस परत आले नाहींत. त्यांचें राज्य उत्तर हिंदुस्थानांत अनेक वर्षें नांदून शेवटचे हल्लींचे त्यांचे वंशज जाधव हे केरोलील राजपुतान्यांत राज्य करीत आहेत. जाधवांचे कांहीं वंशज दक्षिणेंत येऊन त्यांनीं देवगिरी ऊर्फ दौलताबादचें राज्य इ० स० १००० चे सुमारास स्थापन केलें; तें इ० स० १३०० चे सुमारास अल्लाउद्दिन खिलजी यानें रसातळास नेलें. इ० स० १६०० चे सुमारास शहाजीस आपली मुलगी देणारा लखुजी जाधव देवगिरीच्या यादव वंशांतलाच होता असा समज आहे. शिवाजीमहाराज, याप्रमाणें बापाकडून श्रीरामचंद्राच्या वंशांतील असून आईकडून श्रीकृष्णाच्या वंशांतील होत. लखुजी जाधवाचा वंश हल्लीं शिंदखेड व मालेगांव येथें नांदत आहे, हें सांगणें नलगे.

---

* यावरूनच परिक्षित व वज्र हे लहान असावेत, ३६ वर्षांचे नसावेत असें माझें अनुमान आहे. भारती युद्धानंतर श्रीकृष्णाचें निधन १८ वर्षांनीं झालें असें मानावें लागतें.

☆

# उपसंहार

भारती युद्धाचा अर्थात् श्रीकृष्णाचा काळ म्हणजे भरतखंडाचा अत्यंत ऊर्जित स्थितीचा काळ होय. ह्या काळीं आर्य लोकांची वस्ती बहुतेक सर्व हिंदुस्थानभर पसरली होती. आर्यांचीं राज्यें श्रीरामाच्या काळीं पंजाबांत व पूर्वेस हिमालयापासून गंगेपर्यंत पसरलीं होतीं; तर श्रीकृष्णाच्या काळीं त्यांनीं गंगेच्या दक्षिणेकडचा विंध्य–पर्वतापर्यंतचा भाग संपूर्ण व्यापला होता. गुजराथ व बंगाल या देशांतही आर्यांची तुरळक वस्ती झाली होती, व विंध्याच्या दक्षिणेसही विदर्भ अथवा वऱ्हाड यांत भोजांची वस्ती झाली होती. त्याच्याही दक्षिणेकडे सह्याद्रीच्या पठारीवर माहिष्मती, करवीर, वनवासी व रत्नपूर हीं राष्ट्रें नागकन्यांपासून उत्पन्न झालेल्या यादवांच्या वंशांनीं स्थापिलीं होती, याप्रमाणें हिंदुस्थानचा नर्मदेच्या उत्तरेकडचा भाग, नर्मदेच्या दक्षिणेस हल्लींच्या मुंबई इलाख्याचा बहुतेक भाग, हल्लींचे वऱ्हाड व निजामशाहीचे मराठी जिल्हे इतका प्रदेश त्या वेळीं आर्यांनीं व्यापला होता. यांतील आर्य राष्ट्रें अत्यंत भरभराटीस आलीं होतीं. प्रत्येक राष्ट्राचें एक मुख्य मोठें शहर असून त्याशिवाय त्यांत लहान शहरें किंवा शाखानगरें आणि ग्रामें असत. प्रत्येक राष्ट्रांतील ग्रामांची संख्या हजारोंनीं मोजली जात असे (हरि० ह० अ० ५१). अशीं हीं आर्यराष्ट्रें हिंदुस्थानांत शंभरावर होतीं ( भारत, सभा० ). हल्लींच्या मानानें तीं लहान होतीं; तथापि, एकंदरींत प्राचीन इतिहासांतील इतर राष्ट्रांपेक्षां तीं पुष्कळ मोठीं होतीं. देश अफाट असून बहुतेक सपाट, हवा सशक्त असून जमीन सकस, अशा स्थितींत या विस्तीर्ण प्रदेशांत लोकसंख्येची वाढ झपाट्यानें झाली यांत नवल नाहीं. सर्व देश माणसांनीं गजबजून गेला. प्रत्येक राष्ट्रांत कोटीपर्यंत

माणसांची संख्या झाली. सुबत्ता व सुव्यवस्था असली म्हणजे मनुष्याची वाढ किती होऊं शकते, हें अमेरिकेच्या उदाहरणावरून हल्लींच्या काळींही दृष्टीस पडतें. अमेरिकेंत जरी एकपत्नीविवाहाचा परिपाठ पहिल्यापासून चालू आहे तरीसुद्धां तेथिल सुबत्तेच्या व सुव्यवस्थेच्या अमलांत प्रारंभीं वीस वीस वर्षांत लोकसंख्या दुप्पट झाल्याचा दाखला मिळतो. मग प्राचीन काळीं हिंदुस्थानांत जेव्हां क्षत्रिय लोक अनेक स्त्रिया करीत असत, व हिंदुस्थानच्या सुपीक व सपाट मैदानांत त्यांची वस्ती वाढण्यास कोणतीच हरकत नव्हती, त्या वेळेस लोकसंख्या किती झपाट्यानें वाढली असावी याची कल्पना वाचकांत करतां येईल. धर्माची, नीतीची व सुधारणेचीही पराकाष्ठा या वेळीं भरतखंडांत झाली होती, व त्यामुळें सर्व प्रकारचीं सुखेंही या देशांत नांदत असल्यानें प्रजेची वाढ अतिशय होण्यास आणखी जोर आला. लोकांची धर्माकडे पूर्ण प्रवृत्ति असल्यानें व नवीन वसतींत ज्वरासारखे बलिष्ठ जनमार रोग उत्पन्न होत नसल्यानें धार्मिक आणि संपन्न आर्यांकडे वक्रदृष्टीनें अकालीं पाहण्यास मृत्यूही समर्थ होत नव्हता ! ( हरि० ह० अ० ५१ ). राजेही धार्मिक वृत्तीचे असल्यानें व प्रत्येकास वाढण्यास पुष्कळ वाव असल्यानें परस्परांशीं वैर करीत नव्हते. ते प्रजेपासून योग्य कर घेत असल्यानें प्रजाही संपन्न व संतुष्ट असे. धर्मानें चालणारे राजे व प्रजा जेथें आहेत, तेथें इंद्रही वेळेवर पर्जन्य कां पाडणार नाहीं, किंवा वायुही शांत व निरोगी कां वाहणार नाहीं ? अशा अनेक कारणांनीं एकंदर प्रजेची व विशेषतः क्षत्रियाची संख्या अतोनात वाढली. या असंख्य प्रजेचा भार पृथ्वीस सहन होईनासा झाला. प्रजेची अतोनात वाढ ही एक पृथ्वीस काळजीच आहे. एवढ्या प्रचंड लोकसमुदायास तिनें अन्नसामुग्री कोठून पुरवावी, हा एक तिच्यापुढें कठिण प्रश्न असतो. युरोपाची जी हल्लीं स्थिति आहे ती त्या वेळीं भरतखंडाची झाली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड इत्यादि देश जसे हल्लीं अतिशय भरभराटीस आले आहेत, शेंकडों शहरें मनुष्यांनीं गजबजून गेलीं आहेत, जिकडे तिकडे सुराज्य नांदत असल्यानें प्रजा संपन्न व आनंदांत आहेत; राहणी सुव्यवस्थित असल्यानें रोगाचें प्राबल्य बहुतेक नाहींसें झालें आहे; सारांश, सर्व तऱ्हेनें प्रजेची वाढ होत असल्यानें प्रत्येकास स्वदेश पुरा

पडेनासा होऊन प्रत्येक बाहेरच्या प्रदेशावर हळुहळू पसरत आहे, अशी जी युरोपांतील बहुतेक देशांची हल्लीं स्थिति झाली आहे, तशी त्या वेळीं हिंदुस्थानची झाली होती. श्रीकृष्णाच्या काळीं कुरु, पांचाल, शूरसेन, चेदि, करुष मगध, भोज, आनर्त, पंचनद, केकय, कोसल, विदेह इत्यादि अनेक राष्ट्रें अत्यंत भरभराटीस येऊन सुखांत नांदत होतीं; व त्यांत लोकसंख्येची वाढ अतोनात झाली होती. पृथ्वीवरचा मनुष्यांचा भार कमी होण्याचे मुख्य तीन मार्ग असतात; आपसांत लढून मरणें, परदेशांत जाणें, आणि रोगाच्या भयंकर सांथी उत्पन्न होणें. सबंध देशांतील द्राविडी वस्ती हटत हटत दक्षिणेकडे जमल्यानें तिकडे वाढण्यास वाव नव्हता. राजे लोक धार्मिक असल्यानें आपसांत लढत नव्हते. प्रजाही धार्मिक व सुव्यवस्थित असल्यानें रोगांच्या सांथीही उत्पन्न होत नव्हत्या. सारांश, पृथ्वीचा अतोनात वाढलेला भार कमी कसा होईल, याची श्रीकृष्णाच्या जन्माच्या वेळीं ब्रह्मदेवास काळजी पडली होती असें जें हरिवंशांत वर्णन आहे तें योग्य असून या वेळीं हिंदुस्थानची स्थिति अत्यंत भरभराटीची होती याचेंच द्योतक आहे. ( हरि० ह० अ० ५१ ).

असो तर, याप्रमाणें श्रीरामचंद्राचा काळ जर वाढीचा होता, तर श्रीकृष्णाचा काळ वाढीच्या परमावधीचा होता. तसाच पहिला काळ ऐतिहासिक दृष्ट्या अंधुक चंद्रप्रकाशाचा होता, तर दुसरा काळ ऐतिहासिक दृष्ट्या पूर्ण उजेडाचा व सूर्याच्या मध्यान्हीचा होता. श्रीरामाच्या काळांत भारती आर्यांनीं हिंदुस्थानांत नुकताच प्रवेश केला असून त्यांचीं राज्यें गंगापारच होतीं. श्रीकृष्णाच्या काळीं भारती आर्यांनीं हल्लींचा मद्रास इलाखा खेरीजकरून बहुतेक हिंदुस्थान संपूर्ण व्यापिलें होतें. अमेरिकेच्या इतिहासावरून हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांतील या निरनिराळ्या काळांची चांगली कल्पना करतां येईल. श्रीरामचंद्राच्या काळीं भारती आर्यांचे पुढारी सूर्यवंशी क्षत्रिय होते, तर श्रीकृष्णाच्या काळीं त्यांचे पुढारी चंद्रवंशी क्षत्रिय होते. स्पॅनिश व फ्रेंच लोकांनीं जसा अमेरिकेच्या शोधण्यांत पुढाकार घेतला, व इंग्लिश व डच लोकांनीं त्या खंडाच्या वसाहतींत पुढाकार घेतला; त्याचप्रमाणें सूर्यवंशी क्षत्रियांनीं गंगेच्या उगमापासून तों मुखापर्यंत आर्यावर्ताचा शोध लाविला, आणि दंडकारण्यासारख्या भयाण अरण्यांनीं

भरलेल्या दक्षिणेस लंकेपर्यंत उजेडांत आणलें. तसेंच चंद्रवंशी क्षत्रियांनीं मोठमोठया वसाहती करून गंगेच्या दक्षिणेकडे कृष्णेपर्यंत सर्व देश आपल्या राज्यांनीं व्यापून टाकिला. स्पॅनिश व फ्रेंच लोकांना जसें मूळच्या नरमांस-भक्षक रानटी अमेरिकन लोकांशीं झगडावें लागलें, त्याप्रमाणें सूर्यवंशी क्षत्रियांना नरमांसभक्षक राक्षसांशीं युद्ध करावें लागलें व नरमांसभक्षणाचें भयंकर पातक हिंदुस्थानांतून नाहींसें करावें लागलें. दुसरे पक्षीं इंग्लिश व डच लोकांना मूळच्या अमेरिकन लोकांपासून फारसा त्रास सोसावा लागला नाहीं, त्यांचे मुख्य शत्रु त्यांचेच भाऊबंद होते व त्यांच्याशींच त्यांना भयंकर युद्धप्रसंग पडले. त्याचप्रमाणें चंद्रवंशी क्षत्रियांना भारतवर्षांत पूर्ण वसाहत करण्यास फारसा अडथळा मूळच्या लोकांकडून झाला नाहीं, व त्यांचेही मुख्य शत्रु त्यांचेच भाऊबंद होते; व त्यांचा नाश शेवटीं आप-सांतील युद्धानेंच झाला. सारांश, श्रीरामचंद्राचा काळ व श्रीकृष्णाचा काळ यांतील मुख्य मुख्य परिस्थिति कशी भिन्न होती, याचें स्वरूप अमेरिकेच्या उदाहरणावरून चांगलें लक्षांत येते.

सूर्यवंशी क्षत्रिय व चंद्रवंशी क्षत्रिय दोघेही वैदिक धर्माचे अनुयायी असून एकंदर धर्म व नीति या बाबतींत सारखेच उदात्त आचरणाचे होते. या संबंधांत मात्र अमेरिकेच्या अर्वाचीन व हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत फरक दिसून येतो. स्पॅनिश व फ्रेंच लोक आणि इंग्लिश व डच लोक यांत ख्रिस्ती धर्म सारखाच होता, पण पूर्वोक्त लोक कॅथोलिक पंथाचे असून धर्मवेडे होते व नीतिदृष्टयाही ते अवनत होते, म्हणजे ते अतिशय क्रूर व जुलमी असून त्यांस सत्याची चाड मुळींच नव्हती असें म्हटलें तरी चालेल. त्यांच्या मागून वसाहतीस गेलेले इंग्लिश व डच हे जरी ख्रिस्ती होते तथापि ते प्रॉटेस्टंट पंथाचे असून पक्के प्यूरिटन होते. अर्थात् नीतिसंबंधानें, भूतदयेसंबंधानें त्यांचा मोठा कटाक्ष होता. या उलट हिंदुस्थानची स्थिति होती. हिंदुस्थानांत प्रथम आलेले सूर्यवंशी क्षत्रिय जितके धाडसी व शूर होते तितकेच सत्यनिष्ठ व दयावंत होते, आणि सूर्यवंशीयांमागून आलेले चंद्रवंशी क्षत्रियही शूर व धाडसी असून नीतिमान् व सत्यनिष्ठ होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. ते दोघेही शरीरानें उंच, नाकाडोळ्यांनीं नीटस व सुस्वरूप होते.

मात्र चंद्रवंशी क्षत्रिय वर्णानें थोडे काळे असावे असें अनुमान करण्यास जागा आहे. निदान गंगेच्या दाक्षिणेकडच्या उष्ण प्रदेशांत विशेषतः त्यांची वसति झाल्यानें त्यांचा रंग काळा पडला असावा. श्रीकृष्ण काळा होता, अर्जुन काळा होता व द्रौपदी काळी होती. अशा मोठाल्या व्यक्तींच्या वर्णावरून कृष्णवर्ण आर्यांची संख्या या नवीन वसाहत करण्यास आलेल्या लोकांत जास्त असावी. व्यास महर्षीस कृष्णद्वैपायन म्हणतात, यावरून व्यासही काळा होता असें दिसतें. सारांश, हल्लींचे उत्तरेकडचे पण पंजाबच्या अलीकडचे उंच मजबूत, नाकाडोळ्यांनीं नीटस, तेजस्वी, तुवर, राठोड वगैरे रजपूत किंवा सनाढ्य, मारनोळ इत्यादि ब्राह्मण पाहिले म्हणजे हे चंद्रवंशी आर्यांचे वंशज आहेत असा भास झाल्यावांचून राहत नाहीं. चंद्रवंशी क्षत्रियांत धनुर्विद्या तर होतीच, पण त्यांस मल्लविद्येचा विशेष नाद होता, व मल्लांसच करतां येणारें गदायुद्ध त्यांस प्रिय होतें. श्रीकृष्ण, बलराम, जरासंध, भीम, दुर्योधन इत्यादि महान् महान् राजेसुद्धां नामांकित मल्ल व गदायोधी होते, हें लक्षात आणलें म्हणजे हे क्षत्रिय मल्ल-विद्येचे किती भोक्ते असावेत याची कल्पना वाचकांस होईल.

विवाहपद्धतींत या दोघां क्षत्रियांचें पुष्कळ साम्य होतें. दोन्ही क्षत्रिय-जातींत विवाहकालीं कन्या मोठ्या असत हें सांगणें नको. रुक्मिणी, द्रौपदी, सत्यभामा, सुभद्रा, इत्यादि स्त्रियांच्या विवाहांचीं वर्णनें वाचलीं म्हणजे त्या काळीं क्षत्रिय-कन्या कशा पूर्ण वाढलेल्या असत, याचें चांगलें अनुमान होईल. या स्त्रिया सर्व विद्यांत सुशिक्षितही असत. लिहिणें, वाचणें, घोड्यावर बसणें, रथ चालविणें, नृत्यादि ललितकला शिकणें अशा निरनिराळ्या विषयांत त्यांस शिक्षण मिळत असे, हें रुक्मिणीच्या किंवा उत्तरेच्या वर्णनावरून स्पष्ट आहे. आर्यस्त्रियांना पति हेंच दैवत आहे, असें जें परमतत्त्व सीतेनें उपदेशिलें, तेंच द्रौपदीनें व रुक्मिणीनेंही गिरविलें. पण या पतिनिष्ठ स्त्रिया संसारांतही दक्ष असून नवऱ्यास निर्भीडपणें बुद्धिवाद सांगण्यास मागेंपुढें पहात नसत. रुक्मिणी, द्रौपदी, इत्यादि स्त्रियांच्या भाषणांचीं रम्य वर्णनें कविकल्पित आहेत, असें कदाचित् कोणी म्हणेल; पण अशीं वर्णनें त्या काळीं प्रिय होतीं यावरूनच उत्तम स्त्रियांची त्या वेळीं काय कल्पना होती याचें चांगलें अनुमान होतें. धनुर्विद्येच्या परीक्षेनें स्वयंवर करणें किंवा

मनानें पति वरणें, हेंच विवाहाचें तत्त्व त्या काळीं क्षत्रिय-स्त्रियांत मुख्यतः प्रचलित होतें. राक्षस-विवाह म्हणजे कन्येस बळानें हरण करून नेणेंही अमलांत होतें. तरी पण हरण केलेली कन्या मी दुसऱ्यास मनानें वरलें आहे असें म्हणेल तर ती विवाहास अपात्र मानीत, हें अंबेच्या उदाहरणावरून स्पष्ट दिसतें. असो. सूर्यवंशी व चंद्रवंशी क्षत्रियांत विवाहाचे रिवाज व विवाहबंधनाचें उदात्त तत्त्व सारखेंच होतें. तथापि, कांहीं चालींत त्यांच्यांत फरक होता असें म्हणावें लागतें. मुख्यतः एका स्त्रीनें एकाहून अधिक पति करण्याची चाल त्यांच्यांत अद्याप अवशिष्ट होती, हें द्रौपदीच्या उदाहरणावरून व्यक्त आहे. एकानें अनेक स्त्रिया करण्याचा प्रघात दोहोंतही सुरू होता. पण, चंद्रवंशी क्षत्रियांमध्यें तो पुष्कळ अंशानें अधिक होता. अशा स्त्रिया सर्वच आर्य किंवा क्षत्रिय नसत तर त्या अनार्य लोकांच्याही कन्यका असत असें दिसतें. चंद्रवंशी आर्य व द्राविडी लोक यांचें मिश्रण होण्यास हेच विवाह जास्त कारणीभूत झाले असावेत. अर्जुनानें उलूपी व चित्रांगदा ह्या नागकन्या केल्या, श्रीकृष्णानें जांबवती ही पट्टराणी केली व अनेक नागकन्या उप-राण्या केल्या, इत्यादि उदाहरणांवरून चंद्रवंशी राजे अनार्य स्त्रिया पुष्कळ करीत हें उघड दिसतें. हल्लीं जे आर्य द्राविडी मिश्रणाचे लोक संयुक्त प्रांतांत व सिंध, बंगाल, गुजराथ व महाराष्ट्र इत्यादि ठिकाणीं शीर्षमापनप्रमाणावरून सेन्ससच्या वेळीं दृष्टोत्पत्तीस आले ते याच मिश्रविवाहापासून उत्पन्न झाले असावे असें वाटतें.

आणखी एका विवाहाच्या बाबतीत चंद्रवंशी क्षत्रियांचें विशेषतः यादवांचें इतर क्षत्रियांहून भिन्नत्व दृष्टीस पडतें. आर्य लोकांत मामाची मुलगी करणें निषिद्ध मानलें गेलें आहे. पण, " दाक्षिणात्यानां मातुलकन्यापरिणयः अनाचारः " असें कबूल केलें गेलें आहे. मामाची मुलगी करण्याची ही चाल दाक्षिणात्य लोकांत फार जुनी किंबहुना श्रीकृष्णाच्या काळाइतकी जुनी आहे असें दिसतें. अर्जुनानें सुभद्रेशीं लग्न लावलें तें अशाच प्रकारचें. प्रद्युम्नानें रुक्मीच्या मुलीशीं लग्न केलें तें अशाच प्रकारचें. किंबहुना असा हा विवाह तिसऱ्या पिढींत रुक्मिणीनें मुद्दाम हौसेनें करवून अनिरुद्धास रुक्मीची नात देवविली ! सारांश, मामाच्या मुलीशीं लग्न करण्याचा भाचाचा हक्क आहे असें त्या वेळीं मानीत असावेत. महाराष्ट्रांत ही सम-

जुत किती खोलवर गेलेली आहे, याची कल्पना मुंजीच्या वेळीं मुलगा काशीयात्रेस जाण्यास निघाला असतां, मामानें 'मी मुलगी देतों तूं जाऊं नको,' असें म्हणण्याचा सांप्रदाय अजूनही चालू आहे याजवरून होईल. किंबहुना ही चाल महाराष्ट्राच्या भार्षेतही व्यक्त होतें. मराठ्यांत सासऱ्यास मामा, व एकंदर लोकांत बायकांनीं सासऱ्यास मामंजी म्हणण्याचा जो प्रघात पडला आहे, त्या प्रघातांत एक अति प्राचीन इतिहास भरला आहे, हें पाहून चमत्कार वाटतो. या मातुलकन्यापरिणयाच्या चालीवरून यादवांचेच वंशज हल्लींचे मराठे असावेत या अनुमानास बळकटी येते.

याप्रमाणें कित्येक बाबतींत सूर्यवंशी चंद्रवंशी क्षत्रियांचें भिन्नत्व दिसतें; तरी ते दोघे आर्यजातीचेच होतें हें निःसंशय आहे. दोघांसही वैदिक धर्माचा सारखा अभिमान असून यज्ञयागादि क्रिया दोघेही सारख्याच प्रीतीनें व थाटानें करीत. चातुर्वर्ण्याची व्यवस्था दोघांतही सारखीच प्रचालित होती. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन आर्यजाति असून त्याच्यांत अनुलोम विवाह प्रशस्त मानीत, व प्रतिलोम अप्रशस्त मानीत. एक देवयानी-ययातीचें फार प्राचीन उदाहरण मात्र याच्या उलट आहे. चातुवर्ण्याप्रमाणेंच चतुराश्रमाची व्यवस्थाही त्यांच्यात प्रचलित होती. विशेषतः सूर्यवंशी क्षत्रिया-प्रमाणें चंद्रवंशी क्षत्रियांचा ब्रह्मचर्याश्रमावर पूर्ण कटाक्ष होता. मौंजीबंधन झाल्यावर वेदविद्या व इतर विद्या पठण करण्यासाठीं गुरुगृहीं जाऊन राहण्याचा सांप्रदाय दोघांतही जारी होता. ब्राह्मणांनीं विद्या देण्याचें काम आपल्या अंगावर घेतलेंच होतें, तें त्यांनीं एकनिष्ठपणानें व निष्कामबुद्धीनें चालविलें होतें. असें विद्यादान करणारे गुरु मोठमोठ्या शहरीं रहात असत. त्यांचे आश्रम शहराजवळच्या एकाद्या उपवनांत असत. निरनिराळ्या शहरांची त्या त्या ठिकाणच्या गुरुंविषयीं ख्याति असे. अशा विद्यालयांत ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य तिघेही वेदविद्या शिकत. आणि शिवाय आपआपल्या वर्णाच्या विशिष्ट विद्या शिकत. हीं गुरुकुलें किंवा कॉलेजें म्हणजे त्या वेळच्या संस्कृतीचें एक उदाहरणीय व प्रधान अंग होतें. श्रीकृष्ण व बलराम वृंदावनांतून आपल्या बापाच्या घरीं आले तेव्हां त्यांस वेदविद्या व धनुर्विद्या शिकण्यासाठीं सांदीपनी व्यास या नामांकित गुरूजवळ मथुरेहून उज्जयिनीस पाठविलें, याजवरून प्राचीन काळीं उज्जयिनी हें प्रसिद्ध

विद्यापीठ असावें, तेथें दूरदूरचे विद्यार्थी शिकण्यासाठीं येत, असें दिसतें. श्रीकृष्णाचा सहाध्यायी सुदामदेव होता याजवरून ब्राह्मण—क्षत्रिय, गरीब—श्रीमंत एकाच गुरुगृहीं एकाच तऱ्हेनें म्हणजे गरीबी तऱ्हेनें रहात हेंही सिद्ध होतें. गुरूकरितां रानांतून लांकडें, समिधा, भाज्या वगैरे आणण्याचें शारीरिक श्रम विद्यार्थी करीत असत; आणि गुरूही शिष्यांवर पुत्राप्रमाणें प्रेम करीत. कांहीं ठिकाणीं विद्यार्थी पुष्कळ असल्यास द्रोणाचार्यांसारखे शिक्षक आपल्याच शहरीं ठेवून त्यांजकडून सर्व शिक्षण राजपुत्रांस दिलें जात असे. कौरव पांडव मिळून एकशे सहा विद्यार्थी द्रोणाचार्यांच्या स्वाधीन केले गेले होते याजवरून हें अनुमान होतें. सारांश, ब्रह्मचर्याश्रमाचा त्या काळीं हल्लींप्रमाणें फार्स नसून अविवाहित स्थितींतच कडकडीत रीतीनें वेदविद्येत व इतर विद्येंत ब्राह्मणाकडून उत्तम रीतीचें शिक्षण आर्यांस मिळत असे; व असे शिक्षण संपूर्ण झाल्यावर गुरुच्या आज्ञेनें विद्यार्थ्यांचे विवाह होत. असें शिक्षण संपूर्ण होण्यास दहा बारा वर्षांचा अवधि साधारणतः लागे, पण शिष्य विशेष बुद्धिमान् असल्यास दोन चार वर्षांतच शिक्षण पुरें होत असे. असो. गुरुगृहीं किंवा स्वतंत्र गुरु ठेवून विद्यार्जन करण्याची पद्धति श्रीकृष्णाच्या काळीं श्रीरामचंद्राच्या काळाप्रमाणेंच अमलात होती, व यामुळें राजे लोक आपआपल्या कर्मांत कुशल, धर्मनिष्ठ व नीतिमान् असत.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आपआपल्या धंद्याचें योग्य शिक्षण मिळवून गृहस्थाश्रमी झाल्यावर आपआपल्या वर्णाप्रमाणे निरनिराळे धंदे करून धर्मानें व नीतीने चरितार्थ चालवीत. प्रत्येक वर्णाचीं मुख्य मुख्य कर्तव्ये ठरलेलीं होतीं. पठन—पाठन, यजन—याजन हीं ब्राह्मणांचीं मुख्य कर्तव्यें होतीं. प्रत्येक कामाची संपूर्ण माहिती मिळवून इतर वर्णांस त्यांच्या कामाचें शिक्षण देत व त्यांच्यासाठीं यज्ञयागादि क्रिया करीत. क्षत्रियांचें मुख्य कर्तव्य राज्य करणें व युद्धांत पाठ न दाखविणें हें होतें, आणि तें कर्तव्य उत्तम रीतीनें बजावण्यास ते योग्य शिक्षणानें लायक होत असत. वैश्यांचें मुख्य काम म्हटलें म्हणजे कृषि, गोरक्षण व वाणिज्य होतें, व तेही आपल्या कामांत तरबेज असत. याप्रमाणें तिन्ही वर्णांचीं विशिष्ट कामें ठरलेलीं असत, पण कधीं कधीं अनुलोम विवाहाप्रमाणें अनुलोम रीतीनें वरिष्ठ वर्णाचे लोक खालच्या वर्णाचे

धंदे करीत; म्हणजे द्रोणकृपांसारखे ब्राह्मण युद्धाचा धंदा करीत, किंवा क्षत्रिय गोरक्षणाचा धंदा चालवीत. विशेषतः यादव हे गोपांचाच धंदा करून उपजीविका करीत होते. यादवांस राज्य करण्याचा अधिकार नाहीं असें जें मानीत त्याचें तात्पर्य हेंच दिसतें. कदाचित् हे क्षत्रिय अद्याप गोरक्षक स्थितींत असून त्यांनीं हिंदुस्थानांत आल्यावर आपलीं राज्यें स्थापिलीं नव्हतीं, तर पूर्वी आलेल्या क्षत्रियांच्या राज्यांतच त्यांनीं आश्रय घेतला होता असें दिसतें. असो. आपआपले धंदे उत्तम रीतीनें करून धर्मानें व नीतीनें गृहस्थाश्रम चालविण्यास तिन्ही वर्णांचे लोक योग्य असत व यामुळें सर्व देश संपन्न व संतुष्ट स्थितींत असे.

याप्रमाणें श्रीकृष्णाच्या जन्माच्या पूर्वी हिंदुस्थानातील आर्यांची स्थिति भरभराटीच्या कळसास पोंचली होती, व सर्व देशात शांतता व सुख नांदत होतें. पण कोणताही देश उन्नतीच्या परमोच्च बिंदूंत कायमचा राहूं शकत नाहीं. चक्राच्या गतींत जसें उच्च बिंदूला पोंचल्यावर खालच्या दिशेकडे जाणें अपरिहार्य आहे, तसा हा उच्च नीच गतींचा प्रकार जगतांत सारखा चालू रहाणारच. ज्याप्रमाणें हल्लीं सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या युरोप खंडांत एका मनुष्याच्या हट्टानें भयंकर रणकंदन माजलें आहे, त्याचप्रमाणें नीति, शौर्य, विद्या, इत्यादिकांत संस्कृतीच्या परमोच्च बिंदूस पोंचलेल्या प्राचीन भारतवर्षांत श्रीकृष्णाच्या काळींही एका मनुष्याच्या हट्टानें भयंकर युद्धाचा प्रसंग ओढवला आणि त्या युद्धापासून हिंदुस्थानच्या अवनतीस प्रारंभ झाला. भारती युद्धापासून कलियुग सुरू झालें, अशी जी आमची समजूत आहे त्याचें तरी बीज यांतच आहे. हजारों किंबहुना लाखों मनुष्यें आपल्या शौर्यानेंच व विद्येनेंच त्या युद्धांत मृत्युमुखीं पडलीं आणि देशांत लोकसंख्या कमी झाली. हें जरी एकेपरी हितावह झालें, तरी अन्यपरी दुर्बलता व त्यामागें येणारी अनीति यांचा पगडा हळूहळू देशावर बसत गेला. भारतीय आर्यांची ही परमोच्च बिंदूस गेलेली संस्कृति कशी लयास गेली, याची मीमांसा जरा जास्त केली पाहिजे. कारण श्रीकृष्णाच्या दिव्य चरित्राचें व उपदेशाचें रहस्य तिजवरून चांगलें लक्षांत येईल.

कोणत्याही देशाची सामाजिक, नैतिक व धार्मिक उन्नति सर्वतोपरी होण्यास त्या देशाच्या लोकांत प्रवृत्ति व निवृत्ति या दोहोंचें सेवन योग्य

रीतीनें होत असलें पाहिजे, ही गोष्ट श्रीरामचरित्राच्या उपसंहारांत दाखविली गेलीच आहे. या वृत्तींच्या यथायोग्य सेवनांत अंतर पडलें म्हणजे समाज निकृष्ट स्थितीकडे वळतो. जेव्हां कोणताही समाज केवळ प्रवृत्तिपरायण होतो, किंवा त्यांत निवृत्तीचें अत्यंत स्तोम माजून तो पोकळ निवृत्तीच्या फेऱ्यांत सांपडतो त्या वेळेस तो समाज खालीं जाऊं लागतो. " भौतिक सुखाच्या अत्यंत स्वाधीन झालेला समाज किंवा मनुष्य अवनतीस गेलाच पाहिजे; उलटपक्षीं अत्यंत निरिच्छपणें किंवा निराशपणें राहणे समाजाला किंवा मनुष्याला शक्य नाहीं. " ( श्रीराम च० पा० २८२ ). सारांश, मनुष्याची उन्नति होण्यास आधिभौतिक व आध्यामिक दोन्ही सद्‌गुण त्याच्या अंगीं असले पाहिजेत. भारती आर्यांच्या अंगीं उत्साह, तेज, उद्योग. साहस हे आधिभौतिक अथवा प्रवृत्तींतील सद्‌गुण आणि धर्म, नीति, तप, अनासक्तता हे आध्यात्मिक अथवा निवृत्तींतील सद्‌गुण त्या वेळीं सारखे वसत होते; आणि म्हणूनच ते या वेळीं उन्नतीच्या परमोच्च बिंदूस पोंचले होते. यापुढें या गुणांच्या समतोलपणांत अंतर पडलें. एकीकडे प्रवृत्तीचें प्राबल्य झालें तर दुसरीकडे निवृत्तीचें स्तोम माजलें. प्रवृत्तीच्या प्राबल्याचा पहिला परिणाम म्हटला म्हणजे लोभ होय. जगतांतील प्रत्येक वस्तु मला पाहिजे अशी इच्छा या वेळीं मनुष्यांत उत्पन्न होते. या जगतांत जेवढें धन आहे, जेवढी भूमि आहे, जेवढीं रत्नें आहेत तीं सर्व मला असावींत असें त्यास वाटूं लागतें ! ! ! " यत्पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः । नालमेकस्य तत्सर्वमिति मत्वा शमं व्रजेत् " या सुप्रसिद्ध श्लोकांत मर्मज्ञ व्यासानें उपदेशिल्याप्रमाणें जगतांतील सर्व उपभोगजात एकाला मिळाले तरी पुरेसे व्हावयाचे नाहीं. हें जाणून मनुष्यानें शमप्रधान वृत्तीनें राहिलें पाहिजे. पण हा विचार लोकांतून विशेषतः राजेलोकांतून नाहींसा होतो, आणि सर्व उपभोग्य वस्तूंची जननी जी भूमि ती सर्व आपल्यास असावी असा हव्यास उत्पन्न होतो. या हव्यासाच्या मागून हळूहळू इतर दुर्गुण समाजांत खेळूं लागून महत्त्वाकांक्षा, कपट, जुलूम इत्यादिकांचें प्राबल्य सुरू होतें; आणि शेवटीं वैर उत्पन्न होऊन समाज अथवा राष्ट्र क्षयास जातें. पृथ्वीचा भार कमी करण्यासाठीं, व तदनुसारानें भारती आर्यांचा ऱ्हास होण्यासाठीं, ब्रह्मदेवानें या वेळीं आर्यभूमींत

लोभाचें बीज पेरलें; आणि नाशाचीं केंद्रस्थानें तीन ठिकाणीं उत्पन्न केलीं. कंस, जरासंध आणि दुर्योधन या तीन लोभी व महत्त्वाकांक्षी व्यक्ति उत्पन्न करून त्यानें आपलें इष्ट कार्य तडीस नेलें. लोभाच्या व महत्त्वाकांक्षेच्या भरीस पडून कंसानें अवरंगजेबाप्रमाणें बापास कैद करून राज्य बळकाविलें, आणि नंतर या दुष्ट कृत्याच्या समर्थनार्थ तत्पक्षी लोकांवर जुलूम मांडला. जरासंधानें शेंकडों क्षत्रिय कैद करून पारमैश्वर्य संपादण्यासाठीं त्यांचा पुरुष-मेध करण्याचा विचार चालविला ! दुर्योधनानें पांडवांची संपत्ति व राज्यें द्यूतांत हरण करून कराराप्रमाणें परत देण्याची वेळ आली तेव्हां सुईच्या अग्रानें निघेल इतकी मृत्तिकासुद्धां देण्यास मी तयार नाहीं असे साफ सांगि-तलें ! अर्थातच भयंकर रणसंग्राम माजून अतिशय प्राणहानि झाली. लोभास बल व संपत्ति यांचा पाठिंबा असला म्हणजे हीं रणें फारच भयंकर होतात. तशांत दोन्ही पक्षांची संस्कृति उच्च असेल व शौर्यादि गुण सारखे असतील तर हीं युद्धें किती हानिकारक होतात, याचा अनुभव प्राचीन कालापासून हल्लींच्या युरोपीय युद्धापर्यंत जगतास येत आहे. " When Greek fights Greek, then the tug of war is terrible " अशी एक म्हण इंग्रजींत आहे. भारती युद्धांत याच कारणाने अठरा अक्षौ-हिणींतून दहाच माणसे शिल्लक राहिलीं. असो. तर लोभाचें विष पेरून ब्रह्मदेवानें अथवा नियतीनें भारती आर्यांच्या नाशास सुरवात केली. अशा विलक्षण प्रसंगीं श्रीकृष्णाचा अवतार झाला होता, हें लक्षात ठेवले पाहिजे. प्रवृत्तीच्या नादास लागून लोभास व महत्त्वाकांक्षेस बळी पडून आपसांत रणें माजण्याच्या वेळेस निर्लोभतेचें उदात्त उदाहरण घालून देण्यास बुद्धि, व पराक्रम आणि क्षिप्रकारित्व यांनीं सत्याची बाजू संभाळण्यास श्रीकृष्ण पुढें आला होता. अशी निर्लोभ वृत्तीचीं उदाहरणें इतिहासांत फार थोडीं सांपडतात. जें निर्लोभतेचें काम वाशिंग्टननें अमेरिकेंत स्वातंत्र्य-युद्धाच्या वेळीं केलें किंवा पुढें युनायटेड् स्टेट्समध्येंच दक्षिण व उत्तर संस्थानांत गुलामगिरी नाहींशीं करण्याच्या कामीं जें आपणांत रण माजलें त्या वेळीं सत्पक्षानिष्ठ, निश्चयी ॲब्राहाम् लिंकन् यानें जें काम केलें, किंवा हल्लींच्या युरोपीय महायुद्धाचे प्रसंगीं जें काम प्रेसिडेंट वुइल्सन् करीत आहे, तशा प्रकारचें, किंबहुना त्याहून उदात्त कार्य, श्रीकृष्णास राजकीय उलाढालींत

करावयाचें होतें हें लक्षांत घेतलें म्हणजे श्रीकृष्णाच्या राजकीय कामगिरीचें महत्त्व आपल्या निदर्शनास येईल.

प्रवृत्तिपरायण झालेल्या लोकसमाजास निवृत्तीचा धडा शिकविणें हें महत्त्वाचें कार्य जसें श्रीकृष्णास राजकीय बाबतींत करावें लागलें तसेंच दुसऱ्या बाजूनें भलत्याच दिशेस वाहूं लागलेल्या निवृत्तीच्या पुरासही श्रीकृष्णास या वेळीं बांध घालावा लागला. त्या वेळीं निवृत्तीचेंही पोकळ स्तोम कसें माजलें होतें, व एकंदर धार्मिक बाबतींत गैरसमज कसे उत्पन्न झाले होते हें येथें विस्तारानें दाखविलें पाहिजे. श्रीकृष्णाचा काळ म्हणजे औपनिषद् विचारांचा काळ होय. श्रीकृष्णाच्या उपदेशिलेल्या दिव्य भगवद्गीतेचें रहस्य नीट कळण्यासाठीं या काळीं धार्मिक समजुती कोणत्या प्रचलित होत्या हें पाहिलें पाहिजे. वेद, वेदान्त, सांख्य आणि योग हीं मतें मुख्यतः त्या काळीं प्रचलित असून प्रत्येक मत सर्वच गोष्टी आपल्या बाजूला ओढीत होतें, या मताचे हल्लींचे सूत्रग्रंथ जरी अद्याप निर्माण झाले नव्हते, तथापि हीं मतें त्यांच्या त्या मुख्य मुख्य सिद्धांतांसह प्रस्थापित झालीं होतीं, व तीं एकमेकांचा निषेध करून आपआपल्याच पोळीवर तूप ओढीत होतीं. कित्येक लोक वेदांत सांगितलेलीं यज्ञयागादि कर्मेंच मनुष्यानें करावीं आणि स्वर्गाची प्राप्ति करून घ्यावी असें म्हणत, तर कित्येक लोक कर्म बिलकुल न करतां " पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति " या बृहदारण्यकोक्तीप्रमाणें संसार सोडून अरण्यांत जावें, असें म्हणत. आणि हा वाद सुशिक्षित लोकांत चालला असतां बहुजनसमाज विशेषतः मिश्रसमाज आणि शूद्र व स्त्रियां यांजला कशाचाच आधार नव्हता. कारण त्यास वैदिक कर्म करणें शक्य नव्हतें, किंवा औपनिषादिक संन्यासही मोकळा नव्हता. अशा परिस्थितींत श्रीकृष्णानें भगवद्गीतेचा दिव्य उपदेश करून एकीकडे कर्मांचें बंड मोडलें तर दुसरीकडे निवृत्तीचें, अर्थात् भ्रांत निवृत्तीचें मोडलें आणि सर्व लोकांस सुगम असा भक्तिमार्ग नवीन प्रतिपादन केला. या सिद्धांताचें आपण आणखी ऐतिहासिक विवेचन करूं.

प्राचीन भारती आर्य प्रथम हिंदुस्थानांत आले त्या वेळीं त्यांची मानसिक स्थिति कशी होती हें ऋग्वेदांतील अनेक ऋचांवरून चांगलें दिसून

येतें. हे ऋग्वेद–कालीन आर्य ताज्या दमाचे व नव्या जोमाचे असून आनंदी, शूर आणि जगतांतलि उपभोग्य वस्तूंचा योग्य उपभोग घेणारे होते. ते इंद्र, वरुण इत्यादि देवतांपाशीं सुंदर स्त्रिया, वीर पुत्र आणि दमदार घोडे मागत. ते स्वतः सोमरस पीत आणि आपल्या प्रियदेवतांनाही सोमरस पिण्यास आव्हान करीत. ते स्वतः मांस भक्षण करीत, आणि यज्ञांत पशु मारून देवतांस मांस अर्पण करीत. त्यांचें अंतिम साध्य स्वर्ग असून तोही अशाच प्रकारचा म्हणजे सुख व ऐश्वर्य भोगण्याचें स्थान होता. सारांश, हे प्रथमचे आर्य प्रवृत्तीचे भोक्ते होते, तरी पण त्यांच्यांत निवृत्तीचें बीज अगदींच नव्हतें असें नाहीं. कारण कित्येक वैदिक ऋचांतून त्यांच्या निवृत्तिप्रधान प्रार्थना आपल्यासमोर उभ्या आहेत.हेच निवृत्तीचें बीज भारती आर्य हिंदुस्थानांत आल्यावर गंगासरस्वतींच्या दरम्यानच्या ब्रह्म-भूमींत मोठ्या वृक्षरूपास पोंचून त्यास औपनिषत्क विचाररूपी अत्यंत मनोहर व रसभरित फळें आलीं आणि सर्व विश्व नश्वर आहे किंबहुना स्वर्गही नश्वर आहे, असें त्यांच्या निदर्शनास येऊन तप आणि अरण्यवास यांची त्यास गोडी लागली. यज्ञाचा मार्ग त्यांनीं सोडला नाहीं, पण यज्ञाच्या बरोबरीला तप नेऊन ठेविलें. स्वर्गापेक्षां मोक्ष हाच परमपुरुषार्थ आहे असें ते मानूं लागले. सर्व सृष्टि यज्ञ करीत आहे, प्रजापतिही यज्ञ करीत आहे, असे पूर्वी ते म्हणत. आतां सर्व सृष्टि आणि प्रजापति, इंद्र सुद्धां तप करीत आहेत अशी त्यांची भावना झाली. सर्व उपभोग्य वस्तूंचा त्याग करून सर्व कर्मांचा संन्यास करणें हाच मोक्षाचा उपाय त्यांस दिसूं लागला. कोणत्याही वस्तूची इच्छा करणें म्हणजेच दरिद्रीपणा कबूल करणें आहे, व कशाचीही इच्छा नसणें हीच ऐश्वर्याची परमावधि होय असें ते म्हणूं लागले. सारांश, संसार सोडून अरण्यांत जाऊन शमप्रधान बुद्धीनें अकाम स्थितींत राहणें, हें मनुष्याचें परम कर्तव्य होय असें वेदान्ती तत्त्व-वेत्त्यांस वाटूं लागलें. आशिष्ट, द्रढिष्ठ, बलिष्ठ अशा सार्वभौमाला जें सुख त्याच्या सहस्रपट सुख अकामहत श्रोत्रियाला, असा त्यांचा निश्चय झाला. ही वेदांत्यांचीच कल्पना नव्हती तर जगदुत्पत्तीचा स्वतंत्र रीतीनें विचार करणाऱ्या कपिलादि द्वैतमतवाद्यांचीही कल्पना अशीच होती. सारांश, मंत्रकाळीं कर्मवाद्यांची प्रवृत्तिपरायणता कळसास गेली तर उपनिषदांपूर्व

व तत्कालीं निवृत्तिवाद्यांची निवृत्तिपरायणताही कळसास जाऊं लागली.

जगताच्या इतिहासाकडे पाहिलें तर मनुष्यसमाज याप्रमाणें प्रवृत्तीच्या व निवृत्तीच्या प्रकृष्ट बिंदूमध्यें वारंवार हेलकावे खात आला आहे असें दिसून येईल. घड्याळाच्या लंबकाप्रमाणें तो एकदां प्रवृत्तीच्या परमबिंदूस जातो, आणि तेथून परतून हेलकावा खाऊन निवृत्तीकडे वळतो; तो जातां जातां निवृत्तीच्या परमोच्च बिंदूस जाऊन पुन्हा हेलकावा खाऊन प्रवृत्तीकडे वळतो, असाच अनुभव आजवर इतिहासांत दिसून आला आहे. ग्रीक लोकांत होमरच्या वेळेस प्रवृत्तीचें पूर्ण प्राबल्य होतें असें दिसतें; तें हळूहळू कमी होऊन पायथ्यागोरासच्या वेळेस लोक निवृत्तीकडे वळले. पायथ्यागोरासचे अनुयायी मद्यमास वर्ज करीत; इतकेंच नव्हे, तर विवाह सुद्धां न करणें श्रेयस्कर मानीत. या वृत्तीचा कळस होऊन डायोजेनिस हा सर्वसंग परित्याग करून एका पिपात जन्मभर राहिला. साहाजिकच याच्या उलट दिशेला एपिक्यूरसने जाण्यास प्रारंभ केला. निसर्गानें प्राप्त होणारीं सुखें सदाचरणानें भोगून मनुष्यानें आनंदांत दिवस घालवावे,असे त्याचें मत होतें. हेंही मत हळुहळू प्रबल होऊन प्रवृत्तीच्या दुसऱ्या टोंकास लोक गेले, आणि सुखोपभोग हेच जीविताचें इतिकर्तव्य मानू लागले. अशा रीतीनें ग्रीक लोक व तदनुयायी रोमन लोक ऐषआरामात दंग झाले. ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्यास हीच त्याची विषयलोलुपता कारण झाली. या वेळीं ख्रिस्ती धर्मांत निवृत्तीचें स्तोम शिरलें होतें. ख्रिस्ती लोक लग्न न करणें हे प्रशस्ततर मानूं लागले होते. निदान एक बायको आमरणान्त करून तिचाही घटस्फोट न व्हावा अशी त्याची शिस्त होती. तसेंच आमरणान्त अविवाहित राहून शारीरिक तप करून आध्यात्मिक सामर्थ्य वाढविणारे संन्यासी अथवा मंक त्यांच्यांत होऊं लागले होते. इंद्रियासक्तास इंद्रियांचा जय करणाऱ्या तपस्व्यांचा मनोनिग्रह नेहमीं दिपवून सोडतो. अर्थातच निवृत्तिप्रधान ख्रिस्ती धर्माचा पगडा, सर्व प्रकारची अनीति बोकळलेल्या ग्रीक व रोमन समाजावर सहजच बसला आणि त्या लोकांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार झपाट्यानें झाला.

ही निवृत्तिप्रधान वृत्ति मूळ ख्रिस्ती धर्माची नव्हती. येशू ख्रिस्ताचें मत ज्यू लोकांच्या निवृत्तिपर आचारांच्या विरुद्ध होतें. हे लोक उपासानें

आपल्या देवास संतुष्ट करीत. मद्यमांसापासून निवृत्त होऊन अविवाहित राहून देवाची भक्ति करणें हाच मुक्तिमार्ग आहे असें ते मानीत. त्यांच्या मताच्या विरुद्ध येशू खिस्त होता. " कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः । मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ " या गीतेंतील वचनाप्रमाणें येशूचेही मत होतें. पण हळूहळू खिस्ती धर्मात निवृत्तीचें प्रस्थ शिरून वाढूं लागलें, आणि मठसंस्था त्यांच्यांत अस्तित्वांत येऊं लागल्या. खिस्ती धर्माधिकाऱ्यानें लग्न करूं नये असा निर्बंध तर त्यांच्यांत लवकरच उत्पन्न झाला; इतकेंच नव्हे तर शेंकडों किंबहुना हजारों पुरुष व स्त्रिया संसार सोडून मंक्स् व नन्स् म्हणजे जोगी किंवा जोगिणी होऊं लागल्या ! कालगतीनें हें निवृत्तीचे स्वरूप केवळ पोकळ झालें. खरी विषयपराङ्मुखता नाहींशी होऊन दर्शनी मात्र राहिली आणि अनेक प्रकारचे अनाचार त्यांच्यांत चालू झाले. अखेरीस निवृत्तीच्या या पोकळ स्वरूपाचा कळस झाला, तेव्हां ल्यूथरच्या वेळेपासून खिस्तीधर्माचें तोंड प्रवृत्तीकडे फिरलें. प्रवृत्तीचें योग्य रीतीनें सेवन करणें म्हणजे अधर्म नव्हे असें प्रस्थापित होऊन प्रॉटेस्टंट मत जोरांत आलें. सध्यां हें मत दुसऱ्या बाजूकडे म्हणजे प्रवृत्तीच्या परमोच्च बिंदूकडे जाऊं पाहत आहे असें म्हटलें असतां चालेल. पाश्चात्य लोकांची हल्लींची भौतिक उन्नति व आधिभौतिक सुखाविषयींची लालसा लक्षांत आणली म्हणजे पाश्चात्य समाजाचा लंबक प्रवृत्तीच्या परमोच्च बिंदूकडे जात आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पाश्चात्य लोकांच्या वरील अत्यंत संक्षिप्त व त्रोटक हाकिकतीवरून मनुष्यसमाज प्रवृत्ति व निवृत्ति यांच्यामध्यें कसे हेलकावे खातो व दोन्ही वृत्ति समतोल ठेवून त्यांचें योग्य रीतीने नेहमीं सेवन करणे हें मनुष्यसमाजास किती कठीण आहे याची कल्पना वाचकांस होईल. आपल्या देशांतही जनसमाज पूर्वीपासून असेच हेलकावे खात आला आहे, असें ऐतिहासिक समालोचनानें दिसून येईल. फार प्राचीन काळीं आर्यांचे परमपूज्य ऋषि या दोन्ही वृत्तींचा योग्य आश्रय करून वागत असत, असें त्यांच्या आश्रम व्यवस्थेवरून स्पष्ट दिसतें. दोन आश्रम प्रवृत्तीचे तर दोन निवृत्तीचे. ' यौवने विषयैषी ' तर ' वार्धके मुनिवृत्तिः ' अशी त्यांची रहाणी होती. ऋग्वेदकालाच्या अखेरीला प्रवृत्तीचें प्रस्थ माजलें. यज्ञयागादि क्रिया अत्यंत

भानगडीच्या व खर्चाच्या झाल्या. यज्ञकर्में मोठ्या डामडौलानें करून स्वर्ग-सुख प्राप्त करून घ्यावें हीच ब्राह्मणक्षत्रियांनीं इतिकर्तव्यता मानली, आणि वाजपेय, राजसूय, अश्वमेध किंबहुना पुरुषमेध यांचें प्रस्थ त्यांच्यांत माजलें ! अशा वेळीं उपनिषदांचे उदात्त विचार सुरू झाले. संसारसुखापेक्षां आध्यात्मिक सुखाचें महत्त्व वेदांती लोकांस अधिक वाटूं लागलें. निरिच्छ वृत्तीनें अरण्यांत राहून तप करणें किंवा ब्रह्माचा निदिध्यास करणें यांतच मनुष्य-जन्माचें साफल्य आहे असें विचारवंतांनीं ठरविलें. हळूहळू ही निवृत्ति वृत्तिही दुसरीकडे कळसास गेली. उठला तो वनात जाऊन तप करूं लागला. पाहिजे त्यानें पाहिजे त्या स्थितींत संन्यास घेऊन ब्रह्मज्ञानाचा मार्ग सुधारावा असें होऊं लागलें. ह्या वेळीं श्रीकृष्णानें आपल्या दिव्य भगवद्गीतेचा उपदेश करून जनसमाजास ताळ्यावर म्हणजे प्रवृत्ति आणि निवृत्ति यांच्या मध्यवर्ती बिंदूवर आणण्याचा प्रयत्न केला. तप करूं नये किंवा संन्यास घेऊं नये असें त्यांचें मत नव्हतें. तपाची किंमत श्रीकृष्ण पूर्णपणें ओळखून होता. तपनशील मनुष्यासच सुखाची खरी किंमत समजते. शारीरिक सामर्थ्य व आध्यात्मिक तेज तपानेंच संभृत होते. पण तप हेंच अंतिम-ध्येय अशा कल्पनेनें शरीराचें व्यर्थ कर्षण मात्र करणें चांगलें नव्हे हें उघड आहे. संन्यासही पाहिजे तेव्हां क्षणिक वैराग्यानें किंवा मनाच्या कमजोर-पणानें घ्यावयाचा नाहीं; तर अंगीं पूर्ण वैराग्य बाणलें असतां व जगताच्या नश्वरत्वाची पूर्ण जाणीव चित्तांत बिंबली असता घ्यावयाचा आहे. असें न होतां उठला सुटला क्षणभर टिकणाऱ्या वैराग्यानें संन्यास घेऊन अरण्याचा आश्रय करूं लागेल तर शहरांतील गर्दी मोडून अरण्यांत गर्दी होईल, यापेक्षां जास्त कांहीं साध्य होणार नाहीं. किंबहुना समाजाचें नुकसान होऊन समाजांत अनीति माजेल. अशी स्थिति खरोखरच पुढें बौद्धांच्या भरभराटीच्या वेळीं झाली; आणि जंगलांतील विहार शहरासारखे मोठे होऊन दुराचारी भिक्षूंनीं व संन्यासिनींनीं भरून गेले. असो. उप-निषदांच्या वेळीं निवृत्तीचें प्रथम बंड वाढूं लागलें, तेव्हां तें श्रीकृष्णानें आपल्या दिव्य उपदेशानें मोडलें. वेदान्त, सांख्य व योग यांच्या भ्रांत कल्पनांनीं संसारत्याग हेंच आयुष्याचें इतिकर्तव्य असें जे लोक मानूं लागले होते, त्यास त्यांनीं आळा घातला. संसार सोडून अरण्यांत जाऊन बस-

त्यानें संसार सुटत नाहीं.उलटपक्षीं संसारांत लोलुप झाल्यानेंही मनुष्यास खरें सुख मिळत नाहीं. प्रत्येक गोष्टीस मध्यबिंदु आहे व यांतच राहून मनुष्यास परमगति मिळूं शकते. एके पक्षीं शारीरिक कर्माचा आत्यंतिक त्याग करणें अशक्य आहे, तर दुसरे पक्षीं शारीरिक सुखात अत्यंत निमग्न होणेंही हानिकारक आहे. जो योगी युक्ताहार व युक्तविहार असेल किंवा जो संन्यासी मनानें कर्मफलाचा त्याग करून कर्म करीतच राहील तोच परम-गतीला जाईल. सारांश, श्रीकृष्णानें ऐकान्तिक निवृत्तीचा किंवा ऐकान्तिक प्रवृत्तीचा निषेध केला आणि लोकांस मध्यवर्ती बिंदूवर आणण्याचा प्रयत्न केला.

श्रीकृष्णाच्या या दिव्य उपदेशाचाही कालक्रमानें विपर्यास झाला हें सांगणें नकोच. शेंकडो वर्षांच्या अवधींत श्रीकृष्णाच्या या उपदेशाचा भलताच अर्थ समजला जाऊन प्रवृत्तीकडे वळलेला जनसमाज, घड्याळाच्या लंबकाप्रमाणें प्रवृत्तीच्या परमावधीला गेला. असें जाणें अपरिहार्यच होतें. श्रीकृष्णानंतरच्या अडीच हजार वर्षांच्या काळांत जनसमाजांत प्रवृत्तीचें प्राबल्य इतकें माजलें कीं, कृष्णभक्ति किंवा भागवतमत म्हणजे एक सुखो-पभोगाचें साधन आहे असें लोकांस वाटूं लागलें.जगांतील भौतिक सुख भोगणें हीच मनुष्याची इतिकर्तव्यता वाटूं लागली. अर्थातच समाज निवृत्तीकडे वळला आणि बुद्ध महावीर इत्यादि धर्मोपदेशक उत्पन्न होऊन त्यांचें निवृत्ति-पर मत लोकांत पसरूं लागलें. पण हळूहळू कालावधीनें जनसमाज दुसऱ्या बाजूनें निवृत्तीच्या परमावधीस गेला; आणि हजारों बौद्ध आणि जैन भिक्षु आणि भिक्षुकिणी यांनीं गच्च भरलेले—शहरवजा झालेले—विहार अनीतीचें माहेरघर बनले. साहाजिकच समाज उलट खाऊन पुन्हा प्रवृत्ती-कडे वळला. तो इतका कीं, जैन व बौद्ध यांनीं वेदास झुगारून देऊन अरण्यवास व संन्यासास गादीवर बसविलें होतें तर मंडनमिश्रादि नवीन मंडळींनीं वेदास पुन्हा गादीवर बसवून मद्यमांसाचें सेवन पुन्हां सुरू केलें; आणि संन्यासास पदच्युत करून त्यास कलिवर्जीत टाकलें. खोटया संन्या-शांनीं संन्यासास त्या काळीं इतक्या नीच स्थितींत आणून सोडलें होतें कीं, संन्यासी म्हटला म्हणजे मंडनमिश्राच्या डोक्याची तिडीक उठे. याप्रमाणें प्रवृत्तीकडे, कर्माकडे, सुखोपभोगाकडे झुकून समाज दुसऱ्या दिशे.

कडे वाहूं लागला, तेव्हां लवकरच श्रीमच्छंकराचार्यांनीं निवृत्तीला पुन्हां जागृत करून व संन्यासास योग्य स्थानीं बसवून समाजास मध्यबिंदूवर आणिलें. पण निवृत्तीचा पुन्हा जोर झाला तेव्हां रामानुज, मध्व इत्यादि प्रवृत्त्याभिमानी धर्मोपदेशक उत्पन्न होऊन त्यांनीं समाजास पुन्हां प्रवृत्तीकडे वळविलें. तें इतकें कीं, पुढें वल्लभाचार्यांचें मत उत्पन्न होऊन त्याचा अज्ञ व मूढ लोकांत भलताच विपर्यास झाला. असो. याप्रमाणें आपल्या देशांत लोकसमाज आजवर प्रवृत्ति व निवृत्ति यांच्यामध्यें कसे हेलकावे खात आला आहे, याचें दिग्दर्शन वरील त्रोटक ऐतिहासिक समालोचनावरून होईल.

श्रीकृष्णाच्या दिव्य उपदेशाचें ऐतिहासिक महत्त्व नीट लक्षात येण्या-साठीं वरील समालोचन जरूर आहे. श्रीकृष्णाच्या काळीं कित्येक लोक वैदिक कर्में करणें हीच मनुष्याची इतिकर्तव्यता म्हणणारे समाजास एकी-कडे ओढीत होते. तर संसार सोडून अरण्यांत जाऊन औपनिषदिक पुरु-षाचा निदिध्यास करणें हाच परम पुरुषार्थ मानणारे दुसरीकडे ओढीत होते. दुर्योधन किंवा पुरुषमेध करूं इच्छिणारा जरासंध हा पूर्वोक्त मताचा निदर्शक होता, तर ऐन युद्धप्रसंगीं अरण्यांत जाऊन संन्यास घेऊं इच्छिणारा अर्जुन हा दुसऱ्या मताचा निदर्शक होता.एकास श्रीकृष्णानें बलानें ताळ्यावर आणलें तर दुसऱ्यास भगवद्गीतेच्या दिव्य उपदेशानें आणलें. पूर्वाचार्यांनीं उपदेशिलेले सिद्धांत सर्व धर्मोपदेशकाप्रमाणें श्रीकृष्णानेंही अमान्य केले नाहींत. वैदिक कर्माभिमान्यांची कर्मनिष्ठा, सांख्याची ज्ञाननिष्ठा, योगाभि-मान्यांचा चित्तनिरोध आणि वेदांत्याचा संन्यास हें त्यानें सर्व मान्य केलें. पण इतिकर्तव्यता काय ती हीच असें जें मत प्रत्येक प्रतिपादित होते त्यांचा त्यानें निषेध केला. त्या त्या मतास योग्य महत्त्व देऊन सर्वांचा सम-न्वय करून त्यानें त्याचा उपयोग आपल्या नव्या कर्तव्यसिद्धांताकडे म्हणजे निरपेक्ष फलेच्छारहित कर्माकडे केला. मनुष्यानें आपलें कर्तव्य कसें बजवावें हें त्यानें भगवद्गीतेंत मुख्यतः प्रतिपादन केलें. आपलें कर्तव्य काय आहे हें शास्त्रानें ठरवावयाचें आहे. पण तें ठरल्यावर तें कसें करावें याची त्यानें फारच उत्तम समजूत घातली. अडचणीस भिऊन किंवा मोहपाशास गुंतून कर्तव्यपराङ्मुख होणें व अरण्यांत जाऊन संन्यास घेणें म्हणजे खऱ्या

मोक्षमार्गास लागणें नव्हे, हें त्यानें अर्जुनास चांगलें समजाविलें.. कर्तव्य करतां करतां चित्त शुद्ध झालें म्हणजे संन्यास घेणें युक्त आहे, किंवा योगारूढ होणें शक्य आहे, अन्यथा नाहीं. सारांश, वेद, वेदान्त, सांख्य, योग यांस योग्य सन्मान देऊन त्यांचा आपसांतील वाद किंवा आपलीच शेखी मिरविण्याचा प्रयत्न मिटवून प्रवृत्ति निवृत्तिरूप किंवा निवृत्ति प्रवृत्तिरूप कशी करावी आणि मनुष्यानें आपले कर्तव्य कसें बजवावें हें त्यानें अर्जुनास भगवद्गीतेंत सांगितलें. तात्पर्य, एका दृष्टीनें पाहता सर्वांत जुनें उपलब्ध व खरें सांख्यशास्त्र भगवद्गीता होय आणि योगशास्त्र व वेदान्तशास्त्रही भगवद्गीता होय. या शास्त्रांचे मान्य सिद्धांत विलक्षण संकलित व ओजस्वी वाणीनें कोठे सांगितले असतील तर ते भगवद्गीतेंत प्रथम सांगितले आहेत. आणि यासाठीं भगवद्गीतेस उपनिषद्, ब्रह्मविद्या व योगशास्त्र हीं विशेषणें यथार्थ लागू पडतात.

पूर्वीच्या आचार्यांनीं उपदेशिलेल्या वेद व वेदान्त, सांख्य व योग या मार्गांतील मान्य व उत्तम अंश आपल्या अमोघ व दिव्य वाणीनें श्रीकृष्णानें अर्जुनास याप्रमाणें समजावून दिला. इतकेंच नव्हे, तर त्याने या वेळीं आपला नवीन उपदेशिलेला भक्तिमार्गही अर्जुनास समजावून सांगितला. भक्तिमार्गाचा अथवा भागवत धर्माचा प्रथम उपदेष्टा श्रीकृष्ण आहे असें माझें मत आहे. श्रीकृष्णापासूनच या मतास भागवत ही संज्ञा मिळाली. याचेंच एक विशिष्ट स्वरूप पांचरात्र मत होय. हें ज्ञान श्रीकृष्णानें राजविद्या, राजगुह्य अशा संज्ञेनें भगवद्गीतेंत विशेषिलें आहे, व तेंच शेवटीं अठराव्या अध्यायात "सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज" या श्लोकार्धांत गुह्यतम म्हणून अर्जुनास सांगितलें आहे. अनन्यभावानें एका परमेश्वराची प्रेमानें भक्ति करून त्याला शरण जाणें हा मोक्षाचा मार्ग सर्वांस सारखा मोकळा व सुलभ आहे. संन्यास योग किंवा यज्ञादि कर्में हीं साधनें सर्वांस सुलभ व मोकळीं नाहींत. यज्ञयाग हजारों रुपयांच्या खर्चाशिवाय किंवा शास्त्राच्या सूक्ष्म ज्ञानाशिवाय होऊं शकत नाहींत. तसेंच संन्यास व योग बुद्धिवानाशिवाय आणि निग्रहवानाशिवाय इतरांस प्राप्य नाहींत. द्रव्यहीन, बुद्धिहीन, संयमहीन जीवांस कांहीं तरणोपाय आहे कीं नाहीं हा प्रश्न मनुष्यापुढें नेहमीं उभा आहे; पण त्या वेळीं तो विशेष रीतीनें उभा होता.

